जैं अज्ञानाचें गडद पडे
तैं संशय बहुवस मनीं वाढे
म्हणौनी सर्वथा मागु मोडे
विश्वासाचा ।।
हृदयीं हाचि न समाये
बुद्धीतें गवसूनी ठाये
तेथें संशयात्मक होये
लोकत्रय ।।
ऐसा जरी थोरावे
तरी उपायें एक आंगवे
जरी हातीं होय बरवें
ज्ञानखड्ग ।।
तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें
निखळ हा निवटे
मग निःशेष खता फिटे
मानसींचा ।।

भगवान् ज्ञानेश्वर.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



प्रस्तुत ग्रंथमाला सुरू झाल्यानंतर अनेक अडचणींशीं झगडण्याचे प्रसंग तिला आले; परंतु या वर्षी तिजवर जो प्रसंग ओढवला आहे तो अत्यंत शोकजनक आणि बिकट होय.

या मालेचे पहिले प्रकाशक व आमचे ज्येष्ठ बंधु ती. रा. रा. गणपतराव नारायण कुळकर्णी हे गेल्या ता. १५ मे १९१८ रोजीं क्षयाच्या विकारानें परलोकवासी झाले. पित्याच्या मृत्यूनंतर पोरक्या झालेल्या मुलाचें संरक्षण करून त्याला वाढीला लावणें म्हणजेच मृताचें उत्तम स्मारक करणें होय अशा भावनेनें, आमच्या बंधूंनीं सुरू केलेल्या ह्या मालेच्या प्रकाशनाचें कार्य आतां आम्ही हातीं घेतलें आहे.

केवळ स्वतःच्या कर्तबगारीवर एकाद्या धंद्यांत अगदीं कनिष्ठ पायरीवरून शेवटच्या पायरीपर्यंत पोहोंचणारीं आणि स्वपराक्रमानें उदयास येणारीं जीं काय आपणास थोडींशीं माणसें दिसतात त्यांतच आमच्या बंधूंची गणना करणें अवश्य आहे. घरच्या गरिबीमुळें कांहींतरी उद्योगधंद्याच्या निमित्तानें आपल्या वयाच्या अवघ्या १५ व्या वर्षीं ती. गणपतराव यांना मुंबईस येणें भाग पडलें. कर्नाटक छापखाना त्या वेळीं अगदीं बाल्यावस्थेंत असून त्याचे त्या वेळचे मालक कै. रा. रा. मंगेशराव नाडकर्णी या नांवाचे गृहस्थ होते. कांहीं थोड्याशा ओळखीनें ती. गणपतराव यांनीं याच छापखान्यांत त्या वेळीं दरमहा ६ रुपये पगारावर कंपॉझिटरची नोकरी धरली व कालेंकरून ते त्याच छापखान्याचे मालक बनले. हा छापखाना त्यांच्या हातीं आला तेव्हां त्याची स्थिती अगदीं सामान्य प्रतीची होती; पण ती. गणपतराव यांनीं अंगमेहनतीनें झटून तो उदयास आणून त्याचें नांव पहिल्या प्रतीच्या कारखान्यांत प्रविष्ट केलें. कोणतेंही स्वीकृत कार्य उत्तम रीतीनें झालेंच पाहिजे असा त्यांचा बाणा असल्यामुळें केवळ नफ्याकडे त्यांची दृष्टि कधींच नव्हती. प्रसंगीं वाटेल तें नुकसान त्यांनीं सोसलें पण छापखान्याचें नांव जाऊं दिलें नाहीं.

केवळ द्रव्याच्या दृष्टीनें पाहातां प्रस्तुत ग्रंथमाला त्यांना फारशी लाभदायक झाली असें नाहीं. त्यांतून चालू युरोपीय महायुद्ध सुरू झाल्यानंतर तर हा

प्रकाशनाचा धंदा केवळ आंतबट्ट्याचाच होऊं लागला. पण हातीं घेतलेलें काम सोडावयाचें नाही हा त्याचा बाणा त्यानी अखेरपर्यंत सोडला नाही.

आमच्या प्रियबंधूचे हें अंगीकृत कार्य आता आमच्या हातीं आलें आहे. आपल्या छापखान्यातून उत्तमोत्तम ग्रंथ निर्माण करून महाराष्ट्र वाङ्मयाची आणि महाराष्ट्रीय वाचकवर्गाची आपल्या हातून काहीतरी सेवा घडावी अशी त्याची सदिच्छा होती, ही त्याची पवित्र इच्छा शक्य तोंपर्यंत पुरी करावी असा आमचा संकल्प आहे आजपर्यंत या ग्रंथमालेला आमच्या प्रिय वाचकानी जसा आपला उदार आश्रय दिला आहे तसाच तो पुढेंही चालू ठेवून त्यानी आम्हास पाठबळ दिलें तर आमचा संकल्प तडीस जाईल. योग्य किंमतीत उत्तम ग्रंथ वाचकाच्या हाती देण्याची आपली इच्छा आमच्या बंधूनी प्रथम खंडाच्या प्रस्तावनेत नमूद केली आहे व तिचेंच पुनरुच्चारण आज आम्ही येथे करतो

आपल्या मित्रमंडळीपैकी एकदोन गृहस्थाचा नवीन आश्रय या ग्रंथमालेस जोडून देण्याची आमच्या जुन्या आश्रयदात्यानी तसदी घेतल्यास त्यायोगें आम्हांला बरीच मदत केल्यासारखें होईल.

आमच्या अंगीकृत कार्यांत सर्व प्रकारे साहाय्य करण्याची बुद्धि आमच्या वाचकवर्गास परमेश्वर देवो अशी त्याची प्रार्थना करून त्याची रजा घेतों.

ता १।११।१८. } मंगेश नारायण कुळकर्णी,
प्रकाशक.

---

## – द्वितीयावृत्तीचे वेळीं –

ह्या खंडाची प्रथमावृत्ति प्रसिद्ध होऊन आज सुमारें १५ वर्षें होत आलीं. इतक्या दीर्घ कालानंतर सदर खंडाची द्वितीयावृत्ति प्रसिद्ध करण्याचा सुयोग परमेश्वराच्या कृपेनें आल्याबद्दल आम्हांला अत्यानंद होत आहे

पहिल्या आवृत्तीप्रमाणेंच या द्वितीयावृत्तीचेंहि स्वागत आमचे प्रिय वाचक करतील अशी आम्हाला पूर्ण आशा आहे.

ता० १–१–३४. प्रकाशक.

# अनुक्रमणिका.



**ज्ञानयोग-व्याख्यान-माला**—( अपूर्ण )







# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ



## सप्तम खंड



## टिपणें



### १

### कर्मयोग.

शारीरिक व मानसिक उपाधींपासून आत्म्यास मुक्त करणें हें आपलें अखेरचें साध्य आहे. हें सिद्ध झालें म्हणजे आपण सदा मुक्तच होतों असा अनुभव जीवात्म्याला होईल. आपणास सुखी करण्याला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नव्हती असें त्याला आढळून येईल. आपणास सुख व्हावें म्हणून दुसऱ्या कोणाची अपेक्षा जोंपर्यंत आपणास असते तोंपर्यंत आपण गुलामच आहोंत. पुरुष मुक्त झाला व त्याला पूर्ण करण्याकरितां दुसऱ्या कशाचीही मदत लागेनाशी झाली व ही सर्व सृष्टि अनावश्यक आहे असें त्यास दिसून आलें म्हणजे त्याला कैवल्य प्राप्त झालें असें म्हणावें.

मनुष्य पैशाच्या मागें धांवत असतो आणि त्या पैशाच्या लोभासाठीं दुसऱ्या एखाद्याला फसविण्याची त्याला यत्किंचित्‌ही दिक्कत वाटत नाहीं; पण आपल्या या वृत्तीला आळा घालून तो कांहीं थोडीं वर्षें वाट पहात राहिला तर पैसा आपणाकडे धांव घेत आहे असें त्याला आढळून येईल. अशा स्थितींत

त्याची इच्छाशक्ति इतकी प्रबल होईल की तो विश्वाचा शास्ता होईल. पण आपण मनुष्य किती मूर्ख आहो !

आपल्या चुकाचे प्रदर्शन जगापुढे करीत बसण्यात काय फायदा आहे ? तसे केल्याने झालेल्या चुका नाहीशा होतात असे नाही आपल्या हातून जे काही कर्म होऊन गेले असेल त्याचे फळ भोगणे आपणास भाग आहे आता चुका न होऊ देता दिवसे दिवस अधिक चागले कार्य करण्याचा यत्न करणे हे मात्र आपण केले पाहिजे यात जगाची सहानुकपा आपणास मिळेल असे नाही बलवान् आणि सत्ताधारी लोकाना मात्र जगाची सहानुकपा मिळते.

मनुष्याच्या हितासाठी जे काम निरपेक्षपणे आपण करतो तेवढ्याबद्दल मात्र आपणास बधन प्राप्त होत नाही

कर्तव्य कोणतेही असो त्याची उपेक्षा करू नये एखादा मनुष्य एकादे हलके काम करीत असला तर तेवढ्यानेच तो हलका होतो असे नाही मनुष्य काम कोणते करतो यावरून त्याची परीक्षा न करता तो ते कर्म करतो हे पाहिले पाहिजे ते काम करण्याची त्याची रीत आणि ते करीत असता दृष्टीस येणारी त्याची आकलनशक्ति हीच त्याची खरी कसोटी होय आपल्या साऱ्या आयुष्यभर मूर्खपणाची बडबड करणाऱ्या एखाद्या पडित-मन्यापेक्षा थोड्या वेळात सुदर व टिकाऊ जोडा तयार करणाऱ्या चाभारा-चीही योग्यता अधिक आहे

कर्तव्य म्हटले की त्याला पावित्र्य प्राप्त होते, आणि भक्तीने आपले कर्तव्य करणारा मनुष्य परमेश्वराची उपासनाच करतो असे म्हटले पाहिजे आपल्या कार्याबद्दल चित्तात भक्ति ठेवून ते करणे हा ईश्वरोपासनेचा अत्युच्च मार्ग आहे अज्ञानाने बद्ध असलेल्या जीवास ज्ञान व मुक्ति मिळण्याचा हाच खरा मार्ग आहे

आपणास सध्या प्राप्त असलेले कर्तव्य आपण चागले बजावले म्हणजे आपण अधिक शक्तिमान् होत जातो अशा रीतीने पायरी पायरीने आपले सामर्थ्य वाढले म्हणजे समाजातील अत्यत उच्च व आपणास प्रिय अशी कर्तव्येही करण्याजोगी परिस्थिति आपणास प्राप्त होईल

प्रकृतीचा न्यायाचा कायदा एकसारखाच कडक आहे. त्याच्या ठिकाणी दया माया केव्हाही आढळावयाची नाही.

खरा व्यवहारचतुर मनुष्य ससाराला बरे अथवा वाईट काहीच म्हणत नाही.

व्यवहारात अत्यत यशस्वी ठरलेल्या मनुष्याजवळ अत्यत चोख दानत व अत्युच्च प्रतीची मन पूर्वकता हीं असली पाहिजेत कारण याच्या अस्तित्वावाचून कोणत्याही कार्यात एवढे मोठे यश मिळणे शक्यच नाही. असा मनुष्य कदाचित् अगदी निरपेक्ष वृत्तीचा नसेल तथापि त्याची वृत्ति निरपेक्षपणाच्या मार्गावर बरीच पुढे गेली असली पाहिजे तो अगदीच निरपेक्ष असता तर त्याचे यश बुद्धाच्या यशाच्या जोडीस बसविण्यासारखे झाले असते ज्या प्रमाणाने आपल्या चित्तात निरपेक्षता असते त्याच प्रमाणाने आपणास यशाची प्राप्ति होते

समाजाचे धुरीणत्व ज्याकडे जाते ते लोक सामान्य माणसापेक्षा आवीच उच्चकोटीतले असतात

आपले कर्म शुद्ध की अशुद्ध हे त्यापासून निर्माण होणाऱ्या सुखदु खावर ठरवावयाचें असेल तर केवळ शुद्ध असे कोणतेही काम करणे आपणास शक्य नाही आपण कितीही धडपड केली तरी ज्याचा कोणताही वाईट परिणाम घडणार नाहीं असे कोणतेही कर्म आपणास करता येणार नाहीं. दुसऱ्यास दु ख द्यावयाचे नाही असे म्हटले तर नुसते जगणे, श्वासोच्छ्वास करणे अथवा अन्न खाणेही आपणास युक्त नाही कारण जो घास आपण खातो तो दुसऱ्या कोणाच्या तोंडून तरी ओढून घेतलेला असतो दुसऱ्या कोणत्या तरी जीवास मारून आपण जगत असतो ही गोष्ट लक्ष्यात ठेविली म्हणजे नुसत्या कर्माने मुक्तिलाभ होणे अशक्य आहे हे आपल्या लक्षात येईल. अनत कालपर्यंत आपण एकसारखे कर्म करीत राहिलो तरी या कर्माच्या जाळ्याच्या गुतागुतीतून आपले पाय बाहेर पडावयाचे नाहीत कितीही काळ आपण एकसारखें कर्म करीत राहिलो तरी त्याला शेवट कधी यावयाचाच नाही.

कोणत्याही इच्छेच्या जाळ्यात बध न पावता केवळ दयेने प्रेरित होऊन जो मनुष्य कर्म करितो त्याच्या चित्तात फलापेक्षा नसते, पण कोणत्यातरी इच्छेचा दास होऊन जो कोणी कर्म करतो त्याला त्याच्या फलाचे प्रायश्चित्त भोगलेच पाहिजे. कर्माचा दास होऊन जो कर्म करतो त्याला आपला पगार घेतलाच पाहिजे. कोणत्याही प्रकारची कर्मे म्हटलीं की त्याची गती हीच. उदाहरणार्थ

सार्वजनिक कामे घ्या सार्वजनिक हितासाठी भाषण करणारा वक्ता लोकाकडून टाळ्या मिळण्याची अथवा हुर्यो मिळण्याची अपेक्षा बाळगीत असतो अशा मनुष्याला टाळ्या न मिळाल्या तर त्याचा जीवच जाईल, कारण त्याला या गोष्टीची अपेक्षा पक्की असते त्याच्या जीविताचा तो एक भागच होऊन बसतो. गुलाम होऊन काम करणे ते हें कोणतेही कर्म केले की त्याचे प्रतिफल मिळालेच पाहिजे अशी त्याची प्रकृतीच बनून गेलेली असते दुसरे काही लोक नोकर होऊन काम करतात 'मला अमुक मिळाले, तर मी अमुक काम करीन' असा सवदा आपल्या चित्तात ते ठरवीत असतात '**कर्मण्येवाधिकारस्ते**' असे म्हणून काम करणे फार सुखाचे आहे, पण अशी वृत्ति तयार करणे हेच फार कठीण आहे. अशा वृत्तीने काम करणारा एखादा पुरुष असेल तर त्याच्या दर्शनाला वाटेल तेथे मी जाईन. कर्म म्हटले की त्यात इच्छा कोठे तरी दडी मारून बसलेली असते. पैशाची नसली तर सत्तेची इच्छा असते. सत्तेची नसली तर नफ्याची एवच कोणत्याना कोणत्या प्रकारची इच्छा असल्यावाचून मनुष्य कर्मास प्रवृत्त होत नाही. एक मनुष्य आपणास दुसऱ्याचा मित्र म्हणवितो त्याच्या बरोबर काम करण्यास तो सिद्ध होतो तुजबरोबर काम करण्यावाचून आपली दुसरी कोणतीही इच्छा नाही असे तो दरक्षणी बजावीत असतो, पण ही सारी निरपेक्षता दुसरा मनुष्य त्याच्या मताने वागत आहे तोंपर्यंतच थोडासा मतभेद झाला की त्याच्या मैत्रीने राम म्हटलाच! अशा रीतीने इच्छावश होऊन काम करणे हेच साऱ्या दु खाचे मूळ आहे आपल्या वृत्तीचे धनी होऊन जीं जी कर्मे आपण करतो त्याजमुळें निरिच्छपणा आपणास प्राप्त होऊन आपल्या कल्याणाच्या मार्गास आपण लागतो.

आपल्या स्वत च्या मापाने विश्व मोजले जात नाही, हा मोठा धडा आपण शिकला पाहिजे प्रत्येक मनुष्याची परीक्षा त्याच्याच मापाने होत असते. त्याचप्रमाणें प्रत्येक मानवकुलाचे चागलेपण अथवा वाईटपण त्याच्या मापाने व त्याच्या परंपरागत कल्पनावरून ठरविले पाहिजे. कोणत्याही देशात ज्या काहीं चालीरीती अस्तित्वात असतात त्याना विशिष्ट परिस्थिति आणि विशिष्ट हेतू ही कारण असतात त्याच्या अनुषगाने त्या चालीरीतीचें बरें वाईटपण ठरविले पाहिजे अमेरिकन लोक ज्या परिस्थितीत राहतात तिला

अनुरूप अशा चाली तेथे अस्तित्वात आल्या आहेत. त्याचप्रमाणे हिंदू लोकाच्या चालीरीती हिदू लोकाच्या परिस्थित्यनुरूपच आहेत. हीच गोष्ट चीन, जपान, इग्लड इत्यादि सर्व राष्ट्रास लागू आहे ज्या स्थितीला आपण योग्य असतो तीच स्थिति आपणास प्राप्त झालेली असते एखाद्यास दुसऱ्याहून अधिक सामर्थ्य असले तर ती गोष्ट जगाच्या लक्षात अवश्य येईल. कमी अधिक सामर्थ्यानुरूप परिस्थिति बदलत जाणे ही नेहमीची विश्वघटना असून ती नित्य सुरू आहे याकरिता आपली परिस्थिति वाईट म्हणून कुरकुर करण्यात फायदा नाही एखादा मनुष्य दुष्ट असूनही श्रीमत असला तर त्याच्या त्या श्रीमतीलाही काही कारण असले पाहिजे. तशी श्रीमती त्याला प्राप्त व्हावी असे काही तरी गुण त्याजपाशी असले पाहिजेत. ज्या दुसऱ्या मनुष्याजवळ तसे गुण असतील तोही श्रीमत होईल. अशा स्थितीत भाडणें करीत बसण्यात अथवा कुरकुरण्यात काय अर्थ आहे ? अशाने आपली स्थिति कधींही सुधारणार नाही हलके काम करण्याचे आपल्या नशीबी आहे म्हणून जो मनुष्य कुरकुरतो तो कोणत्याही स्थितीत कुरकुऱ्याच रहावयाचा कुरकुरणे हा त्याचा जन्मसिद्ध स्वभाव बनल्यामुळे तो सदोदित दु खी कष्टी असावयाचा कोणत्याही गोष्टीत त्याला यश म्हणून मिळावयाचे नाही, पण जो मनुष्य आपले कर्तव्य आनदाने पार पाडतो व सदोदित कर्तव्यदक्ष असतो त्याला ज्ञानप्राप्ति होईल व अधिकाधिक महत्वाची कर्तव्ये त्याच्या वाट्यास येतील

---

## २

## आततायित्व.

— ० —

जगात पुष्कळ प्रकारचे आततायित्व आहे कित्येक लोक दारूच्या सबधाने अथवा तबाखूच्या सबधाने वेडे—आततायी बनलेले असतात जगाने तबाखूचे व्यसन सोडले तर त्याला पूर्णत्व प्राप्त होईल असें त्याना वाटत असते असल्या आततायी वेड्यात स्त्रियाचा भरणा बहुधा अधिक असतो. आमच्या या वर्गात ( अमेरिकेत ) अशाच प्रकारची एक स्त्री होती शिकागो शहरीं काही स्त्रियानीं एक सघ स्थापन केला आहे. त्या सघाकरिता एक इमारत

त्यांनी बाधली असून तींत गरीब लोकासाठी तालीमखान्याची व गायनवादनाची तजवीज त्यानी केली आहे आमच्या क्लासातील स्त्री या सघाची सभासद होती. एके दिवशी जगातील अनिष्ट गोष्टीविषयीं भाषण करता करता ती म्हणाली " ही अनिष्टे दूर करण्याचा उपाय मला माहीत आहे " तो कोणता असे मीं विचारले तेव्हा ती म्हणाली, " हल नावाची आमची इमारत तुम्ही पाहिली आहे काय ? " जगातील सर्व दु खे नाहीशी करण्याचे सामर्थ्य या इमारतीला आहे असे तिला वाटले. तिचा हा समज दिवसेंदिवस बळावतच जाणार. तिच्याबद्दल मला खरोखर फार वाईट वाटले. एखाद्या स्त्रीचा पति मृत झाला असता तिला पुनर्विवाह करण्याची परवानगी मिळाली की हिंदुस्थानचा उद्धार होईल असे समजणारे कित्येक वेडे हिंदुस्थानात आहेत हेसुद्धा एक प्रकारचें आततायित्वच आहे

अशा प्रकारच्या वेडाच्या मदतीने मोठमोठी कार्यें उठतात असें लहानपणी मला वाटत असे, पण आतां वाढत्या वयाबरोबर हे माझे मत चुकीचे असल्याचे मला दिसून आले आहे.

एखादी स्त्री खुशाल चोरी करीत असेल. दुसऱ्याच्या खिशांतील जिन्नस घेण्यात काही पाप आहे अशी शकासुद्धा तिच्या मनात येत नसेल. अशी स्त्री धूम्रपान करीत नसेल आणि यामुळें धूम्रपान करणें हे मोठें पाप होय असें तिला वाटत असेल. धूम्रपान करणारा एखादा इसम नजरेस पडल्याबरोबर तिचे माथे फिरत असेल दुसरा एखादा मनुष्य फसव्या असेल. भेटेल त्याला फसवीत जाणे हाच त्याचा धदा, पण कदाचित् हा मनुष्य दारु पीत नसेल. यामुळे दारु पिणारा प्रत्येक मनुष्य त्याला गुणशून्य दिसत असतो तो स्वत: जें काही करतो त्यातील वाईटपणा त्याच्या गावींही नसतो. हा मनष्यस्वभावच आहे स्वार्थामुळें एकाच बाजूकडे लक्ष द्यावयाचे हा मनुष्याचा स्वभावच बनून गेला आहे.

परमेश्वर जगाचे शासन करीत असून ते कार्य त्याने तुम्हावर सोंपविलेले नाहीं हें तुम्ही नित्य लक्षांत बाळगा. परमेश्वर जगाचें पालन करतो व तोच त्याचे शासनही करतो असल्या या आततायी लोकानी कितीही डोकेफोड केली तरी जग चालावयाचें तसे चालणारच हे सारे आततायी उद्या काळाच्या पोटांत गडप झाले तरी त्यामुळें जगाच्या गतीस खड पडणार नाहीं.

इग्लडातून 'मे फ्लॉवर' नावाचे एक गलबत अमेरिकेच्या किनाऱ्यास आले. त्यातून इग्लडचे पहिले वसाहतवाले आले. ते आपणास 'प्युरिटन्' म्हणजे शुद्ध धर्मानुयायी म्हणवीत असत स्वतःच्या मताप्रमाणें ते खरोखरच शुद्धपणे वागत होते, पण पुढें इतरास ते छळू लागले जगाच्या इतिहासात हाच प्रकार जिकडे तिकडे आढळून येतो आपला एखाद्या ठिकाणी छळ होऊ लागला म्हणून जे लोक तेथून पळून जातात तेच लोक योग्य सधि मिळाली म्हणजे स्वत दुसऱ्याचा छळ करू लागतात.

असल्या आततायी लोकापैकी शेकडा नव्वदांच्या प्रकृतीत काहीतरी बिघाड झाला असला पाहिजे त्याच्या काळजाला काही विकार झाला असेल अथवा त्याना अग्निमाद्याचा विकार झाला असेल अथवा आणखी एखाद्या रोगाने त्याना पछाडले असेल आततायित्व हासुद्धा एक प्रकारचा रोगच आहे, असा शोधसुद्धा कदाचित् वैद्यविद्याविशारद उद्या लावतील. असले अनेक वेडे माझ्या पाहाण्यात आले आहेत असल्या वेड्यापासून परमेश्वराने आमचे रक्षण करावे अशी प्रार्थना मी करतो

असल्या प्रकारच्या वेडानी युक्त असलेल्या सुधारणापासून चार पावले दूर राहणे इष्ट आहे असा माझा अनुभव आहे जग हळूहळू आपला मार्ग आक्रमित आहे, त्याला तो तसाच आक्रमू देणे यातच शहाणपण आहे जग सुधारण्यासाठी तुम्हाला इतकी घाई का झाली ? स्वस्थपणे झोप घ्या, आपली प्रकृती चागली ठेवा, चागल्या प्रकारचे अन्न खात जा आणि जगाबद्दल सहानुकपा बाळगा. तुम्ही एवढे केले म्हणजे पुरे. असल्या प्रकारच्या आततायित्वाने जगात द्वेषाचा मात्र सुकाळ होतो जे गरीब लोक दारुबाज बनतात, त्याच्याबद्दल या मितपानवाल्या मडळीच्या मनात थोडीशी तरी अनुकपा असते असे तुम्ही मनातसुद्धा आणू नका आततायी म्हणजे आपल्याच वेडाच्या मागे लागलेला मनुष्य. आपल्या अशा कृतीनें आपला स्वत चा काहीं तरी फायदा होईल असें त्याला वाटत असते. या युद्धात लुटालुटीची सधि केव्हा येईल याची वाट तो पहात असतो. असल्या वेड्याच्या सगतीतून तुम्ही सुटला म्हणजे खरी सहानुकपा म्हणजे काय हे तुम्हास समजू लागेल. खरें प्रेम आणि खरी सहानुकपा याचा उदय तुमच्या चित्तात झाला म्हणजे

गरीब बापड्याना तुच्छ लेखणें तुमच्यानें होणार नाही. त्याच्या आगी काही दोष असले तर त्याजबद्दल त्यास शिव्या न देता त्याची तुम्ही दयाच कराल. अशा स्थितीत अट्टल दारुबाजाची सुद्धा तुम्हास कीव येईल आपणासारखाच तोही एक मनुष्य आहे, ही गोष्ट तुमच्या चित्तात वागेल त्याचे अध पतन होण्यास कोणती परिस्थिति कारण झाली याचा शोध तुम्ही करू लागाल त्या परिस्थितींत आपण स्वत सापडलो असतों तर आपण कदाचित् जीवसुद्धा दिला असता असे तुम्हांस वाटेल. एका स्त्रीचा नवरा भयकर दारुबाज होता. त्याच्याबद्दल एके वेळी तिने मजकडे काही तक्रार केली तेव्हा मी तिला म्हटले 'बाई, तुमच्या सारख्या आणखी दोन कोट बायका असत्या तर आणखी दोन कोट पुरुष असेच भयकर दारुबाज बनले असते.' दारूबाजीच्या व्यसनाचें कारण स्त्रियाच्या वागणुकीत असते अशी माझी खात्री झाली आहे जे खरे असेल ते बोलावे हेंच माझें काम आहे, तोड देखणे बोलणें हें माझे काम नाही पुष्कळ स्त्रिया आततायी असतात, सोशिकपणा त्याना ठाऊक नसतो, क्षमा त्याच्या गावीही नसते पुरुषानी आपल्या मुठीत रहावे असे त्याना वाटत असते एखादा शब्द तिच्या विरुद्ध तो बोलला कीं त्या आकाश–पाताळ एक करून टाकतात अशा स्थितीत पुष्कळ पुरुष जीव कसे देत नाहीत हेच मला नवल वाटते. अशी परिस्थिति असणे हे इष्ट नाही मनुष्याचा जन्म ही काही थट्टेची गोष्ट नाही. या जन्माबरोबर पुष्कळ महत्वाचे काम आपणाकडे आलेलें आहे

दृढ आत्मविश्वास असला पाहिजे, हे खरे पण तसेच बौद्धिक विश्वासही पाहिजे भलत्याच गोष्टीवर विश्वास ठेवणें बरें नाही अशाने भ्रमिष्टाची संख्या मात्र वाढेल एकदा एक ग्रथ माझ्या अवलोकनात आला त्यातील साऱ्या वचनावर वाचकानी विश्वास ठेविला पाहिजे असें लिहिलें होते आत्म्याला अस्तित्व नसून स्वर्गात देव आणि देवस्त्रिया राहतात व आपल्या प्रत्येकाच्या मस्तकातून एक प्रकाशज्योति निघून ती स्वर्गाकडे जात असते असे या पुस्तकांत लिहिलेहोते या लेखकाला हे सारे ज्ञान कोठून प्राप्त झालें ? हा लेखक एकवार मजकडे आला होता. 'हे तुला कसें समजले ?' असें मी विचारले, तेव्हा तो म्हणाला 'मला ईश्वराची प्रेरणा झाली आहे.' असल्या भाकड कथावर माझा विश्वास बसत नाही असे मीं म्हटले तेव्हा तो म्हणाला

‘तर मग तुम्ही अत्यत पातकी आहा तुमचे तारण होणे शक्य नाही’ आततायित्व ते हेच!

---

३

## कर्म हेंच ईशपूजन



जीवन्मुक्त मनुष्य कर्म करू शकत नाही, कारण त्यानें कर्म करावे असे कोणतेही बधन त्याला नसते त्याला आसक्ति नसते तसेच अज्ञानही त्याजपाशी नसते लोहचुबकाच्या खडकावरून गलबत गेले म्हणजे त्याचे सर्व खिळे आणि त्याच्या लोखडी काबी निघून जातात व त्या गलबताच्या सर्व फळ्या विस्कळित होऊन ते बुडते असे सागतात अहमहमिका ही फक्त अज्ञान स्थितीतच असू शकते, कारण, अशा स्थितीत आपण सर्व नास्तिकच असतो ईश्वरावर ज्याचा पूर्ण विश्वास आहे असा मनुष्यही काम करू शकणार नाही आपण सारेच कमी अधिक प्रमाणाने नास्तिक आहो परमेश्वराची भेट आपणास होत नाही अथवा आपला भरवसाही त्याजवर नाही ईश्वर म्हणजे ‘ईश्वर’ हा शब्द इतकेच त्याचे ज्ञान आपणास आहे एखाद्या क्षणी आपण परमेश्वरासन्निध आहो असे आपणास वाटते, पण पुन्हा या स्थितीपासून आपण च्युत होतो परमेश्वराची प्रत्यक्ष भेट आपणास झाली म्हणजे आपले कर्म सपते, कारण अशा स्थितीत कोणासाठी कोणीं काम करावे? विश्वाची रचना करणाऱ्या परमेश्वराला आपण कोणते कर्म करण्यास शिकविणार? जे कर्मातीत झालेले आहेत ते अत्युच्च दर्जाचे मनुष्य होत परमेश्वराचे काम आपण केले पाहिजे, त्याच्या कार्यात त्याला आपण मदत केली पाहिजे, आपण जगाची सुधारणा केली पाहिजे असल्या प्रकारचे प्रलाप पुन्हा तुमच्या कानी पडतील तेव्हा वरील तत्त्व लक्षात आणा. असल्या प्रकारच्या विचारांस आपल्या चित्तांत थारा देऊ नका, कारण, असल्या प्रकारच्या विचारात अहकार भरलेला असतो. जे काही कर्म तुम्ही करता ते तुमच्या स्वत च्याच फायद्यासाठी असते. आपण परमेश्वराला मदत करावी असे म्हणणे म्हणजे परमेश्वराला लगडे लुले ठरविणे होय कर्म कर-

ण्यास मुभा मिळाली ही परमेश्वराची कृपा होय. या जगतूरूपी प्रचंड तालीमखान्यांत कसरत करण्यास त्यानें तुम्हांस परवानगी दिली आहे. यांत आपणा मनुष्यांनीं त्याला मदत करावी असा त्याचा उद्देश नसून आपण आपलें शरीर सुदृढ करावें असा त्याचा हेतू आहे. तुम्हीं मदत केली नाहीं तर एखादी मुंगी तरी मरेल असें तुम्हांस वाटतें काय? असें म्हणणें म्हणजे परमेश्वराचा उपमर्द करणें होय. जगाला तुमची यत्किंचित्‌ही जरूर नाहीं. महासागरांत जसा एखादा बिंदु तशी तुमची योग्यता या विश्वांत आहे. तुमच्या अभावीं जग चालावयाचें तसेंच चालेल. परमेश्वराच्या इच्छेवांचून झाडाचें एक पानही हालूं शकत नाहीं अथवा वारा वाहूं शकत नाहीं. कर्म करण्याची सवलत त्यानें आपणास दिली हा मोठाच अनुग्रह त्यानें आपणावर केला आहे. त्याला मदत म्हणून नव्हे तर त्याला अर्पण म्हणून सर्व कर्में करणें इतकाच आपला अधिकार आहे. ‘मदत’ हा शब्दच तुमच्या अंतःकरणांतून समूळ काढून टाका. कोणासही मदत करणें तुम्हांस शक्यच नाहीं. ज्या कोणास ‘मदत’ म्हणून तुम्ही एखादें कर्म करतां, तेव्हां वास्तविक परमेश्वराचें पूजन तुम्ही करीत असतां. एखाद्या भुकेल्या कुत्र्याला तुम्ही भाकरीचा तुकडा टाकतां, तेव्हां कुत्र्याच्या रूपानें परमेश्वराचें पूजन तुम्ही करीत असतां. त्या कुत्र्यांतही परमेश्वराचा वास आहे. फार काय, पण तो कुत्रा परमेश्वरच आहे. तो सर्वत्र भरून उरला आहे. त्याचें पूजन करण्याची परवानगी आपणास मिळाली आहे. अशा प्रकारच्या विनीत चित्तानें साऱ्या विश्वाशीं तुम्ही व्यवहार करा. तुम्ही अशा दृष्टीनें कर्में केलीं म्हणजे तुम्हांस निष्कामता प्राप्त होईल. अशा रीतीनें कर्में करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. कर्म करीत असतां अशा प्रकारची विनीत बुद्धि आपण बाळगावी. कर्मयोगाचें हेंच रहस्य आहे.

---

# ४

# अहेतुक कर्म.

[ तारीख २० मार्च १८९८ रोजीं कलकत्त्यातील रमाकात बोस रस्त्यावरील न ५७ च्या घरात रामकृष्ण आश्रमाची बेचाळिसावी सभा भरली होती त्या प्रसगी स्वामीजीनीं 'अहेतुक' कर्म या विषयावर पुढील व्याख्यान दिले ]

गीतेचा प्रथम उदय झाला त्या वेळी दोन पथात मोठा तटा माजून राहिला होता. वेदानी सागितलेले यज्ञयाग करून पशुहनन करणे हेच सर्व धर्मांचे सार आहे असे एका पक्षाचे म्हणणे होते पशुहनन करणे हा खरा धर्म नव्हे असे दुसऱ्या पक्षाचे म्हणणे होते. सन्यासी आणि ज्ञानमार्गी हे या दुसऱ्या पक्षाचे पुरस्कर्ते होते सर्व कर्माचा सन्यास करून आत्मज्ञान मिळविणे हा एकच मोक्षाचा मार्ग आहे असे या पक्षाचे मत होते अहेतुक कर्म करावे हे मत प्रचलित करून भगवान् गीताकारानी या दोन्ही पक्षाच्या तत्त्वाची परिसमाप्ती केली.

महाभारतकाली गीता लिहिली गेली नसून त्यानतर केव्हातरी ती त्यात घुसडली गेली असावी असे पुष्कळाचे मत आहे हे म्हणणे बरोबर नाही. गीतेत जी मुख्य तत्त्वे सागितली आहेत त्याचा अनुवाद महाभारतात सर्वत्र आढळतो. महाभारतांतून गीता काढून टाकावयाची म्हटले तर त्याच तत्त्वाचा अनुवाद जेथे जेथे केला असेल ते सर्व भागही त्यातून काढून टाकावे लागतील.

आता अहेतुक कर्म म्हणजे काय याचा विचार केला पाहिजे अहेतुक कर्म म्हणजे ज्या कर्मापासून सुख अथवा दु ख याचा विकार चित्तास होत नाही असा अर्थ पुष्कळ लोक समजतात हा अर्थ खरा आहे असे धरले तर सर्व चतुष्पाद प्राणी अहेतुक कर्म करीत असतात असें म्हटले पाहिजे. कांही जातींचे प्राणी आपलींच पिले भक्षण करतात आणि अशा वेळी कोणतेंही दुःख त्यांच्या चित्तास शिवत नाहीं. एखादा चोर दुसऱ्यास लुटून नागवीत असता सुखदु खाचा विचार न शिवण्याइतके त्याचे चित्त कठोर

बनले असेल तर तोही अहेतुक कर्म करितो असे म्हणावे लागेल वरील अर्थ बरोबर धरला तर दगडासारख्या कठीण अत करणाचे सर्व लोक अहेतुक कर्मे करणारे असतात असे म्हणावे लागेल खुनासारखी महापातके करणारे कठोर अत करणाचे लोक अहेतुक कर्में करतात असे म्हणावे लागेल या समोरच्या भितीला सुखदु.खाच्या भावना नाहींत त्याचप्रमाणे एखाद्या दगडालाही त्या नाहीत, पण असे आहे म्हणून तो अहेतुक कर्म करतो असे म्हणवत नाही असा अर्थ दुष्ट लोकाना शस्त्रासारखा मात्र उपयोगी पडेल. कोणतीही नीच कृत्ये करावी आणि त्याच वेळी आपली अहेतुकता सागावी असें होऊ लागेल 'अहेतुक कर्में करावी' या गीतेच्या वचनाचा असाच अर्थ असेल तर गीतेने एक मोठे भयकर मत प्रचलित केले असेच म्हटलें पाहिजे, पण या अनुज्ञेचा असा अर्थच नाही गीतेशी ज्याचा ज्याचा सबध येतो, त्या सर्व पुरुषाच्या चारित्र्याचे अवलोकन केले, तर त्याची वागणूक फारच निराळ्या प्रकारची होती असे दिसून येईल अर्जुनाने युद्धामध्यें भीष्म आणि द्रोण याचा वध केला ही गोष्ट खरी, तथापि लक्षावधि वेळीं त्याने आत्महिताचा यज्ञ केला व स्वत च्या आकाक्षा जाळून टाकून आपल्या क्षुद्र भावनाचा नाशही त्याने केला आहे

गीतेने कर्मयोग सागितला आहे आपण युक्त मनाने कर्म करावे असे गीतेचे सागणें आहे अशा प्रकारे योगयुक्त होऊन कर्म करीत असतां आपणातील क्षुद्र अहकाराची जाणीव आपणास नसते. योगयुक्त होऊन कर्म करीत असता 'मी' हे कर्म करीत आहे अशी जाणीव आपल्या ठिकाणी नसते पाश्चात्यास हे रहस्य कळावयाचे नाही ते म्हणतात की या अहकाराची—मीपणाची—जाणीव आपल्यातून नष्ट झाली तर आपणास कर्म करणें शक्य कसें होईल? पण ज्या वेळी हा अहकार टाकून व योगयुक्त होऊन आपण कर्म करीत असतो त्याच वेळी ते कर्म अधिक चागल्या प्रकारे होते हा अनुभव पुष्कळास आला असेल आपण पुष्कळ कामे केवळ उपजतबुद्धीने करीत असतो त्याची जाणीव आपणास होत नसते. अन्नाचे पचन होणे वगैरे कामें या प्रकारची आहेत त्याचप्रमाणे दुसरी कामें आपल्या जाणिवेने होत असतात. याशिवाय कर्माचा तिसराही एक प्रकार आहे. हीं तिसऱ्या प्रकारची कर्मे सामान्य जाणिवेच्या पलीकडे जाऊन आपण करीत

असतो त्या वेळीं 'मी' या क्षुद्र अहकाराची जाणीव आपणात उरलेली नसते. जणू काय, त्या वेळी समाधीत प्रवेश करूनच आपण कर्म करीत असतो.

एखादा चितारी आपला मीपणाचा भाव विसरून व त्या चित्राशी एकरूप होऊन ते रगवू लागला तर त्याच्या हातून अत्यत मनोरम चित्रें निर्माण होतील. चागला आचारी आपल्या हातातील पदार्थांशी एकरूप होऊन न्याचा पाक निर्माण करीत असतो. त्या वेळेपुरता त्याच्या अहकारचा लोप झालेला असतो तथापि केवळ एकाच कामाच्या सवयीमुळे ते लोक एकच काम उत्तम करू शकतात अशाच प्रकारे आपली सर्व कर्मेही उत्तम झाली पाहिजेत अशी गीतेची अनुज्ञा आहे योगस्थ होऊन जो मनुष्य परमेश्वराशी एकरूप झालेला असतो तो योगयुक्त होऊनच सर्व कर्मे करितो स्वत च्या फायद्याचा विचार त्याच्या चित्तास शिवत नाही अशा कर्मांच्या योगाने जगाचे बरे होते. अशा कर्मातून कसल्याही प्रकारच्या वाईट फलाची उत्पत्ति होणे शक्यच नाही अशा रीतीने कर्मे करणारे लोक केवळ स्वत साठी म्हणून कोणताही उद्योग करीत नाहीत

प्रत्येक कर्माच्या फलात बऱ्या वाईटाचे मिश्रण असते. ज्यात वाइटाचा यत्किंचित् अशही नाही असे एकही चागले कर्म नाही अग्नीभोवती जसा धूर ह्वा अवश्य असतो, त्याचप्रमाणे प्रत्येक कर्माला वाईटाचा अश नेहमी चिकटलेला असतो याकरिता ज्यात वाईटाचा अत्यत थोडा अश असेल आणि ज्यात चागलेपणाचे बरेच आधिक्य असेल असे कर्म आपण केले पाहिजे अर्जुनाने भीष्म व द्रोण याचा वध केला, पण त्याने असे केले नसते तर दुर्योधनास जिकता आले नसते, आणि तसें झाले असते तर असाधु लोकाचा विजय झाला असता, व देशावर मोठी आपत्ती कोसळली असती. दुरभिमानी अधर्मी लोकाच्या हातात देशाचा कारभार जाऊन लोकावर मोठी आपत्ती कोसळली असती अशाच रीतीने श्रीकृष्णानी कस, जरासध वगैरेचा वध केला हे राजे अत्यत जुलमी होते. भगवान् श्रीकृष्णाच्या या कर्मांत स्वतःच्या फायद्याचा कोणताही हेतू नव्हता. यातील प्रत्येक कर्म दुसऱ्याच्या बऱ्यासाठी त्यानी केले. मेणबत्तीचा दिवा लावून गीता वाचण्याचे पुण्यकर्म आपण करीत आहो पण याच वेळी हजारो कीटक जळून मृत्युमुखी जात आहेत. अशाच रीतीने प्रत्येक कर्माचा कोणता ना कोणता वाईट परिणाम अवश्य होत असतो. आपला क्षुद्र अह-

कार बाजूस ठेवून जे कर्मे करितात त्याना या वाईट अशाची बाधा होत नाहीं, कारण ते जगाच्या बऱ्यासाठी कर्मे करीत असतात कोणत्याही प्रकारचा हेतू न ठेवतां अनासक्त होऊन कर्म केले तर कर्त्याचे कल्याण होऊन त्याला मुक्ति मिळते भगवद्गीतेत श्रीकृष्णानी कर्मयोगाचे हेच रहस्य सागितले आहे

---

## ५

## साधनें.

—०—

तुमची अपक्राती होत गेली तर तुम्ही अविक निकृष्टावस्थेस जाता, उत्क्राती होत गेली तर तुम्ही अविक चागले होता, याकरिता अपक्रातीचा पगडा आपणावर बसणार नाही असे उपाय आपण योजिले पाहिजेत. या अभ्यासक्रमातील धडे या देशातच शिकणे हें माझे कर्तव्य आहे. परकीयाची वर्तणूक सुधारावी एतदर्थ आपण नित्य दक्षता बाळगीत असतो वास्तविक हीच आपली मोठी चूक आहे. आपण स्वत.च्या देहाचीच अधिक काळजी बाळगली पाहिजे आपल्या देहातील हृदय, काळीज इत्यादि इद्रिये उपजत बुद्धीच्या ताब्यात गेली आहेत त्याना प्रथम जाणिवेन आणले पाहिजे. आपल्या इच्छेप्रमाणे व आज्ञेप्रमाणे ही इद्रिये कम करतील अशा प्रकारे त्याचे नियमन आपण केलें पाहिजे एके काळी आपल्या काळजावर आपला ताबा होता. गाईला ज्याप्रमाणे आपली सर्व कातडी हालविता येते त्याचप्रमाणे एके काळी आपणासही करता येत होते. अत्यत कठीण प्रकारचे परिश्रम करून हे गेलेले सामर्थ्य ज्यानी पुन्हा परत मिळविले असे लोक माझ्या पाहण्यात आले आहेत एकवार ही शक्ति परत आली की ती कायमची आपल्या ताब्यात राहते आपल्या अनेक प्रकारच्या क्रिया आपल्या जाणिवेवाचून चालल्या आहेत या सर्व क्रियाची जाणीव आपण पुन्हा उत्पन्न करून घेतली पाहिजे आपल्या मोठ्या अभ्यासक्रमातील हा पहिला धडा असून आपल्या सामाजिक कल्याणासाठी तो शिकणे आपणास अत्यत जरूर आहे. उलटपक्षी केवळ जाणिवेचा अभ्यास आपण न केला तरी चालेल

आता सामाजिकदृष्ट्या आपण न केला तर चालेल असाही या अभ्यासाचा एक भाग आहे. हा भाग म्हणजे शुद्ध मुक्तिमार्गाचा अभ्यास या अभ्यासाने जीवात्म्याला मुक्ति मिळते. अधाराच्या ठिकाणी प्रकाश उत्पन्न होतो. आपले पाश गळून पडतात अथवा तुटतात अज्ञानाधकारातून आपला मार्ग सुखकर होतो समाधि हें या अभ्यासाचे अखेरचे साध्य आहे. या समाधिस्थितीला पोंचलेला मनुष्य परमेश्वरस्वरूप होतो तो मुक्त होतो. अशा रीतीने दृश्यापलीकडे उड्डाण करण्याचे सामर्थ्य ज्या मनाला प्राप्त झालेले असतें त्या मनाला या विश्वात गूढ असे काहीच उरत नाही सर्व विश्व आपले रहस्य त्याजपुढे उघड करते या विश्वरूपी ग्रथातील धड्यामागें धड्याचा अभ्यास ते मन करते, व अशा रीतीने अखेरच्या साध्यापर्यंत ते पोंचते की ज्या ठिकाणी मृत्यु आणि जीवित या दोहोंसही अस्तित्व नाही. अशा स्थितीत सत्य वस्तूची ओळख आपणास होते व आपण सत्य वस्तूच होतो

आपला आयुष्यक्रम स्वस्थपणे व दगदग न होता चालेल असा करणे हे अवश्य आहे. उदरभरणासाठी सारा दिवस मला रखडपट्टी करावी लागली, तर या आयुष्यक्रमात काही उच्चप्रतीचे कार्य साधणे मला फारच जड जाईल कदाचित् पुढल्या जन्मी याहून अधिक बऱ्या परिस्थितीत मला जन्म मिळेल, पण खरोखर माझी इच्छा तितकी प्रबळ असेल, तर याच जन्मींही परिस्थिति बदलेल अत्यत प्रबळ इच्छा उत्पन्न झाली असता तिची तृप्ति झाली नाही असे कधीच होऊ शकत नाही कारण इच्छापूर्तीकरिताच शरीर निर्माण झाले आहे बाहेर उजेड आहे म्हणून आपल्या मस्तकात डोळे उत्पन्न झाले आहेत. उजेडाचे अस्तित्व नसते तर आपले डोळेही उत्पन्न झाले नसते. आवाजाचे अस्तित्व आहे म्हणून कान उत्पन्न झाले आहेत, जे काही पहावयाचे अथवा ऐकावयाचे त्याचे अस्तित्व अगोदर असल्यामुळे ते पाहण्याकरिता अथवा ऐकण्याकरिता आपण निरनिराळीं इद्रिये उत्पन्न केली आहेत आणखी एक लाख वर्षांनी अथवा कदाचित् त्याच्याही अगोदर विद्युत् आणि तशाच प्रकारचे इतर पदार्थ पाहण्याची इद्रिये आपण निर्माण करू. जे मन शात स्थितीला पोंचलेले असते त्याला कोणतीही इच्छा नसते. बाह्य पदार्थांचे अस्तित्व प्रथम असेल तेव्हाच त्याज-

बद्दल इच्छा उत्पन्न होईल बाह्य वस्तू जणूकाय आपल्या देहाला भोक पाडून मनात शिरण्याचा यत्न करीत असते याकरिता आपल्या मनाच्या वाढीला पोषक अशा प्रकारची शाततेची परिस्थिति आवश्यक आहे अशी इच्छा उत्पन्न होऊ लागते, तेव्हा त्या इच्छेचीही तृप्ति अवश्यमेव होईल माझ्या स्वत च्या अनुभवावरून हे मी तुम्हास सागतो. या माझ्या अनुभवावर तुम्ही खुशाल विश्वास ठेवा कदाचित् एखादी इच्छा तृप्त होण्यास हजारो जन्म घ्यावे लागतील, पण अखेरीस ती इच्छा तृप्त झाल्यावाचून राहणार नाही याकरिता त्या इच्छेला एकसारखे चिकटून रहा इच्छातृप्तीकरिता ज्या पदार्थांची आवश्यकता आहे तो पदार्थ आधी अस्तित्वात नसेल तर इच्छाच होणार नाही. तथापि इच्छेइच्छेत फरक असतो हेही अवश्य लक्षात ठेविले पाहिजे. एकदा एक सद्गुरु आपल्या शिष्यास म्हणाले, "बाळा, तुला परमेश्वराच्या भेटीची इच्छा असेल तर परमेश्वर तुजकडे चालत येईल" गुरूच्या या म्हणण्याचे रहस्य शिष्याच्या लक्षात येईना पुढे एके दिवशी स्नानासाठी ते दोघेही नदीवर गेले असता गुरूने शिष्यास नदीत बुडी मारण्यास सागितले. गुरूच्या आज्ञेप्रमाणे शिष्यानें नदीत बुडी मारताच गुरु त्याच्या खाद्यावर चढून बसले व त्यानी त्याला तसेच पाण्यात दाबून धरले. बराच वेळ धडपडून शिष्य थकला असे पाहून गुरूने त्याला सोडून दिले. तो बाहेर आल्यानतर गुरूने त्याला विचारले, "मुला, पाण्यात तुला काय वाटले?" शिष्याने उत्तर दिले, "महाराज, एका श्वासापुरती तरी हवा मिळावी इतकीच इच्छा मला झाली " "परमेश्वराच्या भेटीची तुझी इच्छा इतकी तीव्र आहे काय?" "नाही महाराज " "तर मग तुझी आतुरता तितकी तीव्र झाली म्हणजे परमेश्वर तुला भेटेल "

ज्यावाचून आपले जीवितही आपणास जड वाटू लागते त्या वस्तूची प्राप्ति आपणास झालीच पाहिजे, कारण, तिची प्राप्ती आपणास न झाली तर जगणेंही आपणास अशक्य होईल.

तुम्हास योगाभ्यास करावयाचा असेल तर सर्व दगदगीतून तुम्ही मोकळे झालें पाहिजे. सर्व प्रकारच्या काळजीतून मुक्त अशी परिस्थिति तुम्ही आपणाभोवती ठेविली पाहिजे आयुष्यक्रम चैनीने आणि सुखाने चालावा व त्याबरोबरच आत्मानुभवही व्हावा अशी इच्छा करणारा मनुष्य महामूर्ख होय

एका मनुष्याला नदींतून पलीकडे जावयाचें होतें. तेव्हा नदीच्या काठीं पडलेल्या एका सुसरीला लाकडाचा ओंडका समजून त्यानें मिठी मारली. चैनीचा आयुष्यक्रम आणि आत्मानुभव यांची सांगड घालू पहाणाऱ्या मनुष्याचें शहाणपण याच कोटीतलें आहे. जो कोणत्याही वस्तूची पर्वा बाळगीत नाहीं त्याजकडे साऱ्या वस्तू आपण होऊन धावत येतात. दैव हे एखाद्या रंगेल स्त्रीसारखे आहे. त्याच्यामागें जे लागतात त्यांजकडे तें ढुकूनही पाहत नाहीं; पण त्याची पर्वा जे करीत नाहींत त्याच्या गळीं तें पडतें. ज्याला पैशाची पर्वा नाहीं त्याजवर सोन्याचा पाऊस पडतो. अशाच रीतीनें पर्वा न करणाऱ्या मनुष्याच्या गळीं कीर्तीही पडते; इतकी कीं, त्या कीर्तीचा त्याला त्रास वाटू लागतो. ती त्याला ओझ्यासारखी जड वाटू लागते. कीर्ती आणि संपत्ति हीं धन्याच्या गळीं पडतात. गुलामाला या जगात कशाचीही प्राप्ती व्हावयाची नाही. कीर्ती, संपत्ति इत्यादि पदार्थावांचून जो आपलें यत्किंचितही अडू देत नाहीं, आणि असल्या पदार्थांवर ज्याचें जीवित यत्किंचितही अवलंबून नाहीं तो धनी होय. केवळ एकच साध्य आपणापुढें असावें व तेंच साधण्याकरिता आपलें आयुष्य वेचावें. त्या साध्यानें आपलें मन इतकें भारून गेलें पाहिजे कीं त्यावांचून दुसरी कोणतीही वस्तु राहण्याइतका अवकाश आपल्या मनांत राहू नये. दुसऱ्या वस्तूच्या चिंतनाकडे एक क्षणही खर्चू नये.

आपलें सारें सामर्थ्य, सारा वेळ, सारें शहाणपण—किंबहुना आपला सारा देह पैसा मिळविण्याकरिता कित्येक लोक कसा खर्च करितात ! घांसभर अन्न खाण्याला सुद्धा त्याना वेळ नसतो. पुरतें उजाडले नाहीं तों घरा बाहेर पडून ते कामास जुंपतात. असल्या लोकांपैकीं शेंकडा नव्वद लोक श्रीमंत होण्यापूर्वीच मरतात, आणि जे दहा श्रीमंत होतात त्याचें उपभोगाचें सामर्थ्य नाहींसें झालेलें असतें ! कशी मौज आहे ! श्रीमंत होण्याचा यत्न करणें वाईट आहे असें मी म्हणत नाहीं. या कामीं लोक जें सामर्थ्य खर्च करितात ते खरोखर आश्चर्यजनक असते. यावरून काय निष्पन्न होते ? हेंच कीं, श्रीमंत होण्याकरितां जें सामर्थ्य मनुष्य खर्च करितो तेंच मुक्तीच्या मार्गांतही त्याला खर्च करितां येईल. पैसा आणि बाकीचे सर्व ऐहिक विषय यांचा त्याग मरतांना आपणास करावा लागतो हें आपण जाणतों आणि असें असताही त्याच्या प्राप्तीसाठीं आपण किती धडपड करतों पहा ! मग तेंच आपण मनुष्य प्राणी

असतां जें सदैव टिकणारें आहे आणि जें कधींही मलीन होत नाहीं तें मिळविण्यासाठीं आपण हजारों पटीनें अधिक सामर्थ्य आणि अधिक चिकाटी खर्च करूं नये काय ? आपलीं शुभ कृत्ये आणि आपलें आत्मिक सामर्थ्य हींच मृत्यूनतर आपणाबरोबर येणारीं आहेत. आपला खरा मित्र कोणी असेल तर तीं आपलीं सत्कृत्येंच होत; बाकीच्या साऱ्या वस्तू देहाबरोबर येथेच मागे रहावयाच्या आहेत.

आपलें साध्य सिद्ध व्हावें अशी उत्कट इच्छा उत्पन्न होणे हेंच अत्यत महत्त्वाचें आहे. या कार्यांतील पहिली पायरी हीच आहे. यानतर बाकीचे कार्य आपोआप होऊं लागतें. हिंदुस्थानच्या भूमीनें जो मोठा शोध लाविला तो हाच. सत्प्राप्तीसाठी वाटेल ते परिश्रम करण्यास हिंदुस्थानातील लोकच तयार होतात; पण पाश्चात्य देशाची गोष्ट वेगळी. येथें सर्व देहयात्रा सुलभ करण्याकडे लोकांचे लक्ष आहे. सत्यवस्तूच्या प्राप्तीची चाड त्याना नाहीं. मनुष्य प्राण्याची वाढ व्हावी हेच त्याचे अतिम साध्य आहे. अहमहमिका अथवा चढाओढ हा आपल्या आयुष्यातील मोठा शिक्षक आहे. चढाओढींत आणि धडपडींत दिवस जाणें हें आपल्या फार फायद्याचे आहे हें सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखे आहे. चढाओढींतून गेल्याशिवाय मोक्षाचा मार्ग आपणास दिसावयाचा नाही. स्वर्गाचा रस्ता नरकातून जातो हें लक्षात पाहिजे. नरकातून गेल्याशिवाय स्वर्ग दिसावयाचा नाहीं. अनेक प्रकारच्या परिस्थितीशी झगडत असतां जीवात्म्यास मरण आले व अशा रीतीने पुन्हा पुन्हा जन्ममरणाच्या चक्रातून तावून सुलाखून तो बाहेर पडला म्हणजे तो प्रचड सामर्थ्यवान् बनतो. अशा स्थितीत आपलें साध्यही त्याला क्षुद्र वाटू लागते. ज्या साध्यासाठीं आपण एवढी धडपड केली ते आपणा स्वत हून किती कमी दर्जाचे आहे हे त्याच्या लक्षात येते. मी स्वत.च माझें साध्य आहे. कारण मजहून उच्चतर असा दुसरा कोणता पदार्थ आहे ? सोन्याच्या नाण्याची थैली माझें साध्य होऊ शकेल काय ? नाहीं, कधीही नाहीं. मी स्वत. कोण आहें हें जाणणें हेंच माझे अखेरचें साध्य आहे. आत्मज्ञानावाचून दुसरी कोणतीही गोष्ट माझे अखेरचें साध्य होऊ शकत नाही.

सर्व प्रकारें वाईट अशी एकही वस्तु या जगांत नाहीं. देव आणि दैत्य या दोघांचाही समावेश होण्याइतका अवकाश या जगांत आहे. दैत्याला येथे

जागा नसती तर तो येथे राहिलाही नसता. स्वर्गाचा मार्ग नरकांतून जातो असें मीं नुकतेंच म्हटलें हें तुम्हाला आठवत असेलच. आपण आपल्या मार्गांत चुका करीत असलों तरी कांहीं हरकत नाहीं. एकसारखे पुढें चला. अयोग्य असें एखादें कर्म आपल्या हातून घडलें तरी त्याकडे मागें वळून पाहू नका. पूर्वी आपण चुका केल्या नसत्या तर हल्लींची स्थितिसुद्धां आपणास प्राप्त झाली नसती हें तुम्हांस ठाऊक आहे काय ? तुमच्या हातून चुका होत असतांही तुम्ही पुढें पाऊल टाकलें म्हणून आजच्या स्थितीस आलां. तर मग त्या चुकांनाही आशीर्वाद द्या. तुम्हांला नकळतही मित्रासारख्या त्या तुमच्या उपयोगी पडल्या आहेत. दुःखाचेही बरें होवो, आणि सुखालाही आशीर्वाद असो. आपल्या परिस्थितीची काळजी करीत बसूं नका, आणि साध्याकडील नजर दुसरीकडे जाऊं देऊं नका. त्या साध्याच्या दिशेनें एकसारखे पुढें पुढें चला. बारक्या सारक्या चुकाकडे आणि भोगाव्या लागणाऱ्या कष्टाकडे लक्ष देऊं नका. या आपल्या युद्धभूमींत चुकांचा धुरळा उडालाच पाहिजे. असल्या धुळीचा मार सहन न करण्याइतकी ज्यांची कातडी नाजुक असेल त्यांनीं रणभूमी सोडून पळून जावें हेंच इष्ट.

तर मग पैसा मिळविण्याकरितां अथवा ऐहिक सुखोपभोग मिळविण्याकरितां जी चिकाटी आपण दाखवितों त्याहून शेंकडों पटीनें अधिक चिकाटी व अधिक निश्चय या धडपडींत आपण दाखविला पाहिजे हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. हीच पाहिली मोठी आगाऊ तयारी होय.

ही तयारी सुरू असतां याबरोबर विवेकही पाहिजे. सदोदित ध्यानस्थ राहण्याचा यत्न करा. ध्यानस्थ राहतां येणें हें अत्यत महत्त्वाचे आहे. ध्यानस्थ मन हें समाधीच्या अत्यत जवळ असते. ज्या एखाद्या क्षणी आपणास अशी अतर्मुखता प्राप्त होते व ज्या क्षणीं ऐहिक विषयांपासून आपण पूर्ण पराङ्मुख झालेले असतों तो क्षण आपल्या आयुष्यातील फार मोठ्या महत्वाचा क्षण होय.

हा देह जसा आपला शत्रु तसाच आपला मित्रही आहे. दुःखोत्पादक असा देखावा अगदीं थंड्या मनानें कितीकांस सहन करतां येईल ? पण तेच एखाद्या चित्रांत तसा देखावा दाखविला असला तर आपण खुशाल त्याकडे पाहत असतों. कारण, ती वस्तुस्थिति नाहीं अशी जाणीव आपणास असते.

यामुळें त्याशीं आपला ऐक्यभाव होत नाहीं. कारण, तें केवळ चित्र आहे हें आपणास ठाऊक असतें. तें आपणास सुख देऊं शकत नाहीं अथवा दुखा-पतही करू शकत नाहीं. अत्यत दुःखोत्पादक असा देखावा एखाद्या चितान्यानें काढला असला तर तो पाहून आपणास कदाचित् आनंदही होईल. चितान्याच्या कौशल्याची आपण तारीफ करू, त्याच्या कुशाग्रबुद्धीचें आपणास नवल वाटेल; तो देखावा अत्यत भयकर असतांही त्याचा भयकरपणा आपणास जाणवणार नाहीं. यांतील रहस्य हेंच कीं त्यातील देखाव्याबद्दल आपण उदासीन असतों. त्यांतील सुखदुःखाचा परिणाम आपल्या चित्तावर झालेला नसतो. त्या ठिकाणीं आपण नुसते साक्षी असतों. हीच गोष्ट नित्य लक्षांत बाळगून व्यवहारांतही आपण साक्षी व्हावें.

"मी केवळ साक्षी आहें ही कल्पना आपल्या ठिकाणीं मुरून जाईपर्यंत प्राणायाम अथवा दुसरा कोणताही हठयोगाचा अभ्यास आपल्या उपयोगीं पडणार नाहीं. परिस्थिति तुम्हांस अतिशय त्रास देऊ लागली तर मी साक्षी आहें एवढेंच म्हणत जा. मी चित्स्वरूप आहें, कोणतीही बाह्य उपाधी मला उपसर्ग लावू शकणार नाहीं" असें म्हणत जा. कोणतेही दुर्विचार चित्तांत उठले तर 'मी चित्स्वरूप आहें, मी साक्षी आहें, मी आनंदरूप आहें,' या विचारानें त्या दुर्विचारांच्या मस्तकांवर प्रहार करा; 'मला कोणतेंही कर्तव्य उरलें नाहीं; दुःख भोगण्याचें कारण मला नाहीं, मी कर्तव्यातीत आहें, मी साक्षी आहें; या विश्वरूप पदार्थसंग्रहालयातील चित्रसंग्रहालयात मी फिरत असून एकामागून एका चित्राकडे अवलोकन करीत आहें; हीं चित्रें सुखोत्पादक असलीं अथवा दुःखदायक दिसत असलीं तरी तीं सर्वच चांगलीं आहेत. वास्तविक पाहता मला इच्छा ही प्रोत्साहन देत नाहीं अथवा अनिर्वाह्यपणेंही मजकडून काहीं घडत नाहीं. जें कांहीं आहे तें सर्व तोच आहे. ती विश्वमाता खेळांत मग्न झाली असून आम्ही सर्व बाहुलीं आहोंत, तिच्या खेळात तिला आम्ही मदत करीत आहों. एका क्षणीं एका बाहुल्याला भिकाऱ्याचा पोषाख ती घालते आणि दुसऱ्याच क्षणीं राजाच्या आभरणांनीं त्याला ती सजविते. त्याच्या पुढील क्षणीं एखाद्याला संताचा पोषाख ती देते व आणखी एखाद्याला दैत्याचें स्वरूप देते. आपण सर्व निरनिराळे पोषाख करून त्या जगन्मातेच्या खेळांत तिला मदत करीत आहों.'

मूल खेळांत दग असलें म्हणजे आईनें हाक मारली तरी आपला खेळ सोडून तें येत नाहीं; पण खेळ संपला कीं आईनें नको म्हटलें तरी तें तिजकडे धांवत जाऊन तिला मिठी मारतें. आपल्या आयुष्यांत अशा प्रकारचा क्षण केव्हां तरी येतो कीं आपला खेळ संपला आहे असें आपणास वाटतें. त्या वेळीं आपल्या मातेकडे परत जाण्याची इच्छा आपणांस होते. अशा स्थितींत ऐहिक विषयांसाठीं केलेल्या कोणत्याही परिणामांचा उपयोग होत नाहीं. स्त्रीपुत्रादि मनुष्यें आपले सखेसोयरे, सपत्ति, कीर्ति, आपल्या आयुष्यांतील आनदाचे व उत्साहाचे प्रसग, आपले जयापजय, हीं सर्व मागें राहतील. अशा स्थितींत हे सर्व आयुष्य निव्वळ दिखाऊ खेळासारखें आहे असें आपणास कळून येईल. समातर गतीनें या विश्वाचे स्पद अखडपणें चालू असून ते कां चालले आहेत हें आपणास समजत नाहींसें होतें. या सर्व गतीचा अतिम परिणाम काय हेंही आपणास समजत नाहीं; तथापि आपला खेळ संपला आहे एवढी जाणीव मात्र आपणास होते.

---

## ६

## विश्व आणि आत्मा.

—०:—

विश्वांतील प्रत्येक वस्तु अत्यत सूक्ष्म अशा बीजातून निर्माण झाली आहे. हें बीज अधिकाधिक स्थूल होत जाते, नतर काहीं काळ त्याच स्थितींत राहतें व पुन्हा आपल्या मूलरूपास परत जाते. उदाहरणार्थ आपली ही पृथ्वी धूम्रमय स्थितींतून अधिकाधिक थड होत जाऊन हल्लींचें कठीण रूप तिला प्राप्त झालें आहे. भविष्यत् कालीं या पृथ्वीचे पुन्हा तुकडे होऊन ती आपल्या धूम्ररूपास परत जाईल. हीच घटना अनतकालापासून साऱ्या विश्वांत चालू आहे. साऱ्या मनुष्यजातीचा, साऱ्या प्रकृतीचा अथवा साऱ्या जीविताचा इतिहास म्हटला तर इतकाच.

प्रत्येक उत्क्रांतीच्या पाठीमागें अपक्रांति असते. प्रत्येक वृक्षाचें मूळकारण जें बीज त्या बीजांत तो वृक्ष सामर्थ्येंकरून असतो. रेतबिंदूत सर्व मनुष्य प्राणी सामावलेला असतो. सूक्ष्म विश्वांत हें सारें जड विश्व

समाविष्ट झालेले असतें. प्रत्येक वस्तु अशाच रीतीनें आपल्या कारणरूपांत समाविष्ट झालेली असते. हळूहळू तिला अधिकाधिक जडस्वरूप प्राप्त होऊन तिची उत्क्रांति होते हें खरें, तथापि प्रत्येक उत्क्रातीच्या मागें अपक्रांतीही अवश्य असतेच. हें सर्व विश्व स्पष्टतेस येण्यापूर्वी सूक्ष्म रूपांत असलें पाहिजे. त्या सूक्ष्म रूपातून हल्लीं दिसणाऱ्या निरनिराळ्या आकारांच्या रूपानें त्याची उत्क्राति झाली असली पाहिजे. कालेंकरून त्याची पुन्हां अपक्राति होईल व आपल्या मूल रूपास ते परत जाईल. एका झाडाचेंच उदाहरण घ्या. झाड वाढते, पुष्ट होते व पुढे त्यांत विघटना होऊन त्याला मृत्यु येतो. अशा रीतीने जगणें आणि मरणें या दोन गोष्टींमुळें त्याला वैयक्तिक अथवा विशिष्ट रूप असतें. अशा रीतीनें या विश्वाच्या सांखळीतील झाड हा एक दुवा घेतला तर त्यावरून सर्व साखळीची कल्पना आ णास करता येईल. या सांखळींतील मनुष्य हा एक दुवा आहे व निरनिराळ्या प्रकारचे पशू, क्षुद्र कीटक व झाडें झुडपें हा दुसरा दुवा आहे. आता ज्या अत्यत सूक्ष्म बीजांतून याची उत्पत्ती झाली त्या बीजाचा विचार करा; व हीं सर्व मिळून विश्वरूप एकच जीवित आहे असें समजा. म्हणजे एकीकडे उत्क्रांति सुरू असता त्याच क्षणीं दुसरीकडे अपक्राति सुरू होती असें तुम्हास आढळून येईल.

ज्या ठिकाणीं आरंभ त्याच ठिकाणीं अत. या विश्वाचा शेवट कोठें होतो? बुद्धींत होतो असेंच नाही काय? उत्पत्तीच्या साखळीतील अखेरचा दुवा बुद्धि हा आहे, असें उत्क्रांतिवादी म्हणतात. असें आहे त्या अर्थी सर्व उत्पत्तीचा आरंभ अथवा तिचें कारण बुद्धि हेंच असलें पाहिजे. आरंभीं बुद्धीचें अपक्रमण झालेले असतें आणि अखेरीस तिचे उत्क्रमण होऊ लागतें. या विश्वांत जें बुद्धीचें सकलित रूप आहे तेंच अपक्रमित स्वरूपात असून तेंच पुढें उत्क्रात होऊं लागतें. बुद्धीच्या याच सकलित रूपास आपण परमेश्वर असें नांव देतों. याच ईश्वरस्वरूपापासून आपण उत्पन्न होतों; आणि त्याच स्वरूपांत आपण परत जातों असें श्रुतिवचन आहे. या मूल रूपाला तुम्हीं कोणतेही नाव दिलें तरी आरंभीं अनत विश्वरूपी बुद्धीचा वास आहे, हें तुम्हांस नाकबूल करतां यावयाचें नाहीं.

एखादें मिश्रण कसें निर्माण होतें? ज्या ठिकाणीं मूळ कारणें एकत्र होऊन तींच कार्यरूप होतात तेथें मिश्रण निर्माण होतें. याकरितां ज्या मिश्र वस्तु

आपणास दिसत आहेत, त्या कार्यकारणाच्या कायद्याच्या मर्यादेंतीलच असल्या पाहिजेत. जोंपर्यंत कार्यकारणाच्या नियमांची अमलबजावणी होत आहे, तोंपर्यंतच मिश्र आणि प्रतिमिश्र वस्तूची उत्पत्ति होणें शक्य आहे. त्या कायद्याच्या पलीकडे मिश्र वस्तूबद्दल बोलणेंच अशक्य आहे. कारण त्या ठिकाणीं कोणत्याही कायद्याची अमलबजावणी होऊ शकत नाहीं. आपल्या पचेंद्रियांनीं जें विश्व आपण पाहतो, ज्याची आपण कल्पना करतों, ज्याचा स्वप्नानुभव आपण घेतों अथवा ज्याला आपण स्पर्श करतों, तेवढ्याच मर्यादेंत कायदा लागू आहे. या मर्यादेपलीकडे कोणत्याही कायद्याची कल्पनासुद्धां संभवत नाही. जें आपल्या इंद्रियाच्या आटोक्यात येऊ शकतें अथवा ज्याची आपण कल्पना करू शकतों आणि जें आपण प्रत्यक्ष पाहतों अथवा मनात कल्पू शकतों ते आपले विश्व होय. देहापलीकडे आहे ते इंद्रियांपलीकडे आहे आणि जें मनापलीकडे आहे ते अर्थातच कल्पनेपलीकडे आहे. यामुळें तें विश्वाच्या बाहेर आहे हें उघड होय. आणि ज्या अर्थी ते विश्वबाह्य आहे त्या अर्थी कार्यकारणाच्या कायद्याच्या पलीकडेही तें आहे. मनुष्याचा आत्मा हा कार्यकारणाच्या कायद्यापलीकडला असल्यामुळें तो मिश्र अथवा निर्मित पदार्थ नाही. तो अमक्या कारणातून उत्पन्न झाला असे नाहीं; यामुळें तो सदा स्वतंत्र आहे; आणि तसेंच कायद्याच्या मर्यादेंत जें काही आहे त्याचा तो शास्ता आहे. तो मिश्र पदार्थ नसल्यामुळें तो मरणें कधीही शक्य नाही; कारण मृत्यू म्हणजे ज्या घटकाचा तो मिश्र पदार्थ बनलेला असतो त्या मूल घटकरूपास तो परत जाणें होय. विनाश म्हणजे कार्यरूपाचे कारणरूप होणें होय. ज्या अर्थी आत्मा मरूं शकत नाहीं त्या अर्थी तो जन्मासही येऊं शकत नाहीं, कारण जीवित आणि मृत्यु हीं एकाच वस्तूची दोन प्रकारचीं दृश्य अथवा स्पष्ट रूपें होत. अर्थात् आत्मा हा जीवित आणि मृत्यु या दोहोंच्याही पलीकडचा आहे. ज्या अर्थी तुम्ही कधीं जन्मासच आला नव्हता त्या अर्थी तुम्ही कधीं मरणारही नाही. जन्म आणि मृत्यु हीं फक्त देहासच लागू आहेत.

हें सर्व दृश्यरूप एकरूपच आहे असें अद्वैत मत सांगतें. स्थूल अथवा सूक्ष्म यांपैकीं कोणत्याही रूपात विश्व असलें तरी तें एकरूपच आहे. कार्य आणि कारण हीं दोन्हीही येथेंच आहेत. जें पिंडीं तेच ब्रह्मांडीं असा नियम

आहे. ब्रह्मांडांत जें प्रचंड रूपानें असतें तेच पिंडात अल्प रूपानें असतें. आपल्या स्वत:चाच अभ्यास करून विश्वाचें स्वरूप आपणास जाणतां येतें. आपल्या स्वत:च्या ठिकाणीं जे कायदे लागू पडतात तेच बाह्य विश्वांतही लागू पडतात. निरनिराळ्या आत्म्यांचें जें समीकरण तेंच एकरूप विश्व. यामुळें जें काहीं विश्वरूपानें दिसत आहे त्याचेच लहान लहान अंश आपण आहों. आपण दृश्य स्वरूपात असतों तेव्हा आपण वेगवेगळे दिसतो, तथापि वस्तुत: आपण एकरूपच आहों. या विश्वरूपापासून आपण भिन्न आहों असें जों जों अधिक प्रमाणानें आपणास वाटत असते तों तों आपण त्या प्रमाणानें अधिक दु:खी असतो. याकरिता सर्व नीतिशास्त्राचा पाया अद्वैत हाच होय.

---

## ७

## खरा गुरु कोण ?

गुरु आणि शिष्य अशी परंपरा कायम ठेवून त्याद्वारे चैतन्यशक्तीचा प्रसार जो करतो व ज्यापाशी त्या शक्तीचा ठेवा असतो तो खरा गुरु होय. या चैतन्यशक्तिदानाचे काम पिढ्यानूपिढ्या तो करीत असतो. वेळोवेळा या शक्तीचा ओघ बदलत असतो. ज्याप्रमाणें एखादा प्रचंड प्रवाह जुना मार्ग सोडून नव्या मार्गानें वाहू लागतो, त्याचप्रमाणें हा चैतन्यशक्तीचा ओघ कालेंकरून नव्यानव्या मार्गानें वाहत असतो. यामुळेंच जुने धर्मपथ कालांतरानें निर्जीव होतात, व त्या जागी नवे पंथ नव्या जोमानें उत्पन्न होतात. ज्या पथांतून या चैतन्यशक्तीचा प्रवाह वाहत असतो, त्याच पथांचा स्वीकार खरे शहाणे लोक करतात. एखाद्या पदार्थसंग्रहालयांत प्रचंड प्राण्यांचे निर्जीव सांगाडे ज्याप्रमाणें मांडून ठेवलेले असतात, त्याच प्रमाणें जुने धर्मपथ निर्जीव झालेले सांगाडे होत. त्यांना योग्य तो सन्मान आपण द्यावा. तथापि त्यांजपासून मनाची शांति होते असें मात्र नाहीं. मेलेलें आंब्याचें झाड ज्याप्रमाणें आंबे खाण्याची इच्छा तृप्त करू शकत नाहीं, त्याच प्रमाणें मृत पंथ मनाची तळमळ शांत करू शकत नाहीत.

आपणास पुष्कळ धर्मज्ञान आहे अशी जी घमेंड आपणास असते ती सर्वथैव टाकून देऊन गुरूच्या हातीं स्वत स पूर्णपणें सोंपवून देणें हें प्रथम अत्यत अगत्याचें आहे. पूर्णत्वाकडे जाण्यास आपणास योग्य मार्ग कोणता हें एक गुरूलाच ठाऊक असतें. आपणास याबद्दल काहींसुद्धां समजत नसतें. अशा प्रकारची लीनता आपल्या ठिकाणीं बाणली म्हणजे आपल्या अंतःकरणाचें कपाट खुलें होऊन सत्याचा प्रवेश तेथे होणें सुलभ होईल. अहकाराची यत्किंचितही छटा आपल्या ठिकाणी शिल्लक असेल तोंपर्यंत सत्यवस्तूचें दर्शन आपणास कधीही होणार नाहीं. या अहकाररूपी राक्षसाचे उच्चाटन आपल्या मनातून करण्यास आपण सर्वांनी झटले पाहिजे. पूर्ण लीनता आंगीं बाणणें हा चैतन्यप्रभेकडे जाण्याचा एकच मार्ग आहे.

---

## ८

## कला.

—०—

अत्यत बारीक सारीक तपशिलांतही प्रकृतीचें अनुकरण करणें हा ग्रीक कलेचा विशेष होय. त्याचप्रमाणें अत्युच्च साध्य स्पष्ट करणें हा हिंदी कलेचा विशेष होय. एखादा ग्रीक चितारी मांसाच्या तुकड्याचे चित्र काढू लागला तर तें इतकें अस्सलाबरहुकूम काढील कीं त्यामुळें एखादा कुत्रासुद्धा फसून जाऊन त्यास डास मारावयास लागेल. अशा रीतीने केवळ प्रकृतीचे अनुकरण करणें यांत विशेष तें काय ? त्या कुत्र्यापुढें खऱ्या मांसाचा तुकडाच का ठेवू नये ?

उलटपक्षीं आपलें काल्पनिक साध्य प्रेक्षकापुढें ठेवावयाचें असा हिंदु चितार्‍याचा कल असतो. जें आपल्या इद्रियाच्या आटोक्यांत येऊ शकत नाहीं, अशा आपल्या ध्येयाचें अथवा साध्याचे प्रत्यक्ष चित्र काढण्याच्या नादीं पडून हिंदु चित्रकार अखेरीस विचित्र आणि ओबडधोबड मूर्ती रंगवू लागेल. खऱ्या कलेचें साम्य दाखवावयाचे म्हटलें तर तें कमळाशीं दाखवितां येईल. कमळ जमिनींतून वर येतें. जमिनींतूनच त्याचें पोषण होतें; तथापि जमिनीपासून वर अधांत्रीं तें राहते. अशीच कलेचीही गोष्ट असली पाहिजे. प्रकृतीशीं असलेला तिचा संबध तुटू नये; तिचा प्रकृतीशीं सबंध

तुटला तर तिचें अध.पतन होते याकरिता प्रकृतीशी तिचा संबध अवश्य असावा; पण असा सबध असताही प्रकृतीपासून ती उच्च ठिकाणीं असावी.

सौदर्याचें प्रत्यक्ष दर्शन जी करविते ती कला. प्रत्येक गोष्टींत कला असली पाहिजे

बांधकामाची कला आणि इमारत यातील फरक हा आहे कीं बांधकाम काल्पनिक साध्य दाखवीत असतें आणि इमारत ही केवळ काटकसरीच्या दृष्टीनें बाधलेलें बाधकाम होय कोणत्याही जड वस्तूला जी वास्तविक किंमत असते ती एकाच बाबीवर अवलबून असते कोणतेही साध्य अथवा कोणतीही कल्पना चित्तात भरून देण्याचें सामर्थ्य ज्या मानानें जड वस्तूत असेल त्या मानानें तिची किंमत अथवा तिचें महत्व असतें

कलेची दृष्टि श्रीरामकृष्ण याजपाशीं फार उच्च प्रतीची होती. अशा प्रकारची दृष्टि प्राप्त झाल्यावांचून मनुष्याला चैतन्य प्राप्त व्हावयाचें नाहीं असें ते म्हणत

---

९

## भाषा.

—०—

साधेपणा भाषेचें रहस्य होय. माझे सद्गुरु जी भाषा वापरीत ती खरोखरच नमुनेदार होती माझ्या दृष्टीनें ती अत्युच्च प्रतीची भाषा होय. सामान्य लोक जी भाषा बोलत तीच ते वापरीत तथापि तींत उच्च प्रतीचें अर्थसौष्टव असे. जो विचार लोकाच्या मनांत ठसवावा अशी त्यांची इच्छा असे तो विचार त्यांची भाषा उत्तम रीतीनें व्यक्त करी.

बगाली भाषा थोड्या अवधीत पूर्णत्वास आणण्याची जी खटपट सुरू आहे तीमुळें ती भाषा नियमबद्ध मात्र होईल. वास्तविक पाहतां बगालींत क्रियापदें नाहींत. मायकेल मधुसूदन दत्त यांनीं आपल्या कवितेंत हा उणेपणा नाहींसा करण्याचा यत्न केला. 'कविकक्रण' हे बंगाल्यांतील सर्वांत मोठे कवि होत. श्रीपतजलीचें महाभाष्य हा संस्कृत गद्याचा उत्तम नमुना होय. त्या भाषेंत जोरदारपणा चांगला आहे. हितोपदेशाची भाषा वाईट नाहीं; पण कादबरीची भाषा मात्र सस्कृत भाषेच्या पतनाचा नमुना आहे.

बगाली भाषेची सुधारणा करणें असेल तर तिला संस्कृत भाषेचें वळण न देता ते पाली भाषेचे द्यावे. पाली भाषा बगालीच्या बरीच जवळ जवळ आहे; तथापि पारिभाषिक शब्दाची योजना करणें असतां त्यासाठीं संस्कृत भाषेचा उपयोग करावा. तसेच नवेनवे शब्द बनविण्याचाही यत्न झाला पाहिजे. याकरिता संस्कृत कोशातून पारिभाषिक शब्द उतरून घेऊन त्याचा संग्रह केला तर बगाली भाषासंरणी ठरविण्यास त्याचा पुष्कळ उपयोग होईल.

---

## १०

## संन्यासी.

— ०.—

ज्या स्थितीत मनुष्य जन्मास येतो त्या स्थितीतील आपलीं सर्व कर्तव्यें पार पाडल्यानतर जेव्हा त्याला धर्मज्ञानाची लालसा उत्पन्न होते आणि सर्व ऐहिक विषय, कीर्ति, सत्ता, इत्यादिकाचा त्याग करण्याची इच्छा त्याला होते, जगाकडे अतर्दृष्टीनें पाहून ते क्षणभगुर आहे असें त्याला आढळून येतें, तेव्हा तो सत्याचा शोध करू लागतो. सर्वांचे अखेरचें आश्रयस्थान कोठें आहे आणि अनत प्रेमाचा ठेवा कोठें सापडेल हें तो पाहू लागतो. या जगातील आपल्या मोठेपणाचा, आपल्या कीर्तीचा व आपल्या सत्तेचा पूर्ण त्याग तो करतो व परकीयासाठी आपला देह झिजविण्याकरिता तो लौकिकांत वावरू लागतो. पूर्ण अतर्दृष्टी प्राप्त व्हावी, प्रेम आणि दया याचा चिरकाल वास आपल्या अत करणात असावा व आपण पूर्ण ज्ञानी व्हावें यासाठीं तो यत्न करू लागतो. कित्येक वर्षांच्या ध्यानादि साधनांनीं, यमनियमांनीं व विचारानें तो ज्ञानी बनतो व यानंतर त्याला गुरूचे पद प्राप्त होतें. अशा रीतीनें तो गुरुस्थानीं विराजमान झाला म्हणजे आपणाकडे येणाऱ्या शिष्यांस तो तें ज्ञान देतो.

संन्यासी हा कोणत्याही विशिष्ट धर्माचा नसतो. कारण, तो आपल्या स्वतत्र विचाराप्रमाणें वागत असतो. सर्व धर्मांतून त्याच्या विचारांस चालन मिळत असतें. त्याचा आयुष्यक्रम म्हणजे तत्त्वांचा प्रत्यक्ष अनुभव असतो.

त्याच्या ठिकाणीं नुसती बौद्धिक उपपत्ति अथवा अंधविश्वास यांचा वास नसतो. मग केवळ ठराविक मतांचा अनुवाद तो करीत नाहीं हें सांगावयास नकोच.

---

## ११

## संन्यासी व गृहस्थाश्रमी.

—:०:—

सन्याशाच्या बाबतींत सांसारिक मनुष्यानीं बोलूं नये हा उत्तम पक्ष. संन्याशानें श्रीमत लोकाबरोबर कधींही सबध ठेवू नये गरिबाचे बरें करावे हाच त्याचा धर्म. अत्यत प्रेमानें गरिबाचें त्यानें सगोपन करावें आपल्या आंगीं असलेलें सर्व सामर्थ्य कारणीं लावावे. आमच्या देशांतील संन्यासी श्रीमंताची मनधरणी करतात व त्यांनीं आपणांस पोसावें अशी इच्छा करतात ही गोष्ट मोठी गर्हणीय होय. जो खरा संन्यासी आहे त्यानें अशी वर्तणूक कधींही करू नये. अशी वर्तणूक फक्त बाजारवसवीलाच मात्र शोभण्यासारखी आहे. लौकिक वस्तूचा त्याग केल्याचा बाणा मिरविणाऱ्या संन्याशाला असली वर्तणूक खचित शोभत नाहीं. कामकांचनाचा पूर्ण त्याग हेंच ज्याचें ध्येय त्याचें शिष्यत्व कामकांचनांत लोळणारा मनुष्य कसें पत्करील? "कामकांचनाच्या इच्छेचा यत्किंचित् अशही ज्याच्यापाशीं नसेल अशाची सगति मला दे" अशी श्रीरामकृष्ण मातेची नित्य करुणा भाकीत. "लौकिकांत मुरलेल्या लोकाबरोबर मी भाषण करतों तेव्हां माझे ओंठ जळत आहेत असें वाटतें" असें ते म्हणत. अशुद्ध आणि पूर्ण संसारी अशा लोकाचा नुसता स्पर्शसुद्धा त्यांना असह्य वाटत असे. श्रेष्ठ संन्याशाला ससारी लोक नवीन काय शिकविणार? संसारी लोक कोणतीही गोष्ट मन पूर्वक करीत नसतात; कारण काहीं करावयाचें झालें तरी त्यांत त्यांचा लोभ कोठें तरी दडी मारून बसलेला असतो. भगवान् संसाऱ्याच्या रूपानें अवतरले तर ते मनापासून कांहीं गोष्ट करीत आहेत कीं नाहींत याची मला शका येईल. एखादा गृहस्थाश्रमी मनुष्य एखाद्या धर्मपथाचा पुढारी झाला म्हणजे त्या पथाच्या नांवानें आपलीच तुंबडी तो भरू लागतो. तोंडानें पथाचें नांव तो पुढें करतो; पण वस्तुतः तो स्वहित मात्र साधीत असतो.

यामुळें तो पंथ अवनतीच्या मार्गास लागतो. संसारी मनुष्यांनीं ज्या ज्या पथाचें पुढारीपण स्वीकारिलें त्याची सर्वत्र हीच दशा झाली. त्यागावाचून धर्माला आसरा नाहीं.

कांचनाचा त्याग म्हणजे काय? असा प्रश्न कोणीं केला तेव्हां स्वामीजी म्हणाले:—

कोणतीही गोष्ट आपणास कर्तव्य असली म्हणजे त्यासाठीं आपणास कांहीं विशिष्ट साधनाचा उपयोग करावा लागतो. कालमान, देशाचार व व्यक्ति इत्यादिकाच्या अनुरोधानें वेगवेगळ्या साधनाचा उपयोग करावा लागतो. साधनें वेगवेगळीं झालीं तरी अतिम साध्य एकच असतें. ' **आत्मनः मोक्षार्थं जगद्धिताय च** ' म्हणजे स्वत चा मोक्ष व जगाचें हित हें सन्याशांचे साध्य होय. हें सिद्ध करण्यासाठीं कामकाचनाचा त्याग हें अत्यत महत्वाचें साधन आहे. संन्यास म्हणजे सर्व काम्य कर्मांचा न्यास अथवा त्याग हें लक्षांत ठेवा. केवळ बाह्यत कोणाशीं सबध न ठेवल्यानें सन्यास सिद्ध होत नाहीं. पैशाला स्वत· शिवावयाचे नाहीं पण दुसऱ्या कोणाच्या द्वारें त्याचा उपभोग घ्यावयाचा हा सन्यास नव्हे. भिक्षावृत्तीनें राहणें हें सन्याशास मोठें साहाय्यक होईल, पण असें व्हावयास गृहस्थाश्रमी लोकांनीही मनूची आज्ञा पाळली पाहिजे सन्याशासाठीं प्रत्येक दिवशीं काहीं अन्न वेगळें काढून ठेवावे अशी मनूची आज्ञा आहे; पण आता साराच मनू फिरला आहे. विशेषतः बगाल्यात माधुकरीची पद्धत बद झाली आहे. अशा देशांत माधुकरी मागून राहणें शक्य नाहीं. त्यामुळें तुमच्या कर्तृत्वाचा फुकट नाश होईल व कोणाचा फायदाही त्यामुळें होणार नाहीं. यामुळें हल्लींच्या दिवसात सन्याशाने केवळ आपल्या योगक्षेमापुरता सग्रह केला व आपला सारा वेळ सन्यासाश्रमधर्माकडे लाविला तर सध्याच्या परिस्थितींत अशी वागणूक तत्त्वाला सोडून झाली असें म्हणता येणार नाहीं. केवळ साधनास नसते महत्त्व दिल्यानें व्यर्थ घोंटाळा मात्र उत्पन्न होतो. आपल्या साध्याचा विसर कधीही पडूं न देणें हीच मुख्य महत्त्वाची बाब आहे.

## १२

## अधिकारवादाचे दुष्परिणाम.

प्राचीन काळच्या ऋषिवर्यांबद्दल माझ्या मनांत पूर्ण पूज्यबुद्धि आहे; तथापि त्याचे लोकशिक्षणाचे मार्ग मात्र मला पसंत नाहींत हें मी स्पष्टपणें सांगतों लोकानीं अमुक प्रकारें आचरण करावें अशा अनुज्ञा लोकांस त्यांनीं दिल्या; पण अमुक एक आचार कां पाळावा याचे कारण त्यांनीं लोकांस सांगितलें नाहीं. ही पद्धति मूलतःच अत्यत घातुक आहे. या पद्धतीनें साध्य सिद्ध होणें तर दूरच राहिलें, पण त्यामुळें लोकांवर अर्थशून्य आचारांचें व्यर्थ ओझें मात्र पडलें. लोक अज्ञ असल्यामुळें या आचारांचे रहस्य सांगूनही त्यांस समजावयाचें नाहीं असें ऋषि म्हणत. या अधिकारवादाची उत्पत्ति शुद्ध आपलपोटेपणापासून झाली आहे. हीं सर्व रहस्यें लोकांस कळलीं तर लोकांचे गुरु या नात्यानें जें आपलें वर्चस्व त्यांजवर आहे तें नष्ट होईल अशी भीति त्याना वाटली. यामुळें या अधिकारवादाचें समर्थन करण्यास ते झटत असत. एखादी विद्या एखाद्या मनुष्यास समजण्यासारखी नसली तर त्याला शिक्षण देऊन त्याचें बुद्धिवर्धन तुम्हीं करावें; त्याची बुद्धि अवनत होईल अशा प्रकारची गोष्ट करण्याऐवजीं ती वाढेल असें शिक्षण त्यास तुम्हीं दिले पाहिजे. त्याची बुद्धि प्रगल्भ झाली म्हणजे सूक्ष्म विचारही तिच्या आटोक्यात येतील ज्यानीं अधिकारवादाचे स्तोम माजविलें त्यानीं मानवी जीवात्म्याचे सामर्थ्य कसे अनत आहे ही गोष्ट लक्षांत आणली नाहीं प्रत्येक मनुष्याला त्याच्या भाषेनें तुम्हीं उपदेश केला तर त्या ज्ञानाचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठिकाणी अवश्य आहे. ज्या शिक्षकाला लोकांच्या मनांत ज्ञान भरवून देतां येत नाहीं त्यानें स्वतःचा कमीपणा मनांत आणून शोक करावा लोकांच्या भाषेंत त्यांस बोलतां येत नाही याबद्दल त्यानी दु खी व्हावें; पण आपल्या या वैगुण्याबद्दल लोकांस शिव्या देऊ नये अथवा त्यास अज्ञानांतही ठेवू नये. तसेच उच्च प्रतीचे ज्ञान सामान्य लोकासाठी नाही अशा गप्पाही मारू नयेत. जे काही सत्य असेल तें धीटपणानें खुशाल बोलावें. निर्बुद्ध मनुष्याला ते समजेल की नाहीं

अशी शंका मनांत आणूं नये. मनुष्यप्राणी हा आपलपोटा आहे. लोकास आपल्याइतकें ज्ञान असूं नये असें त्याला वाटते. कारण, सर्व लोक त्याच्या इतकेच सज्ञान झाले तर आपले महत्त्व कमी होईल अशी भीति त्यास वाटत असते. अत्युच्च प्रतीचें धर्मज्ञान सामान्य मनुष्यास सांगितलें तर त्यामुळें त्यांच्या बुद्धीचा घोटाळा मात्र होईल, असे अधिकारवादसमर्थक म्हणतात; आणि आपल्या या मताच्या समर्थनासाठीं

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
योजयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥

या गीतावचनाकडे बोट दाखवितात. अज्ञानी आणि कर्मसंगी लोकांच्या बुद्धीचा भेद ( ज्ञानदानानें ) करू नये असा या श्लोकाचा भावार्थ आहे.

प्रकाशामुळें अधिक अंधार उत्पन्न होतो अशा प्रकारच्या परस्परविरोधी मतास माझ्याने पुष्टि देववत नाहीं. सच्चिदानदसमुद्रात बुडाल्यामुळें मनुष्य मृत झाला असें म्हणण्यासारखेंच हे आहे. हे म्हणणें किती मूर्ख-पणाचें आहे ! अज्ञानामुळें ज्या चुका होतात त्या ज्ञानानें टळतात मग ज्ञानानें अधिक चुका होतील हे म्हणणे युक्त दिसते काय ? अधिक ज्ञानाने बुद्धिभ्रंश होतो हें म्हणणें शोभते काय ? ही गोष्ट शक्य तरी आहे काय ? लोकातील आपलें महत्त्व नाहींसें होईल या भीतीनें पुष्कळ माणसें सत्यवस्तु सागण्यास धजत नाहीत. यामुळे निर्मळ सत्य आणि लोकाचे भोळसटपणाचे आचार या दोघांची कशीबशी सांगड बांधण्याचा यत्न ते करीत असतात यामुळे लोकाचाराचे महत्त्व प्रादुर्भूत होते. लोकाचार आणि देशाचार पाळले पाहिजेत असें हीं माणसें म्हणू लागतात. अशी भलतीच सांगड घालण्याचा यत्न कधीं-ही करू नये. गलिच्छ भागावर नुसती सफेती फासून काय फायदा ? फुलांच्या ओझ्याखालीं प्रेत दडवून ठेवण्यांत काय हांशील आहे ? ‘ लोका-चार, ’ ‘ देशाचार, ’ असलीं थोताडे साफ झुगारून द्या हा अगदीं मूर्ख-पणा आहे. अशा प्रकारच्या वेड्यावांकड्या सागडीमुळे सत्य वस्तूचा लोप होतो आणि तिजवर भलत्यासलत्या मूर्खपणाच्या आचारांचे रान वाढते; व शेवटीं हे रान म्हणजे सत्य असें वाटू लागते. भगवान् श्रीकृष्णांनी जीं सत्य प्रमेये गीतेत स्पष्टपणें सागितली आहेत, त्यांचीही लोकाचाराशीं पुढें

सागड बाधली गेली, यामुळें जो धर्मग्रथ सर्व जगांतील ग्रथांच्या शिरोभागीं बसण्यासारखा आहे त्यातही अनर्थकारक अशा गोष्टी शिरल्या.

केवळ भीतीमुळें ही सांगड बाधण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते. ही भीति टाकून देऊन अधिक धीट व्हा. माझ्या शिष्यानी तरी अधिक धीट बनलें पाहिजे कोणत्याही कारणासाठीं आपल्या तत्त्वास त्यांनीं कमीपणा आणू नये. जें अत्युच्च सत्य आहे त्याचा प्रसार सर्व देशांत करा. लोकांत आपला मान कमी होईल अशी भीति बाळगू नका अथवा त्यामुळें तटे भांडणें होतील ही धास्तीसुद्धां सोडून द्या. सत्यप्रसारार्थ तुम्हीं कंबर बांधली तर परमेश्वराच्या सामर्थ्याचे पाठबळ तुम्हांस मिळेल ही खातरी बाळगा. जें काहीं सत्य नाहीं अशी तुमची खात्री आहे तें तुमच्या समोर उच्चारण्याची छातीसुद्धां कोणास होणार नाही केवळ सत्याच्या प्रसारासाठीं चौदा वर्षें एकसारखी मेहनत तुम्हीं केली तर तुमच्या वचनावर लोकांचा खास भरंवसा बसेल, आणि यामुळें सामान्य जनतेवर तुम्ही मोठे उपकार कराल. यामुळें यांचे व तिचे बध तुटून सर्व राष्ट्र उदयास येईल.

---

## १३

## भक्तियोग.

— ०.—

तुम्हास शिक्षा लावण्याकरिता हातात दड घेऊन परमेश्वर नित्य उभा असतो अशी परमेश्वरविषयक तुमची कल्पना नसली तर तुम्ही नीतिमान् होऊ शकणार नाहीं असें दैववादी म्हणतात, हें कसें ? आपण अशी कल्पना करू कीं नीतिविषयाचा उपदेश आपणास करण्यासाठीं एक घोडा उभा राहिला तो घोडा कोणता म्हणाल तर चाबकाचा फटका खाल्ल्याशिवाय पाऊल न उचलणारा असा भाड्याच्या गाडीचा घोडा. असा हा वक्ता मनुष्यापुढें उभा राहून म्हणतो कीं, " हीं माणसें खरोखर मोठीं अनीतिमान् असलीं पाहिजेत, कारण त्याच्या पाठीवर चाबकाचे तडाखे रोज बसत नाहींत हें मला ठाऊक आहे " वास्तविक विचार करतां चाबकाच्या भीतीनें मनुष्य अधिक अनीतिमान् मात्र होतो.

परमेश्वर आहे आणि तो सर्वव्यापी आहे असे तुम्ही सारे म्हणता. आतां आपले डोळे मिटा आणि तो कसा आहे याचा विचार करा तुम्हास काय दिसतें? सर्वव्यापित्व आपल्या चित्तात आणण्याकरितां समुद्राची अथवा नील आकाशाची अथवा अत्यत विस्तीर्ण अशा एखाद्या कुरणाची कल्पना तुम्ही चित्तांत आणू लागतां. या सर्व वस्तु तुम्ही प्रत्यक्ष सृष्टीत पाहिलेल्या असतात असे आहे त्याअर्थी सर्वव्यापी परमेश्वर हा शब्दसमूहच तुमच्या दृष्टीने निरर्थक ठरतो त्याचा वास्तविक अर्थ तुम्हास समजतच नाहीं. परमेश्वरास जी विशेषणें तुम्ही लावता त्याचीही अशीच वाट लागते परमेश्वराच्या सर्वसाक्षित्वाची अथवा सर्वशक्तिमत्वाची आपणास काय कल्पना आहे बरें? वास्तविक आपणास काहींच कल्पना नाहीं. प्रत्यक्ष अनुभव म्हणजे धर्म. परमेश्वरविषयक कल्पनाचा अनुभव तुम्हास होऊ लागला म्हणजेच परमेश्वराचे पूजन तुम्ही करीत आहा व त्याचे तुम्ही खरे भक्त आहा असे मी म्हणेन. असे होईपर्यंत तुमच्या परमेश्वरविषयक साऱ्या कल्पना म्हणजे नुसती अक्षरे आणि शब्द यावाचून त्याना काही अधिक महत्त्व नाही प्रत्यक्ष अनुभव घेण्याचे सामर्थ्य असणे हाच धर्म. तुम्ही कोणत्याही मताचे असला अथवा अनेक नीतिविषयक व तत्त्वज्ञानाचे ग्रथ तुम्ही आपल्या मेदूत कोबले असले तरी त्याचा काही अर्थ नाही तुम्हाला प्रत्यक्ष अनुभव किती आहे आणि अनुभवात तुमची पायरी कोठे लागते हाच काय तो महत्त्वाचा मुद्दा आहे.

तुमचा व्यक्तिविषयक परमेश्वर म्हणजे मायेच्या द्वारे दिसणारें ब्रह्मरूप. आपल्या पचेंद्रियाच्या द्वारे जेव्हा त्याला पाहण्याचा आपण यत्न करतों तेव्हा व्यक्तिविषयक परमेश्वर एवढ्या स्वरूपाने त्याचा अनुभव आपणास होतो आपल्या स्वत च्या स्वरूपाचा बाह्यानुभव आपणास घेता येत नाही. ज्ञाता स्वत लाच कसा जाणू शकेल? तथापि आपले आत्मतत्त्व जणू काय आपली छाया पुढे टाकू शकतो. या छायेलाच प्रत्यक्ष स्वरूप असें पाहिजे तर म्हणा. या छायेचे जे अत्युच्च रूप तोच व्यक्तिविषयक परमेश्वर. आत्मा हा अनतकालिक असून त्याचा प्रत्यक्ष अनुभव होण्याकरिता आणि त्याचे प्रत्यक्ष स्वरूप दिसण्याकरिता आपण सर्वकाळ धडपड करीत आहों. या धडपडीतूनच हें दृश्य विश्व निर्माण झाले आहे. ज्यांना आपण जड पदार्थ म्हणतो

त्यांचीही उत्पत्ति अशीच आहे. पण आपले हे सारे यत्न फार कोते आहेत. आपल्या या प्रयत्नांचे जें अत्युच्च रूप तोच आपला व्यक्तिविषयक परमेश्वर. आत्मानुभव होण्याकरितांच आपला हा सारा यत्न आहे. साख्यांच्या मताप्रमाणे हे सारे अनुभव जीवात्म्यास प्रकृति देते. त्याला खरा अनुभव मिळाला म्हणजे त्याचे स्वत:चे खरे स्वरूप त्यास समजून येईल असे साख्य मत आहे. जीवात्मा आत्मानुभवाकरिता धडपडत आहे असे अद्वैत मत आहे. पुष्कळ काळ धडपड केल्यानतर आपले पूर्वीचे स्वरूप सर्वकाळ एकरूपच आहे असा अनुभव जीवात्म्याला येऊन सन्यस्तवृत्तीचा उदय त्याच्या ठिकाणी होतो व तो मुक्त होतो.

या पूर्णत्वाच्या स्थितीला पोचलेला मनुष्य आणि व्यक्तिविषयक परमेश्वर यांचे स्वरूप एकच. "मी आणि माझा पिता एकच आहो" असे येशू ख्रिस्त म्हणे. त्यातील रहस्य हेच. "मी ब्रह्मरूप आहे, केवलरूप आहे" असा अनुभव त्याला होतो. एखादा अत्यत शक्तिमान् राजा ज्याप्रमाणे करमणुकीसाठीं कधीकधी बाहुल्याबरोबरही खेळतो त्याचप्रमाणें पूर्णत्व पावलेला मनुष्य या जगात वावरत असतो.

आपणाभोंवतीं अनेक कल्पनाचे पाश पडलेले आहेत. दुसऱ्या काही कल्पनामुळें हे पाश तुटतात. विश्वाचे अस्तित्व हेंच आधी कल्पनारूप आहे. एक प्रकारच्या कल्पना दुसऱ्या प्रकारच्या कल्पनाचा नाश करतात. जगात पाप, दु ख आणि मृत्यु याची वस्ती आहे या कल्पना भेसूर स्वरूपाच्या आहेत; पण आपण शुद्ध आहो, परमेश्वराचे अस्तित्व आहे; दु.ख कोठेही नाही अशा प्रकारच्या कल्पना सुखकारक असून विरुद्ध कल्पनाचा नाश त्या करतात. व्यक्तिविषयक परमेश्वर ही कल्पना अत्युच्च स्वरूपाची असून तिजमुळे साखळीतील सर्व दुवे तुटतात.

'परमेश्वरा, माझ्या या वस्तूची काळजी घे, ती वस्तु मला दे, मी तुझी स्तुति करतो आणि त्यासाठी तू मला रोज लागणाऱ्या अमुक वस्तु दे; परमेश्वरा, माझें डोके दुखणे बद कर' आणि असल्याच प्रकारच्या दुसऱ्या प्रार्थना करणे ही भक्ति नव्हे धार्मिकतेची ही अत्यत खालची प्रत आहे कर्मयोगाची ही अखेरची पायरी आहे. शरीराच्या तुटीकरिता आणि त्याच्या गरजा भागविण्याकरताच जर एखादा मनुष्य आपलें सर्व मानसिक

बल खर्च करीत असला तर त्याच्यात आणि पशूत काय फरक आहे हें तुम्ही मला दाखवू शकाल काय ? भक्ति ही फार श्रेष्ठ स्थिति आहे. स्वर्गाच्या इच्छेहूनही भक्ति श्रेष्ठ आहे. स्वर्ग म्हणजे लौकिक सुखें ज्या ठिकाणी निरामयपणें प्राप्त होतात ते ठिकाण असें ठिकाण आणि परमेश्वर हीं एकरूप कशीं होऊ शकतील ?

केवळ मूर्ख लोक असतात तेच इद्रियजन्य सुखाच्या मागें धावत असतात अशा प्रकारच्या स्थितीत राहणें ही गोष्ट फार सोपी आहे. आजपर्यंत चालत आलेल्या स्थितीत खाऊन पिऊन मजेनें रहाणें हें त्याहूनही अधिक सोपें आहे याच सुखकर कल्पना उराशीं बांधून त्याजवर आणखी धर्माचा शिक्का मारावा असें अर्वाचीन तत्त्ववेत्ते तुम्हांस शिकवितात. हें मत अत्यत भयकर आहे. इद्रियाच्या मागें लागून अखेर मृत्यूची प्राप्ती व्हावयाची. इद्रियातीत अशा चैतन्यस्वरूपांत राहणें हेच एक जीवित होय; यावांचून दुसऱ्या कोणत्याही प्रकारचें जीवित म्हणजे मृत्यूच. आपला सर्व आयुष्यक्रम ही एक प्रकारची कसरत आहे खऱ्या जीविताची मौज भोगावयाची असेल तर त्यापलीकडे आपणांस गेलें पाहिजे.

स्पर्शास्पर्शविचार हेच एक व्रत तुम्ही चालवाल तोंपर्यंत आणि तुमचा धर्म स्वयपाकघरात दडी मारून बसला असेल तोंपर्यंत तुमची धार्मिक उन्नति कधीही होणार नाहीं.

निरनिराळ्या धर्ममतातील क्षुद्र फरक हे केवळ शाब्दिक आहेत. खरोखर हे मूर्खपणाचे आहेत. "ही माझी कल्पना अगदीं नवी आहे" असे प्रत्येकास वाटत असते. व बाकीच्यांस आपल्या मताकडे वळविण्यास तो पहात असतो. सर्व भाडणाचें मूळ हेच.

दुसऱ्यावर टीका करावयाची असली म्हणजे आपल्या स्वत च्या चरित्रांतील एखादा महत्त्वाचा भाग मात्र आपण लक्षात घेतों. व आपल्या प्रतिपक्षाच्या चरित्रातील हिणकस भाग तेवढा आपण पाहतों. अशाने परकीयांबद्दल आपण केलेले अजमास साफ चुकतात.

आततायीपणा आणि धर्ममूढता यांच्या साहाय्यानें एखाद्या धर्माचा प्रसार झपाट्याने करता येईल हे खरें पण ज्या धर्माचा प्रसार मतस्वातत्र्याच्या तत्त्वावर झालेला असतो त्याचा पाया चिरस्थायी होतो. अशामुळें प्रसाराचे

काम हळुहळू होते ही गोष्ट खरी; तथापि प्रत्येकाला तो धर्म उच्चतर मार्गावर येऊन सोडीत असतो.

प्रथम चैतन्यदायी कल्पनांचा प्रसार साऱ्या देशभर [ हिंदुस्थानांत ] करा; म्हणजे बाकीच्या कल्पना मागून आपोआप येतील. चैतन्यस्फूर्ति आणि तत्त्वज्ञान ही अत्युच्चप्रतीची देणगी आहे, कारण, अनत जन्माच्या यातना चुकविण्याचें सामर्थ्य तींत आहे. याच्या खालोखाल असलेली दुसरी देणगी म्हणजे ऐहिक ज्ञान. कारण त्यामुळें मनुष्याचे नेत्र उघडून तत्त्वज्ञानाचा विचार करण्यास तो पात्र होतो. याहून खालच्या प्रतीचे ज्ञान म्हणजे जीवदान हें असून अन्नदान हें त्याहूनहि खालच्या प्रतीचें आहे

साधनाच्या अभ्यासात शरिराचा नाश झाला तर खुशाल होऊदे. नुसत्या शरीराची काय पर्वा आहे ?

सत्संगतींत नित्य राहिल्यानें कालेंकरून आत्मानुभव होतो.

एखाद्या मनुष्यास नुसती चिलीम भरून दिली तर तेवढी सेवाही पुष्कळ काळपर्यंत ध्यान धरून बसण्यापेक्षा अधिक महत्वाची आहे हें समजण्याचाही काळ एक वेळ येत असतो.

ज्याला चिलीम चागली भरून देता येते त्याला ध्यानधारणाही चांगली साधते.

देव म्हणजे उच्चावस्थेस पोहोंचलेले मृत मनुष्य प्राणी. त्यांजकडून आपणांस मदत मिळणें शक्य आहे.

प्रत्येक जण आचार्य होऊ शकत नाहीं, तथापि अनेक जण मुक्त होऊ शकतात मुक्त मनुष्याला हें सारें जग स्वप्नवत् दिसत असते; पण आचार्याला या दोघाच्या मधल्या स्थितीचा अवलब करावा लागतो हे जग खरें आहे अशी जाणीव त्याच्या ठिकाणीं असली पाहिजे, कारण तसें नसेल तर तो उपदेश कशाला करील ? तसेंच हें जग स्वप्नवत् आहे असा अनुभव त्याला नसेल तर सामान्य मनुष्याहून तो अधिक कसा ? आणि असा मनुष्य उपदेश तरी कसचा करणार ? शिष्याच्या पातकांचें ओझें गुरूला वाहावें लागतें. यामुळेंच अत्यत शक्तिमान् अशा आचार्यांसही रोगाच्या आणि शारीरिक दुःखांच्या यातना भोगाव्या लागत असलेल्या आपण पाहतों; पण तोच आचार्य स्वतः अपूर्ण असेल तर त्या पातकांस त्याचें मनही बळी पडतें व

त्याचें अधःपतन होतें. याकरितां आचार्य होणें हें मोठें कठीण कर्म आहे

आचार्य होण्यापेक्षा जीवन्मुक्त होणें त्याहून अधिक सोपे आहे. कारण, जग हें स्वप्नवत् आहे अशी जाणीव जीवन्मुक्ताला असल्यामुळें जगाची फिकीर त्याला बाळगावी लागत नाहीं, पण आचार्याला ही जाणीव असतांही त्याला जगांत रहावें लागतें आणि कर्मही करावें लागतें. आचार्य होणें प्रत्येकाला शक्य आहे ज्याच्याद्वारें ईश्वरी सामर्थ्य प्रकट होतें तो आचार्य. सामान्य मनुष्याच्या शरिराहून आचार्याचें शरीर वेगळ्या प्रकारचे असते. शरीर पूर्णावस्थेत कसें ठेवावे ही विद्या शिकविणारे एक शास्त्र आहे. आचार्यांची इद्रिये नेहमीं तीव्रतम स्थितीत असतात. त्याची सुखाची जाणीव जशी मोठी आणि तीव्र तशीच दु खाचीही मोठी आणि तीव्र अशी असते. ही मानसिक अवस्था सामान्य मनुष्याच्या मानसिक अवस्थेहून अगदी वेगळी असते

एखाद्याची छाप सर्वांवर बसते व त्याचा सर्वत्र विजय होतो असे आपण पाहतों वास्तविक पाहता त्याच्या अतर्गत स्वरूपाचाच हा विजय असतो. प्रत्येक मनुष्यातील विशिष्टत्व हेच त्याच्या यशाचे रहस्य असतें

अत करणाचा अत्यत उच्च प्रतीचा विकास भगवान् श्रीकृष्ण व चैतन्यदेव याच्या ठिकाणीं जसा आढळून आला तसा दुसऱ्या कोठेही तो दिसला नाही.

श्रीरामकृष्ण हे शक्तीचे आविष्करण होय. त्याचे मत अमुक होते अथवा तमुक होते असल्या प्रकारचा विचार त्याजबद्दल तुम्ही कधीही करू नका. श्रीरामकृष्ण म्हणजे मूर्तिमत शक्तीच. आपल्या शिष्याच्या द्वारे ते अद्यापही जागृत असून जगभर आपले कार्य करीत आहेत. त्याच्या कल्पनाचा विकास एकसारखा होत होता आणि अद्यापही तो सुरू आहेच. श्रीरामकृष्ण जसे जीवन्मुक्त होते तसेच ते आचार्यही होते.

## १४

## ईश्वर आणि ब्रह्म

सर्व व्यष्टींचे जें समष्टिरूप ते ईश्वर, पण असे आहे तरी ते स्वतत्र व्यक्तिरूप आहे. ज्याप्रमाणें मनुष्याचे शरीर हा एक घटक आहे त्याप्रमाणें त्या

देहातील पोटघटक जें ( Cell ) सेल तेही स्वतत्र घटक आहे. समष्टि अथवा समीकृत रूप म्हणजे परमेश्वर आणि व्यष्टि अथवा पृथक्कृत रूप म्हणजे जीव याकरिता परमेश्वराचें अम्तित्व जीवाच्या अस्तित्वावर अवलबून आहे. ज्याप्रमाणें सेलच्या अस्तित्वावर देहाचे व देहाच्या अस्तित्वावर सेलचे अस्तित्व अवलबून आहे त्याचप्रमाणें जीव आणि परमेश्वर याचे अस्तित्व परस्परावर अवलबून आहे अशा रीतीनें जीव आणि ईश्वर हे परस्परावलबी असून एकाच वेळी अस्तित्वात असतात. एकाचें अस्तित्व असले तर दुसऱ्याचेही असलेच पाहिजे त्याचप्रमाणें आपल्या या पृथ्वी-शिवाय जी इतर उच्च प्रतीची जगें आहेत तेथे वाइटापेक्षा चागल्याचे प्रमाण फारच मोठे असल्यामुळे एकदरीनें समष्टिरूप जो परमेश्वर त्याचे स्वरूपही चांगलेंच असले पाहिजे. त्याचप्रमाणे सर्वशक्तिमत्त्व आणि सर्वसाक्षित्व हीं सुद्धा त्याजपाशी असलीं पाहिजेत हे उघड आहे. कारण, जगातील शक्तीचे व अस्तित्वाचे ते समीकृतरूप आहे. ब्रह्म हे या दोहोंच्याही पलीकडचें आहे. ब्रह्म ही स्थिति नव्हे. अनेकाच्या समीकरणानें ते बनलेलें नाही. आ-ब्रह्मस्तबपर्यंत त्याची सर्वत्र व्याप्ति आहे. त्याच्या व्याप्तीवाचून कोणतेंही अस्तित्व शक्यच नाही, आणि जे काही सत् स्वरूप आहे ते ब्रह्म. मी ब्रह्मरूप आहें असे मला वाटते त्याक्षणीं फक्त माझेच अस्तित्व मला दिसत असते. हीच गोष्ट सर्व व्यष्टीस लागू आहे. याकरिता प्रत्येक व्यष्टि ब्रह्मरूपच आहे.

---

## १५
## ज्ञानयोग.

सर्व जीवात्मे खेळ खेळत आहेत आपण खेळत आहों ही जाणीव कोणास असते आणि कोणास नसते. हा खेळ खेळत असता त्याची जाणीव ज्यामुळें उत्पन्न होते तो धर्म.

आपल्या या ऐहिक आयुष्यक्रमात जो नियम लागू पडतो तोच धार्मिक जीवनक्रमांत व विश्वाच्या जीवितांतही तसाच लागू पडतो. हा नियम अथवा कायदा एकच असून तो विश्वव्यापी आहे. धर्माचा कायदा वेगळा आणि

ऐहिक विषयाचा कायदा वेगळा असे नाही सामान्य जीव किंवा एखादा दैत्य आणि परमेश्वर यातील फरक कमी अनिक प्रमाणाचा मात्र आहे. त्यात मूळगुणाचा फरक नाही

पश्चिमेकडील नीतितत्त्ववेत्ते, तत्त्वदर्शी व अर्वाचीन शास्त्रज्ञ पडित हे देहपातानतर मनुष्याचे अस्तित्व आहे हे सिद्ध करण्याकरिता नाना प्रकारानी धडपड करीत आहेत. क्षुद्रतत्त्वासाठी कोण ही धडपड ! त्यानी आपले मेंदू शिणवावे इतक्या योग्यतेची ही गोष्ट नसून याहून अधिक महत्त्वाच्या अशा अनेक बाबी पडल्या आहेत आपण मरतो असे वाटणें हाच आधी केवढा भ्रम ? आपण खरोखर कधीही मरत नाही, हें सागण्यासाठीं धर्मगुरूची अथवा भुताखेतांची आणि समधाची जरूरी आम्हास नाही. सर्व सत्य प्रमेयात जे निर्मेळ सत्य ते हे यास पुराव्याची जरूरच नाही आपला आत्यतिक नाश होईल अशी कल्पनासुद्धा एकाही मनुष्यास शिवत नाही आपण अमर आहो ही कल्पना प्रत्येकाच्या ठिकाणी जन्मसिद्धच आहे.

जीवित अशी सज्ञा जेथे प्राप्त होते तेथे मृत्यु या संज्ञेचाही उदय होतो जीवित हे मृत्यूच्या छायेसारखे आहे तसेच मृत्यु हाही जीविताच्या छाये-सारखा आहे. या दोहोतील फरक इतका सूक्ष्म आहे की त्याचे निश्चित स्वरूप ठरविताच येत नाहीं. त्या फरकाचें ग्रहण बुद्धीला करता येत नाहीं, अथवा त्या फरकास तिला चिकटूनही बसतां येत नाही इतके ते सूक्ष्म आहे

अनतकालपर्यंत आपण अधिकाधिक सुधारत जातों हें मत मला खरें वाटत नाही आपण एकसारखे अनत कालपर्यंत एकाच सरळ रेषेंत मार्ग-क्रमण करीत आहों या मतावर माझा विश्वास बसत नाहीं. हे मत इतके उघडपणे मूर्खत्वाचे आहे की त्यावर विश्वास ठेवणें शक्यच नाहीं एकसा-रखी सरळ रेषेत जात असलेली अशी गति अस्तित्वात नाहीं. एक सरळ रेषा एकसारखी वाढविली तर ती मूळच्या आरभास येऊन मिळते व तिचें वर्तुळ बनतें त्याचप्रमाणें जी शक्तीची प्रेरणा सुरू झाली तीही आपल्या मूळच्या स्वरूपास परत जाऊन आपले वर्तुळ पूर्ण करील

एकसारखे एकाच दिशेनें वाढत जाणें शक्य नाहीं प्रत्येक जीवात्मा जणू काय वर्तुळाकार परिभ्रमण करीत आहे आणि तें वर्तुळ त्याला पूर्ण करावें लागेल. कोणताही जीवात्मा कितीही नीच दशेस गेला असला तरी एक

वेळ अशी येईल कीं तेव्हा तो उद्योन्मुख होईल. तो अधोगतीच्या मार्गाने खालीं जात असला तरी वर्तुळ पूर्ण करण्याकरिता उन्नतीच्या मार्गास लागणे त्याला अवश्य आहे एका सामान्य मध्य बिंदूतून आपण सर्व बाहेर पडलेले आहों हा सामान्य मध्यबिंदू म्हणजे परमेश्वर या मध्यबिंदूतून आपण निघालो असून वर्तुळ पूर्ण झाल्यानतर त्याच्याकडे आपग पुन्हा परत जाऊ.

प्रत्येक जीवात्मा हे एक वर्तुळ आहे जेथे देह आहे तेथे त्याचा मध्यबिंदू असून तेथे त्याची कर्मप्रवणता व्यक्त होते तुम्ही सर्वव्यापी आहा; आपण केवळ एकाच ठिकाणी वास करतों असा भास तुम्हास होत असला तरी वस्तुत तुम्ही सर्वव्यापी आहा त्या एकाच बिदूभोवती जड वस्तूचे अणू जमले आहेत आणि त्या परमाणूतून जे यत्र बनले आहे त्याच्या द्वारें तो बिंदू व्यक्तदशेस येत असतो, त्याच्या द्वारे तो स्पष्टत्वास येतो त्याला शरीर असे म्हणतात तुम्ही सर्वव्यापी असल्यामुळे एक देह अथवा यत्र निरुपयोगी ठरला तर तो मध्यबिंदू जरा पलीकडे सरकतो व जड वस्तूचे नवे सूक्ष्म अथवा स्थूल अणू घेऊन नवे शरीर बनवितो व त्याद्वारे आपल्या कार्यास सुरवात करितो मनुष्याचे हे स्वरूप झाले. आता परमेश्वर म्हणजे काय ? परमेश्वर हेही एक वर्तुळ आहे. त्याला परीघ कोठेच नसून मध्यबिंदू मात्र प्रत्येक ठिकाणी आहे या वर्तुळातील प्रत्येक बिंदु जिवत असून त्याला जाणीव आहे व तो कार्यव्याप्तही असतो जीवात्मा नियमित अवकाशात बद्ध असल्यामुळें फक्त एकाच बिंदूत जाणिवेची शक्ति आहे व तोच बिंदु मागेपुढे होत असतो

जीवात्मा म्हणजे ज्याचा परीघ अनत आहे पण ज्याचा मध्यबिंदु कोणत्यातरी एकाच देहात आहे, तो मृत्यू म्हणजे मध्यबिंदूचे चलन. ज्यावेळीं आपल्या ह्या देहातील बद्ध आत्मा मध्यबिंदूतून बाहेर पडून जाईल त्यावेळी परमेश्वराची व आपली भेट होईल व तेच आपले खरें स्वरूप आहे असे आपणांस कळून येईल

एक प्रचड प्रवाह समुद्राच्या दिशेनें चालला आहे. त्यात कागदाचे आणि गवताच्या काड्याचे लहान लहान तुकडे इतस्तत. हेलकावे खात आहेत. आपल्या मुळास परत जाण्याकरितां ते कदाचित् धडपड करीत असतील पण अखेरीस त्यास प्रवाहाबरोबर समुद्रात जाणेंच भाग पडेल. अशाच

रीतीनें तुम्ही, मी आणि ही सारी प्रकृती गवताच्या काड्यासारखी असून आपण सर्व मोठ्या सपाट्यानें चैतन्यसागराकडे धावत आहो. तो चैतन्यसागर पूर्णस्वरूप असून त्यालाच आपण परमेश्वर म्हणतो. आपण परत जाण्यासाठी धडपड केली, प्रवाहाच्या उलट दिशेनें जाण्याचा यत्न केला अथवा आणखी कशाही वेड्यावाकड्या उड्या मारल्या तरी अखेरीस त्या चैतन्यानदसमुद्रात जाणें आपणास भाग आहे.

ज्ञान म्हणजे सर्व पथाच्या आणि धर्माच्या बाहेर जाणे. तथापि ज्ञानी धर्माचा अथवा पथाचा तिरस्कार करतो असे मात्र समजू नये. त्याचा अर्थ इतकाच की या पथाच्या अथवा धर्माच्या बधनातून सुटून तो पलीकडे गेलेला असतो. ज्ञानी मोडतोड करण्याची इच्छा करीत नाही तर पूर्वीचे जें अपुरे असेल ते तो पुरे करतो. सर्वांस मदत करण्याचा यत्न तो करीत असतो सर्व नद्या ज्याप्रमाणें समुद्रात जाऊन एकरूप होतात त्याचप्रमाणें सर्व धर्मानी अथवा पथानी ज्ञानसमुद्राकडे जाऊन तेथे एकरूप व्हावे जगाचा त्याग करावा असे ज्ञान सागते. तथापि, त्याचा अर्थ जग सोडून जावें असा नाही जगात राहून त्यातून अलिप्त राहिले पाहिजे असे झाले तरच खरा सन्यास सिद्ध झाला असे म्हटले पाहिजे खऱ्या सन्यासाची कसोटी हीच.

आरंभापासूनच सर्व ज्ञान आपल्या ठिकाणी साठविलेले आहे हा सिद्धात गृहीत करण्यावाचून दुसरे गत्यतर नाही. आपण ज्या अर्थी त्या ज्ञानसमुद्राच्या लहान लहान लाटा आहो त्या अर्थी आपल्या पाठीमागे तो अनत सागर असलाच पाहिजे.

वास्तविक पाहता जडवस्तु, मन आणि चैतन्य यात फरक नाही. त्या एका स्वरूपाचा अनुभव घेण्याचे हे वेगवेगळे मार्ग मात्र आहेत. या जगाचा अनुभव पचेद्रियानी आपणास होतो. या पचेद्रियांच्या द्वारे आपणास ते जड दिसते अत्यत दुष्ट मनुष्यास तेच जग नरकासारखें वाटते. साधुजनांस ते स्वर्गासारखें अनुभवास येतें, आणि पूर्णत्व पावलेल्या मनुष्यास तेच परमेश्वरस्वरूप आहे असा अनुभव येतो.

ब्रह्म ही एकच सत्य वस्तु आहे हा अनुभव इद्रियद्वारा घेता येणे शक्य नाहीं. तथापि ही गोष्ट खरी आहे असे सिद्ध करतां येणे शक्य आहे उदा-

हरणार्थ सामान्य वस्तूतही ही एकरूपता असली पाहिजे. सामान्यपणें बोलावयाचे म्हणजे मनुष्यप्राणी एवढ्या सामान्य नामानेच आपण बोलतो. यात विविधता उत्पन्न होते ती नामरूपामुळे होय; तथापि नाम आणि रूप याचें स्वरूप आपणास दिसत नाही. नाम आणि रूप म्हणजे काय याचा विचार आपण करू लागलो म्हणजे या दोहोचाही लोप होतो. अर्थात् हा देखावा केवळ मायारूप असला पाहिजे. त्याचे सत्यत्व केवळ नामरूपावर अवलबून असून त्या नामरूपावाचून त्याला अस्तित्वच नाही. समुद्रातील एक लाट घ्या. जोपर्यंत पाण्याचा तेवढा समूह त्या लाटेच्या रूपात एकत्र आहे तोंपर्यंतच लाटेला अस्तित्व आहे, अथवा लाट या नावाने ती ओळखली जाते, पण ती समुद्रात विरून गेली म्हणजे लाट हे रूप नाहीसें झाले. तथापि पाण्याचे अस्तित्व लाटे इतके रूपावर अवलबून नाही. लाट या रूपाचा मागमूसही नाहीसा झाला तरी समुद्र शिल्लक उरतोच.

जे कांही सत्य आहे ते एकच आहे हे सत्य मन अनेक रूपानी भासविते विविधतेचा भास होऊ लागला म्हणजे एकात्मता नष्ट होते, आणि एकात्मता दिसू लागली म्हणजे विविधता नाहीशी होते. आपल्या नेहमीच्या व्यवहारातही एकरूपच एका वेळी आपणास दिसत असते चिनी मनुष्याला सर्व अमेरिकन सारखेच दिसतात. एक अमेरिकन त्याला दुसऱ्यापासून ओळखता येत नाही. त्याचप्रमाणे आपणास सर्व चिनी सारखेच दिसतात.

आपणास वस्तूचें ज्ञान होते असें आपण म्हणतों. हें ज्ञान मनानें निर्माण केलें आहे ही गोष्ट सिद्ध करणें शक्य आहे. ज्या वस्तूना काहीं विशिष्ट गुण म्हणून असतात त्याच वस्तू ज्ञात अथवा जाणता येण्याजोग्या या सदरात येऊ शकतात जिला गूण नाही अशा वस्तूचे ज्ञानही होऊ शकणार नाही. माझ्या बाहेर जें काहीं जग म्हणून आहे ते वस्तुत मला अज्ञात आहे व त्याचे ज्ञान होणे शक्यही नाही. या अज्ञात जगाला ‘ क्ष ’ अशी सज्ञा आपण देऊ. या जगाकडे मी अवलोकन करू लागलों म्हणजे माझे मन त्या ‘ क्ष ’-त जाऊन मिसळते जग म्हणजे काय असा विचार मीं करू लागलों म्हणजे जी काही वस्तु मला ज्ञान होते तींत माझ्या मनाचा तीन चतुर्थांश असतो. अशा रीतीने माझें बाह्य जग म्हणजे ‘ क्ष+माझें मन ’ अशा मिश्रणानें बनलें आहे. माझ्या अतर्गत जगांत अथवा बाह्य जगांत विविधता

म्हणून जी भासते ती मनाने निर्माण केली असून जे काही वास्तविक अस्तित्व आहे ते अज्ञात व अज्ञेय आहे. ते माझ्या ज्ञानाच्या परिसीमेच्या बाहेरचे आहे. जें ज्ञानाच्या परिसीमेबाहेर असेल तेथे विविधता असणें शक्य नाही; कारण तेथे मनाचे अस्तित्व नाही. अशाच रीतीने बाह्य जग व अतर्जग यातील फरकही मनानेच निर्माण केला असल्यामुळे मनाच्या बाहेरील जे स्वरूप ते एकच असले पाहिजे.

परमेश्वर विचार करीत नाही. तुम्हाला सर्व ज्ञान प्राप्त झाल्यानतर विचाराचे कारणच कोठें उरले? काही ज्ञान प्राप्त व्हावे म्हणून आपण किड्यासारखी धडपड करीत असतो ही आपल्या दुर्बलतेची खूण आहे आणि अशा रीतीने मिळविलेले ज्ञानही क्षणानतर निरुपयोगी ठरते. चैतन्याचे प्रतिबिब मनात आणि इतर प्रत्येक वस्तूत पडले आहे. चैतन्याच्या प्रकाशामुळेच मनाला सजीवता प्राप्त झाली आहे. प्रत्येक वस्तु या चैतन्याचेच व्यक्तरूप आहे. निरनिराळी मने म्हणजे चैतन्याला प्रतिबिबित करणारे निरनिराळे आरसेच होत प्रेम, कीर्ति, द्वेष, सद्गुण, दुर्गुण इत्यादि सारे गुण चैतन्याचीच प्रतिबिंबे होत. आरसा खराब असला म्हणजे त्यात प्रतिबिंबही खराब पडते.

जे सत् अथवा खरे अस्तित्व आहे त्याला प्रत्यक्ष रूप नाही आपण त्याची कल्पनाही करू शकत नाही; कारण कल्पना करावयाची म्हटले तर ती मनाच्या द्वारेच केली पाहिजे, आणि मन हे स्वत व्यक्तरूप आहे. खरे अस्तित्व कल्पनाबाह्य आहे हेच त्याचे विशेष महत्त्व होय. प्रकाशाचे अत्यत मद अथवा अत्यत तीव्र स्पद आपल्या अवलोकनात येत नाहींत हा व्यावहारिक अनुभव आपण लक्ष्यात बाळगिला पाहिजे. कित्येक गोष्टी आज आपणास जाणता येत नाहीत तथापि त्या जाणता येणें शक्य आहे. त्या आपणास जाणता येत नाहीत याचे कारण आपले अज्ञान हेंच दुसऱ्या कित्येक गोष्टी अशा आहेत की त्या आपणास कधीही जाणता येणार नाहींत. कारण अत्यत तीव्र अशा ज्ञानस्पदापेक्षाही त्याचे स्पद तीव्रतर आहेत. आपण कालातीत आहों ही गोष्ट आपणास समजत नसली तरी ती खरी आहे. ही गोष्ट ज्ञानाच्या हद्दीत येणें अशक्य आहे. ही गोष्ट ज्ञानाच्या हद्दींत येऊं शकत नाहीं म्हणूनच तिचें अस्तित्व खरें आहे. मी आहें ही भावना

जितकी खरी आहे तितकी दुसरी कोणतीही भावना नाहीं. आणि असें आहे तथापि माझ्या अस्तित्वाबद्दलची माझी भावना देहाशी आणि मनाशी सलग्न आहे. देह आणि मन याच्या अस्तित्वावांचून माझ्या नुसत्या अस्तित्वाची कल्पना मला करतां येत नाही. 'मी सुखी आहे,' अथवा 'दु खी आहे' 'मी स्त्री आहें, पुरुष आहे' अशा प्रकारची देहाशी अथवा मनाशीं युक्त अशी माझ्या अस्तित्वाबद्दलची माझी भावना आहे. माझ्या अस्तित्वाचे जें काही खरें स्वरूप आहे त्याची भावना मी करू लागलो तर तिला देहाशी अथवा मनाशी जोडल्याशिवाय स्वतन्त्रपणें ती मला करता येत नाही असे आहे तथापि माझें स्वतन्त्र अस्तित्व आहे असेही मला निश्चितपणे वाटत असतें. "पतीसाठी स्त्री पतीवर प्रेम करीत नसून त्याच्या ठिकाणी असलेल्या आत्म्यावर ती प्रेम करिते स्वत च्या आत्म्याच्या द्वारे पतीच्या आत्म्यावर ती प्रेम करते. त्याचप्रमाणे पतीही स्वत च्या आत्म्याच्या द्वारे पत्नीवर प्रेम करतो" ही सत्य वस्तु आहे असें ज्ञान आपणास आहे म्हणूनच बाकीच्या सर्व वस्तूचे ज्ञान आपणास होऊ शकते, तथापि आपल्या आत्मस्वरूपाचे ज्ञान आपणास होत नाही. तसे होणे शक्यही नाही ज्ञाता ज्ञात्याला कसा जाणू शकेल ? डोळा स्वत ला कसा पाहू शकेल ? आपण त्याला जाणू शकलो तर तो ज्ञाताच नव्हे. मग तो ज्ञेय झाला.

ज्याला आत्मानुभव झाला तो म्हणतो "मी राजाचा राजा आहे. माझ्याहून अधिक उच्च कोणी नाही. मी देवाचा देव आहे. मजपेक्षा अधिक श्रेष्ठ असा दुसरा देव नाही मी 'एकमेवाद्वितीय' आहे" वेदाताची ही अद्वैत कल्पना पुष्कळांस मोठी भयकर वाटते. पण याचे कारण भोळेपणा हेच.

आपण आत्मरूप असून सदोदित शात आणि स्थिर आहों आपणास दु ख करण्याचें कारण नाही. दयेनें प्रेरित होत्साता परमेश्वर आर्द्र होतो असे आपणास वाटते ही आपली चूक आहे परमेश्वराचे स्वरूप असे असेल तर त्याचें आराधन आपण करावे अशी त्याची योग्यता नाहीं. परमेश्वरानें दु.ख कां करावें ? दु ख करणे हें दौर्बल्याचें लक्षण आहे. ही बद्धतेची खूण आहे.

त्या उच्चतम स्वरूपाच्या शोधात नेहमी असा. कारण, त्यातच अनत आनंद आहे. शिकार करणे मला भाग असेल तर मी सिंहाची शिकार करीन. मीं चोरी केलीच पाहिजे असे असेल तर राजाधिराजाचा खजिना मी लुटीन.

अहाहा ! ज्याचें वर्णन करतां येत नाहीं अथवा ज्याला कोणतीही सीमा लावता येत नाहीं, ज्याला पाहतां येत नाहीं अथवा आपल्या अत करणाच्या अत्यत खोल भागातही ज्याची भेट होत नाही, ज्याच्याशीं कोणाचीही तुलना करतां येणें शक्य नाहीं, जो सीमातीत आहे, ज्याचे स्वरूप कधींही बदलत नाहीं त्यालाच मिळविण्याची खटपट करा. दुसऱ्या कशाच्याही मागें लागू नका.

सृष्टींतील घडामोड जेथे स्पर्श करू शकत नाहीं, जो विचारातीत आहे, जो सदोदित एकाच स्थितींत आहे, ज्याची स्तुति सर्व सतमहंत करतात त्या पवित्र स्वरूपाचाच शोध करा. दुसऱ्या कशाच्याही मागें लागू नका.

जें कल्पनातीत आणि अनत एकरूप आहे, ज्या ठिकाणीं वर पाणी, खालीं पाणी, उजवीकडे पाणी, डावीकडे पाणी आणि ज्या पाण्यावर लहानसा तरंगही उठत नाहीं इतके तें शांत, ज्या ठिकाणी पूर्ण स्तब्धता आणि अनत आनद आहे असें स्वरूप तुमच्या अत करणात उदय पावेल दुसऱ्या कशाच्याही मागे लागू नका

प्रियबधु ! तू कष्टी कां होतोस ? तुला मृत्यु नाही अथवा रोगही तुला पछाडू शकत नाही, मग तू अश्रू का ढाळतोस ? दु.ख अथवा दुर्दैव तुजवर हल्ला करू शकत नाही मग तू का रडतोस ? तुझ्यात काहीं बदल होत नाहीं अथवा मृत्यु तुझे हरण करू शकत नाहीं तू केवळ सद्रूप आहेस.

परमेश्वर म्हणजे काय हे मला ठाऊक आहे तुला त्याचे वर्णन सागणें शक्य नाहीं. परमेश्वर कसा आहे हे मला माहीत नाही. मग मी त्याचे वर्णन कसें करू ? पण तो तूच आहेस हें तुझ्या लक्ष्यात येत नाही काय ? तो तूच आहेस, मग परमेश्वराला धुडीत इकडे तिकडे का भटकावे ? भलतीकडेच शोध करीत फिरू नको. तू केवळ आत्मरूप पहा. तोच परमेश्वर आहे

तूच आमचा पिता, तूच आमची माता आणि तूच आमचा सुहृद्. जगाचे ओझे तू वाहातोस. आमच्या जीवनाचे ओझे वाहावयास आम्हास सामर्थ्य दे. तू आमचा स्नेही, 'तू आमचा प्रियकर, तूच आमचा पति आणि तूच आम्ही.'

१६

## मायेचें कारण काय?

— ० —

मायेचे कारण काय हा प्रश्न गेल्या तीन हजार वर्षांपासून उपस्थित झाला आहे ज्यावेळी न्यायशास्त्रास अनुसरून जग हा प्रश्न आम्हास विचारील त्यावेळीं त्याचे उत्तर आम्ही देऊ हेच त्याचे उत्तर हा प्रश्नच विरोधात्मक आहे जें केवलरूप आहे त्याची व्यक्तदशा हा केवळ आभास आहे असें आमचे म्हणणे आहे निरुपाधिक रूप सोपाधिक भासते ही केवळ माया होय—आभास होय असे आम्ही म्हणतों ते निरुपाधिक आहे हें एक वेळ कबूल केलें म्हणजे त्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणाचीही उपाधि त्याला लागू शकणार नाहीं हें कबूल केल्यासारखेंच आहे तें कोणत्याही कारणातून उत्पन्न झालेलें नाही याचा अर्थ हाच की बाह्य वस्तूचा अमल त्यावर चालू शकत नाहीं जर ते रूप निरुपाधिक असेल तर त्याला दुसऱ्या वस्तूची उपाधि लागणार नाही त्याजवर इतर वस्तूची क्रिया घडणार नाही केवल स्थितीत काल, देश आणि कारण याचे अस्तित्व असू शकणार नाही. हें म्हणणें तुम्हीं गृहीत केले म्हणजे तुमच्या प्रश्नाची माडणी कशी होते पहा· "ज्याला दुसऱ्या कोणाचीही उपाधि लागत नाहीं अथवा ज्यावर दुसरे कोणतेही कारण अमल चालवू शकत नाही त्याचे कारण काय ? "तुमचा हा प्रश्न फक्त केवल स्थितीनच संभवतो; पण तुम्ही त्या स्थितीतून त्याला अलीकडे आणता व त्या स्थितीत तो प्रश्न विचारता. ज्यावेळी केवल स्थिति जाऊन सोपाधिक स्थिति उत्पन्न होते आणि ज्यावेळीं काल, कारण आणि देश यांचें अस्तित्व उत्पन्न होते त्याच वेळीं हा प्रश्न संभवतो. त्याच वेळी हा प्रश्न विचारणें शक्य आहे. केवळ अज्ञानामुळें माया भासते असें आम्ही म्हणू तुमचा प्रश्नच असंभवनीय कोटींतील आहे केवल रूपात दुसऱ्या कोणत्याही बाह्य कारणानें बदल होणे शक्य नाही याकरिता तेथे कारणच नव्हतें आम्हास समजत नाही म्हणून या प्रश्नाचे उत्तर आम्ही देत नाही असे नाहीं. अथवा आम्ही अज्ञ आहों म्हणून तुम्हास उत्तर देत नाहीं असेही नाहीं. पण या प्रश्नाचे उत्तर ज्ञानदशातीत आहे आणि हा प्रश्न ज्ञानदशेच्या

हद्दीत उपस्थितच करतां येत नाहीं. " मला माहित नाही " या शब्दाचा उपयोग आम्हास दोन अर्थांनीं करतां येईल एक अर्थ असा की आमचे ज्ञान कमी प्रतीचें आहे अथवा जीसंबधी तुम्ही विचारता ती वस्तु ज्ञानाच्या कक्षेच्या बाहेरची आहे 'एक्स' या नावाचे किरण आता सापडले आहेत याचें कारण काय, हे अद्यापि निश्चित झालेले नाही तथापि पुढें मागें केव्हा ना केव्हां त्याचे कारण सापडेल या ठिकाणी "आम्हास माहीत नाहीं" असें आम्ही म्हणू, पण केवल रूपासबधी ज्ञान होणे शक्यच नाही. 'एक्स' किरणाच्या बाबतीत त्याचे कारण ज्ञानाच्या कक्षेच्या हद्दीत असताही ते आम्हास समजले नाहीं, पण ते अजून समजले नाहीं इतकेच, पुढे मागें ते समजेल पण दुसरा प्रश्न ज्ञानाच्या हद्दीच्या बाहेरचा आहे. तो ज्ञानाच्या कक्षेच्या आत येऊच शकत नाही. यामुळें त्याचे उत्तर केव्हाही समजणे शक्य नाही, ज्ञाता स्वत लाच कसा जाणू शकेल ? तुम्ही स्वत लाच प्रत्यक्षत्वास कसा आणू शकाल ? याच रीतीनें आमच्या तत्त्ववेत्त्यानी आत्म्याचे अमरत्व पूर्वी सिद्ध केले आहे मी मृत होऊन पडलो आहे असे मनात आणण्याचा यत्न मी केला तर मी कशी कल्पना करू ? मी उच्च आहे व एका मृत शरीराकडे पाहात आहे व ते मृत शरीर माझेच आहे अशी कल्पना मी करू काय ? अशी कल्पना मला करता येणार नाही म्हणजे देह आणि मन याव्यतिरिक्त माझ्या केवल रूपाला व्यक्त रूप मला देता येत नाही

---

१७

## उत्क्रांति.

आकाश आणि प्राण याची उत्क्राति होऊन व्यक्तरूपे दिसू लागतात व पुन्हा तीं सूक्ष्मावस्थेस परत जातात असा हिंदुतत्त्वेत्त्याचा सिद्धात आहे. या सिद्धाताचा अर्वाचीन शास्त्रकारांच्या मताशी मेळ जुळतो अर्वाचीन शास्त्री उत्क्रातिमत स्थापन करतात आणि योगीही तेच म्हणतात, तथापि याचे योग्यानी केलेलें स्पष्टीकरण अर्वाचीन शास्त्रकारांच्याहून अधिक सुसबद्ध आहे. एका जातीचे रूपातर प्रकृतीमुळे दुसऱ्या जातीत होते. वस्तूचीं रूपातरे होत होत

मनुष्यप्राणी ही सर्व वस्तूतील श्रेष्ठ जाति होय हा मूळचा सिद्धात आहे या ठिकाणीं प्रकृतीचे कार्य शेताला पाणी लावण्याच्या कार्यासारखे होते असे स्पष्टीकरण भगवान् पतजलींनीं केलें आहे आमच्या उत्क्रातीच्या मार्गातील अडथळे दूर करणे एवढेंच कार्य आमच्या शिक्षणानें व सस्कृतीनें घडते. आमच्यातील ईश्वरत्व तीं प्रकट करीत नसून ते स्वयमेव प्रकट होते. या प्रकट होण्याच्या मार्गांत जे अडथळे असतील तेवढे दूर करण्याचे कार्य मात्र शिक्षण व सस्कृती ही करीत असतात केवळ जगण्याच्या इच्छेनें प्राणिमात्रातील ही धडपड—अहमहमिका—सुरू आहे या मताचे निराकरण या रीतीनें आपोआपच होतें आपल्या आयुष्यक्रमात ज्या दु खोत्पादक गोष्टी घडतात त्या केवळ अडथळयासारख्या आहेत आणि त्याचा समूळ नाश करणे शक्य आहे आपली उत्क्राति होण्यासाठीं या साऱ्या दु खानुभवाची जरूर आपणास आहे असे नाही असले अनुभव अस्तित्वात नसते तरीही आपली उत्क्राति खचित झाली असती उत्क्राति होत जाणे व स्पष्टत्वास येणे हा सर्व वस्तूचा प्रकृतिस्वभावच आहे. स्पष्टत्वास यावें ही इच्छा बाह्यकारणांनी उत्पन्न होत नसून तिची उत्पत्ति अतर्गतच आहे सर्व विश्वाचे अनुभव जीवात्म्यांत गुतून पडले आहेत सर्व विश्वाचे अनुभव जेथे सूक्ष्म रूपाने एकत्र होतात तोच जीवात्मा तेच जीवात्म्याचें स्वरूप आणि या अनुभवापैकी प्रकट होण्यास ज्याना अवसर सापडेल तेवढेच प्रकट होतील

अशा रीतीने बाह्यवस्तू आपल्याभोवतीं विशिष्ट प्रकारची परिस्थिती मात्र उत्पन्न करितात त्या परिस्थितीमुळे काहीं विशिष्ट अनुभवास व्यक्त दशेला येण्यास अवसर सापडतो, व कांही तसेच अस्पष्ट स्थितीत राहतात आपणास जगात अहमहमिका अथवा चढाओढ सर्वत्र आढळून येते तसेच अनेक प्रकारच्या क्लेशकारक परिस्थितीही आढळतात पण ही चढाओढ अथवा ही परिस्थिति अपक्रातीमुळें उत्पन्न झाली असे नाहीं अथवा तीं अपक्रातीला कारण होतात असेही नाहीं उत्क्रातीच्या मार्गांत तीं अडथळा मात्र आणतात. याना अस्तित्व नसते तरीही मनुष्यप्राणी उत्क्रांत होत होत परमेश्वररूप झाला असता, कारण तसे होणे हा त्याचा प्रकृतिस्वभावच आहे उत्क्रांत होण्यास चढाओढीची अथवा अहमहमिकेची जरूर आहे या पाश्चात्य उत्क्रांतिवाद्याच्या भयकर मतापेक्षा आमचे हें मत मला अधिक आशाजनक वाटतें.

इतिहासाचा अभ्यास मी जो जो करतो तो तो पाश्चात्याचे मत चुकीचे आहे असे मला अधिकाधिक आढळून येते मनुष्यानी आपसात लढाया केल्या नाहीत तर त्याची उत्क्राति होणार नाही, सुधारणा होणार नाही असे काही लोक म्हणतात मलाही हे म्हणणे खरे वाटते, पण प्रत्येक युद्धाने मनुष्याची उत्क्राति पुढे न जाता तिची पिछेहाट अर्ध शतकाने तरी झाली आहे असे मला कळून आले हल्लीपेक्षा निराळ्या दृष्टीने इतिहासाचा अभ्यास लोक करतील असा काळ लौकरच येईल त्यावेळी चढाओढ ही उत्क्रातीचे कारण नाही व कार्यही नाही असे त्याच्या लक्ष्यात येईल तसेच उत्क्रातीला तिची आवश्यकता नाही हेही त्यास समजेल

भगवान् पतजलीचे मत हच काय ते विवेकी मनुष्यास मान्य होण्यासारखे आहे असे मला वाटते अर्वाचीन मताने किती दु खे उत्पन्न केली आहेत पहा प्रत्येक दुष्ट मनुष्याला स्वत चे आचरण न्याय्य आहे असे दाखविण्यास हे मत कशी मुभा देते याचा विचार करा सर्व प्रकारच्या अपराध्याचा नि पात करावा असे म्हणणारे अर्वाचीन शास्त्री मला या अमेरिकेत आढळले अशा प्रकारच्या परिस्थितीने उत्क्रातीस अडथळा उत्पन्न होतो उत्क्रातीला तिची आवश्यकता आहे असे मुळीच नाही या चढाओढीत जो अत्यत भयकर प्रकार आहे तो हा की, अशा प्रकारची परिस्थिति नाहीशी करण्याची परवानगी सर्वास आहे, पण या परिस्थितीच्या आणि व्यक्तीच्या युद्धात एक मनुष्य यशस्वी झाला तर दुसऱ्या कित्येकाचा त्यात व्यर्थ पाडाव होतो यामुळे ही चढाओढ कितीही चागली असली तरी एकदरीने तिचे परिणाम अधिक दुष्ट आहेत एकाच मनुष्याला जी परिस्थिति मदत करते आणि त्याच वेळी दुसऱ्या शेकडो लोकास हाय हाय करावयास लावते ती चागली असे म्हणवणार नाही ही चढाओढ हा केवळ आपल्या अज्ञानाचा परिणाम असून आपल्या उत्क्रातीस तिची आवश्यकता नाहीं असे भगवान् पतजली म्हणतात सावकाशपणे काम करून एखाद्या वाईट परिस्थितीतून बाहेर पडण्यास लागणारा धिमेपणा आणि शातता आपल्या आगी नाही, असे समजा कीं एखाद्या नाटकगृहास आग लागली आहे व तेथून बाहेर पडण्यास थोडीच दारें आहेत. अशा वेळीं काही थोडे लोक सुरक्षित बाहेर पडतात बाकीचे लोक आधी बाहेर पडण्याच्या घाईत एकमेकास

चिरडून टाकतात जे थोडेसे बाहेर पडले त्यांना या चेंगराचेंगरीचा काही उपयोग झाला असे नाही अथवा तीमुळे ते नाटकगृह बचावले असेही होत नाही सर्व लोक शांतपणे बाहेर पडले असते तर एकालाही इजा झाली नसती आपल्या या संसाराचीही अशीच स्थिति आहे आपणास मार्ग मोकळे आहेत आणि चढाओढीशिवाय अथवा चेंगराचेंगरी केल्याशिवाय आपण सारे सुरक्षित बाहेर पडू शकू पण असे असताही आम्ही चढाओढ करतोच आपल्या अज्ञानाचा आणि अधीरेपणाचाच हा परिणाम आहे प्रत्येक बाबतीत आपणास अतिशय घाई झालेली असते अडचणींच्या प्रसंगी स्वतःचे चित्त अत्यंत शांत राखणे व अशा प्रसंगी स्वतःच्या कर्तबगारीची धमक बाळगून राहणे हीच खऱ्या सामर्थ्याची लक्षणे आहेत

---

१८

## बौद्धधर्म आणि वेदांत.



बौद्धधर्माचा आणि त्याचप्रमाणे हिंदुस्थानातील इतर सर्व धर्मांचा पाया वेदांत हा आहे पण ज्याला आम्ही अर्वाचीन काळचे अद्वैतमत असे म्हणतो त्याची बरीचशी मते व बौद्धधर्माची मते एकसारखी आहेत. पुराणमताभिमानी हिंदु लोक ही गोष्ट कबूल करणार नाहीत, कारण त्यांच्या मते बौद्धधर्म नास्तिक आहे तथापि अद्वैत मतांत निरीश्वरवाद्याचाही अंतर्भाव होण्याजोगी त्या मताची मांडणी झालेली आहे

वेदांत आणि बौद्धधर्म यांत मतविरोध नाही सर्व धर्मांची व मतांची एकवाक्यता करावी असा वेदांताचा यत्न आहे उत्तरेकडील बौद्धधर्मीयांशी आमचा कोणत्याही प्रकारचा विरोध अथवा मतभेद नाही, पण दक्षिणेकडील ब्रह्मी, सयामी व इतर बौद्धधर्मानुयायी यांच्यांत व आमच्यांत मतभेद आहे प्रत्यक्ष अथवा दृश्य विश्व अस्तित्वात असता त्याच्यामागे अदृश्य अथवा सूक्ष्म विश्व आहे अशी कल्पना आम्ही का करावी असा दाक्षिणात्य बौद्धांचा प्रश्न आहे हे म्हणणे चुकीचे आहे असे उत्तर वेदांताने यावर दिले आहे. दृश्य आणि अदृश्य अशी दोन विश्वे अस्तित्वात आहेत असे वेदांताने

कधीही प्रतिपादिलेले नाही जे काही आहे ते एकच आहे असे वेदाताचे मत आहे आपणास त्याचा इद्रियद्वारा अनुभव होतो तेव्हा ते दृश्य आहे असे दिसते पण वास्तविक ते एकरूपच आहे एखाद्याला दोरीच्या ठिकाणी सर्पाचा भ्रम होतो हा दोर आहे अशी खात्री झाली म्हणजे सर्प दिसेनासा होतो सर्प दिसत असतो त्यावेळी दोर दिसत नसतो व दोर दिसू लागला की सर्प दिसेनासा होतो अशा रीतीने एका वेळी एकच वस्तु तो पहात असतो सर्प आणि दोर अशा भिन्न वस्तु एकाच वेळी त्यास कधीही दिसत नाहीत आम्ही दोन विश्वे मानितो हा बौद्धाचा आम्हावरील आरोप सर्वथा खोटा आहे दृश्य जग तेवढेच अस्तित्वात आहे असे त्यास वाटल्यास त्यानी खुशाल म्हणावे, पण इतरानाही आपापली मते प्रतिपादन करण्याचा हक्क त्यानी दिला पाहिजे इतरानी आपली मते प्रतिपादू नयेत असे म्हणण्याचा त्यास अविकार नाही

दृश्य विश्वापलीकडे दुसऱ्या कोणत्याही कल्पनेस बौद्ध धर्मात थारा नाही दृश्य विश्वाचे अस्तित्व आहे तोपर्यंत इच्छेचा उद्भव होणारच इच्छेमुळेच ही सर्व उत्पत्ति झाली आहे बौद्ध धर्माची ही मते वेदातास मान्य नाहीत. इच्छा ही दुसऱ्या कशापासून तरी उत्पन्न झाली असून तिचे अस्तित्व स्वतत्र नाही असे आमचे मत आहे इच्छा ही निर्मित वस्तू आहे तो मिश्र पदार्थ आहे तो मूलरूप पदार्थ नाही बाह्य पदार्थावाचून इच्छेची उत्पत्ति होणार नाही इच्छेने हे विश्व उत्पन्न झाले हे मत मूलत च अशक्य कोटीतले आहे असे स्पष्ट कळण्याजोगे आहे बाह्य पदार्थाकडून गति मिळाल्यावाचून इच्छा उत्पन्न होते असा अनुभव आपणास केव्हातरी आला आहे काय? बाह्य पदार्थाकडून चेतना मिळाल्यावाचून इच्छा उत्पन्न होणे शक्य नाही. हीच गोष्ट अर्वाचीन तत्त्वदर्शाच्या भाषेत बोलावयाची म्हटली तर बाह्य पदार्थाचा आघात ज्ञानततूवर झाल्यावाचून इच्छा उत्पन्न होत नाही असे म्हणता येईल. इच्छा म्हणजे मेदूची एक प्रकारची प्रतिक्रिया यालाच साख्यानी बुद्धि असे नाव दिले आहे ही प्रतिक्रिया निर्माण होण्यास प्रथम क्रिया झाली पाहिजे. आणि बाह्य विश्वाच्या अस्तित्वावाचून क्रिया होऊ शकणार नाही बाह्य विश्व अस्तित्वात नसेल तर इच्छाही अस्तित्वात येणार नाही हे स्वाभाविक आहे असे असताही इच्छेने विश्व निर्माण केले असे तुम्ही म्हणता. मग इच्छा

कोणी निर्माण केली? इच्छा आणि विश्व याचे अस्तित्व समकालीनच आहे ज्या गतीने विश्व निर्माण केले त्याच गतीचे इच्छा हे एक दुसऱ्या प्रकारचे स्पष्ट रूप आहे, तथापि तत्त्वविचार येथेच मुक्काम करू शकणार नाही इच्छा हे मिश्ररूप आहे अतर्गत व बहिर्गत अशा दोन उपाधीच्या मिश्रणानें इच्छा उत्पन्न होते ज्याला कोणत्याही प्रकारचे इद्रिय नाही असा एखादा मनुष्य जन्मास आला आहे अशी आपण कल्पना करू अशा मनुष्याला कोणतीही इच्छा उत्पन्न होणे शक्य नाही बाह्य वस्तूचा आघात झाला म्हणजे अतर्गत शक्तीचा काही अश घेऊन मेदू प्रतिक्रिया करतो ही प्रतिक्रिया म्हणजे इच्छा ही समोरची भित अथवा दुसरा एखादा पदार्थ जितक्या प्रमाणाने मिश्ररूप आहे तितक्याच प्रमाणानें इच्छाही मिश्ररूप आहे इच्छेने विश्व निर्माण केले ही जर्मन तत्त्ववेत्त्याची उपपत्ति आम्हास मुळीच मान्य नाही इच्छा ही स्वत च दृश्य स्वरूपाची आहे आणि याकरताच ती केवलरूप होऊ शकणार नाही निर्माण झालेल्या अनेक आकारापैकी इच्छा हाही एक आकारच आहे जे काही आहे ते स्वत इच्छा नसून इच्छेच्या रूपाने ते स्पष्ट झालें आहे ही विचार-सरणी सहज ध्यानात येण्यासारखी आहे पण बाकीचे सर्व विश्वही इच्छेचे स्पष्टरूप आहे हे लक्षात येण्यासारखे नाही कारण, विश्व आणि इच्छा याच्या स्वतत्र कल्पना आपणास कधींच करता येत नाहीत जें स्वतत्ररूप आहे ते इच्छेच्या रूपानें प्रकट होते तेव्हा त्याला देश, काल आणि निमित्त या उपाधि लागलेल्या असतात जर्मन तत्त्ववेत्ता कॅट याचे विवेचन पहा देश, काल आणि निमित्त या उपाधीच्या हद्दीच्या आतच इच्छेचे अस्तित्व आहे अशा स्थितीत इच्छा ही केवलरूप कशी होऊ शकेल? कालकल्पना चित्तात अगोदर असल्याशिवाय कोणाच्याही ठिकाणी इच्छेची उत्पत्ति होणार नाहीं

सर्व विचाराची उत्पत्ति आपणास बद करता आली तर आपण विचारातीत आहों हें आपणास समजेल 'नास्ति' 'नास्ति' या नकारात्मक पद्धतीने ही गोष्ट आपणास सिद्ध करता येते सर्व दृश्य विश्वाचा लय अशा नकारात्मक पद्धतीनें झाला म्हणजे जें काही उरते तें तेंच उरते ते भाषेनें सागतां येत नाही. तसेंच तें दृश्यत्वासही आणता येत नाहीं कारण ते दृश्यत्वास आलें की त्याचे रूपांतर इच्छेतच होतें

---

१९

## वेदांत.

— ० —

मनुष्य जन्माला येत नाही, मरत नाही अथवा स्वर्गालाही जात नाही असे वेदाताचे मत आहे जीवात्म्याच्या दृष्टीने पाहता पुन पुन जन्ममरण होणे ही केवळ वध्यासुताची कहाणी आहे असे वेदाती म्हणतात प्रत्येक जीवात्मा सर्वव्यापी असल्यामुळे तो जाणार कोठे आणि येणार कोठून? जन्म आणि मृत्यु ही प्रकृतीची स्थित्यतरें असून चुकीनें आपण त्यास आपणाकडे लावून घेतों पुन्हा जन्म पावणे ही प्रकृतीची उत्क्राति व अतस्थ ईश्वराचे स्पष्टत्वास येणे होय

पूर्वकर्मानुसार नवा जन्म मिळन असतो असे वेदाताचे मत आहे. आपणास सर्व पूर्वजन्माचे ज्ञान प्राप्त झाले म्हणजे आपण मुक्त होतो मुक्त होण्याची इच्छा धर्मप्रवृत्तीच्या रूपाने अगदी बालपणीच प्रकट होते, व थोड्याशा वर्षांनी त्याला सर्व ज्ञान प्राप्त होते पहिला जन्म सपून दुसरा जन्म येण्याच्या पूर्वी मध्यतरी जो काळ जातो तोही व्यक्त प्रकृतीच्या हद्दीतच असतो

जीवात्म्याचे वर्णन करावयाचे झाले तर ते अशा शब्दाने करता येईल, आत्म्याला तरवार कापू शकत नाही अथवा भाला त्याला भोसकू शकत नाही, विस्तव त्याला जाळू शकत नाही अथवा पाणी त्याला भिजवू शकत नाही, तो अविनाशी व सर्वव्यापी आहे, यामुळे त्याकरता शोक करणे फुकट आहे

जीवात्म्याचे दृश्यस्वरूप आज वाईट दिसत असले तरी कालेकरून ते चागले होईल असे आम्ही वेदाती मानतो. मुख्य तत्त्व हे आहे की प्रत्येक मनुष्य सर्वकाल मुक्तच आहे प्रत्येकाला अखेरीस मुक्ति मिळालीच पाहिजे मुक्त —स्वतत्र-होण्याची जी इच्छा आपल्या ठिकाणी आहे तिनें प्रेरित होत्साते आपण सर्व त्या मार्गाने धडपड करतो मुक्तीशिवाय इतर प्रकारच्या सर्व इच्छा भ्रामक आहेत जे जे चागले कर्म मनुष्याच्या हातून घडते ते ते मुक्तावस्थेचे दृश्यरूप आहे असे वेदाती सागतात.

जगातील सर्व दुष्टत्व कधीकाळी तरी समूळ नष्ट होईल असे मला मुळीच वाटत नाही हे होणे शक्य तरी आहे काय ? हा समोरचा ओढा एकसारखा वाहत आहे एका बाजूने पाण्याचे लोढेच्यालोढे जात असतात पण दुसऱ्या बाजूने तसेच लोढे येत असतात

तुम्ही सर्व पवित्र आणि पूर्ण आहा असे वेदात सागतो तसेच चागले आणि वाईट या दोहोच्याही पलीकडची जी स्थिति आहे तीच तुमची स्वाभाविक स्थिति आहे असेही वेदाताचे सागणे आहे ती स्थिति चागल्याच्याही पलीकडची आहे त्याहून ती उच्चतर अवस्था आहे चागले म्हणजे वाईटाहून त्या स्थितीच्या अधिक जवळचे रूप

चागले आणि वाईट असा भेद आम्ही वेदाती करीत नाही वाईट या शब्दाऐवजी अज्ञान या शब्दाचा उपयोग आम्ही करतो

नीतीची सर्व तत्त्वे व लोकाशी चालू असलेला व्यवहार ही सर्व कितीही उत्तम असली तरी ती प्रकृतीच्या हद्दीतीलच आहेत अज्ञान वगैरे गुणाचा आरोप परमेश्वरावर करण्याचे आमच्या मनातही येणार नाही तो सच्चिदानदरूप आहे इतकेच आम्ही म्हणतो कोणताही विचार अथवा कोणतीही भाषा त्याच्या सबधी वापरली की तत्क्षणीच त्याचे स्वरूप पालटून तो प्रकृतीच्या हद्दीत येतो

“ मी परमेश्वर आहे ” असे विधान इद्रियगत जगासबधी करता येणार नाही ही विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे या जगात वावरत असता तुम्ही असे विधान केले तर एखादा अनाचार करीत असताही तुमचा हात धरणारा कोण आहे ? याकरता अशा प्रकारचे विधान इद्रियातीत स्थितीत मात्र खरे आहे हे लक्षात ठेविले पाहिजे जर मी परमेश्वर असेन तर इद्रियजन्य विकारापलीकडे मी असलो पाहिजे व अशा स्थितीत माझ्या हातून कोणतेही दुष्कर्म घडणे शक्य नाही केवळ नीतितत्त्वास धरून चालणें हेंच मानवी जीविताचे अतिम ध्येय नाही, पण मुक्तीच्या मार्गात नीतीचा उपयोग साधनासारखा होतो. मुक्ति मिळविण्याचे ते एक साधन मात्र आहे हे खरें जीवात्मा परमात्मरूप आहे हे जाणण्याचा योग हाही एक मार्ग आहे असे वेदात सागतो प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी जें स्वातत्र्य मूलत च आहे ते जाणणे हीच मुक्ति सर्व धर्माचे व नीतीचे अखेरचे साध्य हेच आहे यापुढे बाकी

सर्व कमी दर्जाचे आहे हा मुख्य मुद्दा लक्षात ठेवला म्हणजे नीति वगैरे सर्व शास्त्र त्याला अनुरूप अशा मार्गाने आपोआप चालू लागतील

अद्वैत तत्त्वज्ञानासबधी जे अनेक प्रकारचे आक्षेप ऐकू येतात त्या सर्वाची गोळा बेरीज थोडक्यात अशी करता येईल इद्रियजन्य सुखाचा आस्वाद प्राप्त होण्यास अद्वैताची मदत होत नाही. हा आक्षेप आम्ही मोठ्या सतोषाने कबूल करतो

वेदात मताचा आरभ तीव्र अशा निराशावादापासून होऊन त्याचा अत मात्र अत्यत खऱ्या अशा स्वरूपाच्या आशावादात होतो हा आशावाद इंद्रियजन्य सुखाचा नसून इद्रियातीत अशा स्थितीसबधी आहे असे आम्ही आधीच सागतो खरे सुख इद्रीयाच्या हद्दीत नसून इद्रियातीत स्थितीत ते आहे जगात आशावादाचे जे स्वरूप दृष्टीस पडते ते अखेरीस तुम्हास इद्रियजन्य सुखाच्या मागे लावून तुमचा नाश मात्र करील.

आमच्या तत्त्वज्ञानाच्या मार्गात सन्यास हा एक मोठा महत्त्वाचा मुद्दा आहे बाह्याचा त्याग म्हणजे खऱ्या आत्मस्वरूपाचे दर्शन इद्रियगत जगासबधी वेदात नैराश्यवादी आहे, पण इद्रियातीत स्थितीसबधी तो पूर्ण आशावादी आहे

मनुष्यातील विवेचक बुद्धीचे महत्त्व वेदाताला मान्य आहे, तथापि बुद्धीपेक्षाही उच्चतर असे एक तत्त्व आहे असेही तो सागतो आता या उच्चतर तत्त्वाकडे जाण्याचा मार्ग बुद्धीच्या द्वारे आहे हे मात्र खरे

बुद्धि जागृत झाली म्हणजे जुन्या पुराण्या भ्रामक समजुती नाहीशा होतात याकरिता बुद्धीची मदत आपणास आवश्यक आहे भ्रामक समजुती नाहीशा झाल्या म्हणजे जे धर्मज्ञान शिल्लक उरते तोच वेदात सस्कृतात एक फार सुदर कविता आहे तीत तो कवि म्हणतो "मित्रा, तू दु ख का करतोस ? तुला मृत्यूची भीति नाही मग तू कष्टी का होतोस ? दु ख तुला स्पर्श करू शकत नाही. अनत नीलाकाश ज्याप्रमाणे सदैव एकरूप असते त्याचप्रमाणे स्वभावत तू स्थित्यतररहित आहेस नाना वर्णाचे ढग आकाशात सचार करतात क्षणभर इकडे तिकडे बागडतात आणि काही काळाने नाहीसे होतात आकाश मात्र जसेच्या तसेच असते तुलाही तुझ्या चित्तावरील ढग पळवून लावणे एवढच काम करावयाचे आहे"

दरवाजे उघडून देऊन रस्ता मोकळा करणे हें आपले काम आहे जल-प्रवाह आपोआप धांवत येऊन सर्व जागा भरून टाकील, कारण तो आणण्यास दुसरीकडे कोठे जावयास नको तो स्वयभूच आहे

मनुष्य प्राण्याला बऱ्याच अशी जाणीव असते व काही अशी त्याला जाणीव नसते. या जाणिवेच्या पलीकडे जाणे त्याला शक्य आहे आपल्या हातून काही पुरुषार्थ घडेल तेव्हाच आपण बुद्धीच्या पलीकडे जाऊ शकू अगी पौरुष आल्यावाचून ही गोष्ट घडणे शक्य नाही. श्रेष्ठ आणि कनिष्ठ ही शब्दरचना केवळ दृश्य जगापुरतीच आहे इद्रियातीत स्थितीत हे शब्द उच्चारणे म्हणजे परस्परविरोधी भाषण करणे होय, कारण त्या स्थितीत भेदाला थाराच नाही दृश्य सृष्टीतील स्पष्ट रूपात मानवी रूप श्रेष्ठतम आहे मनुष्य हा देवापेक्षाही श्रेष्ठ आहे असे वेदाती म्हणतात देवानाही मरून मृत्युलोकी मनुष्यजन्म घ्यावा लागेल. ते मनुष्यदेहात येतील तेव्हाच ते पूर्णत्व पावतील

एखादा धर्मपथ आपण निर्माण करतो तथापि कोणताही धर्मपथ पूर्ण नाही हे कबूल करणे आपणास भाग आहे कारण सत्य जे आहे ते पथाच्या आणि मताच्या पलीकडे आहे आपण स्थापिलेला पथ इतर पथाहून अधिक श्रेष्ठ आहे असे तुलनेने ठरविण्यास आपण तयार असतो आपला पथ इतर पथापेक्षा विवेचक बुद्धीला अधिक मान्य होण्याजोगा आहे असेही आपण सिद्ध करू पाहतो, तथापि तो पथ पूर्ण नसतो, कारण विवेचक बुद्धि ही स्वत च अपूर्ण आहे असे आहे तरी मानवी मनाला आकलनाचे जे सामर्थ्य आहे त्या दृष्टीने पाहता वेदात धर्म हाच एक विवेचक बुद्धीला पटण्यासारखा धर्म आहे

कोणताही पथ झाला तरी त्याच्या आगी जिवटपणा येण्यास त्याचा प्रसार झाला पाहिजे वेदाता इतका प्रसार दुसऱ्या कोणत्याही धर्माचा झालेला नाही खरे धर्मज्ञान होण्यास गुरूचे सान्निध्यच अवश्य आहे आगी पौरुष उत्पन्न होण्याचे कार्य ओझेभर ग्रथ वाचूनही होण्यासारखे नाही आजपर्यंत ज्यानी पुरुषार्थ करून दाखविला ते सारे सत्सगतीतच वाढलेले होते सताच्या सान्निध्यानेंच त्याच्या आगी पौरुष बाणले आता असे लोक अगदी थोडे आहेत ही गोष्ट खरी, तथापि त्याची सख्या वाढत जाईल असे आहे तरी सर्वत्र सर्वच तत्त्ववेत्ते कधी काळी तरी होतील असे मानता येत नाही.

जगांतील सर्व दु:ख नष्ट होऊन तेथे निर्भेळ सुखाचे साम्राज्य होईल असे आम्ही वेदाती मानीत नाहीं

पूर्णानदाचा असा एखादा क्षण आपल्या आयुष्यात येतो **'यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति'** अशा कोटीत एखाद्या क्षणी आपला प्रवेश होतो, पण तत्क्षणीच ही स्थिति नष्ट होऊन या जगाचा विस्तृत देखावा आपल्या नजरेसमोर हालचाल करू लागतो परमेश्वररूपी शुभ्रपटावर हा चित्रविचित्र रगाचा देखावा रगविला आहे हे त्यावेळी आपणास समजते.

निर्वाणाची प्राप्ति येथेच आणि याच क्षणी होईल अशी वेदाताची शिकवणी आहे निर्वाणाची प्राप्ति होण्यास देहपातापर्यंत वाट पहाण्याची आवश्यकता नाही असे वेदाताचे सागणे आहे निर्वाण म्हणजे आत्मानुभव असा आत्मानुभवाचा प्रत्यय क्षणभरही आला तरी मायेच्या मृगजलाने आपण पुन्हा मोहित होत नाही मानवी दृष्टि शिल्लक असल्यामुळे दृश्य जग आपणास दिसेल तथापि त्याचे खरें स्वरूप काय आहे याचे ज्ञान आपणास नित्य असेल, कारण त्याचा अनुभव आपणास झालेला असतो आत्मा स्थित्यतररहित असून त्याच्या पुढे जो पडदा पडला आहे तो त्याला लपवून ठेवीत असतो हा पडदा उघडला गेला की मागे आत्मा स्वयमेवच आहे जी काही स्थित्यतरे आपणास दिसतात ती त्या पडद्यावर होत असतात. सत्पुरुषाच्या ठिकाणी हा पडदा अत्यत पातळ झालेला असतो यामुळे त्याचे आत्मतेज त्यातून बाहेर पडत असते पापी मनुष्यात हा पडदा घनदाट असतो यामुळे त्याच्यातील आत्मरूपाचा प्रत्यय आपणास येत नाही व ते रूप त्याच्या ठिकाणी आहे की नाही असाही भ्रम उत्पन्न होण्याचा सभव असतो, तथापि सत्पुरुषाप्रमाणेच त्याच्याही ठिकाणी तेच आत्मरूप आहे हा पडदा सबध दूर झाला म्हणजे त्याला खरोखर अस्तित्वच नव्हते असा अनुभव आपणास येतो आपण केवळ आत्मरूप असून तेथे पडदा केव्हाच नव्हता असे आपण म्हणू लागतो, त्या पडद्याची पूर्ण विस्मृति आपणांस पडते

ज्याला आत्मानुभव झाला असेल तो मनुष्य ऐहिक गोष्टींनी लिप्त होत नाही व अशाच प्रकारचा मनुष्य जगाचे कांही तरी बरें करू शकतो. आत्मानुभवाच्या स्थितीतील मनुष्याचे असे द्विधारूप आहे परक्याचे बरे का

करावे याचे कारण अशाच मनुष्याला पूर्णपणे अवगत असते तो कोणाचे बरे करतो यात त्याच्या ठिकाणी अहभाव असतो असे म्हणता येत नाही, कारण जेथे ‘ अह ’ शिल्लक आहे तेथे भेदबुद्धिही आहे. त्याच्या ठिकाणचा अहभाव पूर्ण नाहीसा झालेला असतो अहकाराचा पूर्ण लय हाच. त्याचा अहकार नष्ट होऊन तो ब्रह्माकार झालेला असतो तो कोणावर जे प्रेम करतो अथवा कोणाला जी सहानुकपा दाखवितो तिचे स्वरूप वैय्यक्तिक नसून विश्वव्यापी असते त्याच्या ठिकाणचे ‘ मी ’ जाऊन तेथे ‘ तू ’ आलेले असते दुसऱ्याच्या ठिकाणीही मीच असल्यामुळे तो दुसऱ्याला मदत करीत असतो परक्याकरिता प्रसगी प्राणदानही करणे ही गोष्ट एक वेदातीच करू जाणे असे करीत असता त्याचे चित्त यत्किंचितही कचरणार नाही, कारण, मृत्यु आपणास स्पर्श करू शकत नाही ही गोष्ट त्याला ठाऊक असते जोपर्यंत जगात एक कीटक तरी जिवत आहे तोपर्यंत तो वेदातीही जिवत आहेच जोपर्यंत एकातरी तोडात अन्नाचा घास पडत आहे तोंपर्यंत वेदातीही खात आहेच अशा रीतीने परक्याचे हित तो एकसारखा साधीत असतो स्वत च्या देहाची फिकीर अर्वाचीन परोपकारी लोकाप्रमाणे त्याला बाळगावी लागत नाही अशा प्रकारच्या त्यागाच्या स्थितीला मनुष्य पोचला म्हणजे सर्व प्रकारच्या कर्तव्याकर्तव्यकल्पनेच्या बाहेर तो जातो तो सर्वाच्या पलीकडचा असतो

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**

**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिन·** ( भ गी अध्याय ५ वा )

अशा प्रकारच्या पडिताच्या स्थितीला तो पोचलेला असतो ब्राह्मण, गाय अथवा कुत्रे याजकडे तो ब्राह्मण, गाय अथवा कुत्रें या दृष्टीने पाहत नसून या निरनिराळ्या रूपानी ते एकच रूप प्रकट झाले आहे असे तो जाणतो अशा प्रकारचा मनुष्यच खरा सुखी होय याच आयुष्यात ज्याने अशा प्रकारची स्थिति प्राप्त करून घेतली त्याने त्रैलोक्य जिकले असे म्हणावयास हरकत नाही परमेश्वर पवित्र आहे याकरिता अशा स्थितीतील मनुष्याचा वास परमेश्वराच्या ठिकाणी असतो असे म्हटले आहे येशूख्रिस्त म्हणतो, ‘आब्राहामापूर्वीही मी होतो ’ याचा अर्थ इतकाच की येशूख्रिस्त आणि त्याच प्रकारचे दुसरे आत्मे हे मुक्तात्मे होत नाझारेथच्या येशूने मानवी रूप धारण केले ते पूर्वकर्माचा परिपाक म्हणून नव्हे तर मनुष्यजातीच्या कल्याणाकरिता

त्याने तसे केले मनुष्य मुक्त झाला म्हणजे त्याची सर्व गति खुटते अथवा दगडधोंड्यासारखा तो जड होऊन बसतो असे नव्हे उलट इतर कोणाही माणसापेक्षा त्याची गति अधिक तीव्र झालेली असते कारण तो कर्म करतो ते दुसऱ्या कोणी भाग पाडल्यामुळे नव्हे इतर मनुष्ये असहाय होऊन कर्मे करीत असतात त्याची इच्छा असली अथवा नसली तरी प्रकृती त्याजकडून कर्मे करवीत असते मुक्तात्मा मात्र बंधरहित होत्साता कर्मे करितो

परमेश्वर आणि आम्ही एकरूप आहो असे असेल तर आम्हाला कांही व्यक्तिविशिष्टरूप नाही काय ? अवश्य आहे आमचे जें व्यक्तिविशिष्टत्व तेच परमेश्वराचे रूप तोच परमेश्वर आपले सध्याचे जे प्राकृतिक विशिष्टत्व आहे ते मात्र परमेश्वराचे रूप नव्हे हे लक्षात ठेविले पाहिजे त्या विशुद्ध रूपाकडे आपण हळूहळू जात आहो जिथे कोणताही भेद नाही ती एकरूपता, आणि तेच आपले विशिष्टत्व अशा स्थितीत आपले सध्याचे व्यक्तित्व त्या एकरूपतेचे आहे असे कसे म्हणवेल ? एका क्षणी तुमच्या विचाराचा प्रवाह एका दिशेने वाहात असतो, दुसऱ्या क्षणी तो दुसऱ्या दिशेने वाहतो आणि तिसऱ्या क्षणी आणखी भलतीकडेच वाहतो ज्यात केव्हाही स्थित्यंतर होत नाही तेच खरे व्यक्तित्व जे सर्व वस्तूपलीकडे असून ज्यात केव्हाही बदल होत नाही तेच खरे व्यक्तित्व आपले सध्याचे व्यक्तित्व केव्हाहि बदलावयाचे नाही असे म्हटले तर मोठे अनर्थ कोसळतील आपली सध्याची स्थिति चिरंतन राहिली तर चोर हा अक्षय चोरच राहील एखादा गळेकापू काळाच्या अंतापर्यंत गळेकापूच राहील एकादे मूल बाल्यदशेत मेले तर अखेरपर्यंत ते मूलच राहील जें कधीही बदलत नाही व भविष्यत्कालीही बदलावयाचे नाही ते आपणातील चैतन्य अथवा ईश्वरी रूप होय

वेदांत हा एखाद्या महासागराप्रमाणे आहे. एखाद्या महासागरात प्रचंड लढाऊ जहाज आणि क्षुद्र होडगे ही जशी सुखाने एकत्र नांदतात त्याचप्रमाणे या सागरावरही खरा योगी, एखादा मूर्तिपूजक अथवा एखादा शुद्ध नास्तिक सुखानें शेजारी शेजारी नांदू शकतात फार काय सांगावे ? या महासागरावर हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी अथवा दुसरे कोणत्याही धर्मांचे लोक हे वस्तुत एकरूपच असतात सर्व त्या एकाच परमसमर्थाची लेकरे होत.

---

२०

## कायदा आणि मुक्ति.

मुक्तात्म्याला अहमहमिका अथवा चढाओढ या शब्दाचा अर्थच कळत नसतो, पण आपणासारख्या सामान्य स्थितीतील मनुष्याच्या ठिकाणी हे शब्द सार्थ आहेत, कारण, नामरूपामुळेच जग निर्माण झाले आहे

वेदातदृष्टीने ही अहमहमिका कोणास सुटलेली नाही वेदातानेही चढाओढीला स्थान दिले आहे भीतीला मात्र वेदातात ठाव नाही. तुमचे खरें स्वरूप तुम्ही प्रकट करू लागलां म्हणजे सर्व भीति नष्ट होते आपण बद्ध आहो असे तुम्हास वाटले की तुम्ही खरोखरच बद्ध होता व बद्धच राहता आपण मुक्त आहो असा निश्चय तुम्ही केला की तुम्ही मुक्त व्हाल

सर्व दृश्य जग अनुभवीत असताही आपण स्वतत्र आहो असे जें आपल्यास वाटतें तो त्या खऱ्या मुक्तीचा अशमात्र प्रत्यय आहे ती खरी मुक्ति नव्हे

प्रकृतीच्या कायद्यास अनुसरून वागणे हेच खरे स्वातत्र्य होय हें मत मला मान्य नाही या मताचा अर्थ काय हेच मला समजत नाही मनुष्य प्राण्याच्या सस्कृतीच्या वाढीचा इतिहास अवलोकन केला तर प्रकृतीचे कायदे मोडण्यानेच त्याने आपली उन्नति करून घेतली आहे असे आढळून येईल आता वरिष्ठ प्रतीच्या कायद्यास मान वाकवून त्याच्या द्वारे कनिष्ठ प्रतीच्या कायद्यावर मनुष्यप्राण्याने जय मिळविला असेही कोणी म्हणेल, पण अशा स्थितीतही ते विजयी मन पूर्ण मुक्तीसाठी धडपडत होते असे नि सशय दिसून येईल. कोणत्यातरी कायद्यास मान वाकविली पाहिजे असे दिसताच ते त्या कायद्यालाही गुडाळून ठेवण्यासाठी धडपडू लागते. एवच अखेरीस कोणताही कायदा पाळावयाचा नाही व कायद्याच्या बाहेर जाऊन मुक्त व्हावयाचे हाच मानवी मनाचा अतिम हेतू दिसतो एखादे झाड प्रकृतीचा कोणताही कायदा मोडीत नाही, एकादी गाय कधी दरोडे घालीत नाही, मासा कधीही खोटे बोलत नाही पण असे आहे म्हणून हे प्राणी मनुष्यापेक्षा मोठे म्हणता येतील काय ? आपण मुक्त आहो हे सिद्ध करण्याकरिताच या जीविताची

ही सारी धडपड चालू आहे कायद्याला अनुसरून वागणे या कल्पनेचा अतिरेक झाला तर अखेरीस आपण नुसते मृत्पिड बनू. समाजात काय, राज्य-व्यवस्थेत काय अथवा धर्ममार्गात काय सर्वत्र हाच कायदा लागू आहे कायद्याचे सूक्ष्म जाळे विणलेले असणे हे मृत्यूचे निश्चित चिन्ह होय ज्या समाजात कायद्याची सख्या पुष्कळ आहे तो समाज नष्ट होण्याच्या मार्गास लागला हें तुम्ही निश्चित समजा हिदुस्थानाच्या सामाजिक रचनेचा इतिहास तुम्ही पाहिला तर तेथल्या इतके सामाजिक कायदे दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रात अस्तित्वात नाहीत, असे तुम्हास आढळून येईल आणि हिंदुस्थान आज मृत्पिड बनला आहे हे तुम्ही पहात आहाच, तथापि हिंदूच्या एका विशिष्ट कल्पनेने त्याचे रक्षण केले धर्माच्या बाबतीत अट्टाहासाला त्यानी स्थान दिले नाही केवळ अट्टाहासाने विशिष्ट मताला अथवा पथाला ते चिकटून बसले नाहीत यामुळे तेथे धर्माची जितकी वाढ झाली तितकी ती दुसऱ्या कोठेही झाली नाही कोणताही चिरतन स्वरूपाचा कायदा ही मुक्ति नव्हे. कारण अनतरूप कायद्याच्या हद्दीच्या आत आहे असे म्हणणे म्हणजे त्याला निगडित करणे होय

परमेश्वर हेतुविरहित आहे, कारण त्याच्याही ठिकाणी एखादा हेतु असेल तर मनुष्यात आणि परमेश्वरात अतर ते काय ? परमेश्वराला हेतू का असावा ? जर त्यालाही एखादा हेतू असेल तर त्या हेतूनें तो बद्ध होईल अशा स्थितीत त्याहूनही आणखी एखादी मोठी वस्तु अस्तित्वात आहे असे म्हणावे लागेल एखादा विणकर एक पट तयार करतो पटकल्पना त्याच्या मनाच्या बाहेरची होती ती कल्पना स्वत त्याच्याहून अधिक विस्तृत होती ज्या ठिकाणी परमेश्वराचे अस्तित्व सभवत नाही अशी एखादी वस्तु असू शकेल काय ? अशी वस्तु असू शकणार नाही ज्याप्रमाणे एखादा बादशहा बाहुल्याशीही घटकाभर खेळत बसतो त्याचप्रमाणें परमेश्वर प्रकृतीशी खेळ करीत आहे त्याच्या खेळण्याच्या या पद्धतीला आपण कायदा असें नांव देतों या प्रचड सृष्टींतील काही थोडा थोडा भाग सुरळीतपणे चालत असल्याचें आपणास दिसते, म्हणून ती कायद्यानें चालली आहे असे आपण म्हणतो, पण आपल्या या साऱ्या कायद्याचा समावेश या अत्यल्प अशात झालेला आहे हें विसरता कामा नये कायद्याचे स्वरूप अनत आहे

असे म्हणणे मूर्खपणाचे आहे जड वस्तु अनत काळपर्यंत पृथ्वीकडे एकसारख्याच ओढल्या जातील असे म्हणणेसुद्धा चुकीचे आहे आपल्या विवेचकबुद्धीची सर्व इमारत अनुभवावर रचलेली असते हे खरे असेल तर पन्नास लक्ष वर्षापूर्वी अधातरी असलेला पदार्थ पृथ्वीवर पडतो हे पाहण्यास कोण जिवत होता ? याकरिता कायदा आणि मानवी मन याचा सहोदर सबध आहे असे नाही ज्या ठिकाणी आरभ होतो त्याच ठिकाणी अतही होतो असा नियम अर्वाचीन शास्त्रे सागतात वास्तविक पाहता हळूहळू आपण कायद्याच्या मर्यादेबाहेर जात असतो व अखेरीस ती मर्यादा आपण सपूर्ण उल्लघन करतो ही मर्यादा उल्लघन करीत असता आपण साऱ्या आयुष्यभर कित्येक अनुभव मिळवितो ते वेगळेच परमेश्वर आणि मुक्ति याजपासून आपला आरभ झाला व त्यातच आपला अतही होणार हे कायदे म्हणजे या दोहोच्या मधल्या स्थितीतील आहेत त्यातून आपण सध्या प्रवास करीत आहो आपण सर्वदा मुक्त आहो असा निश्चय करणे हाच वेदात कोणत्याही कायद्याचे अस्तित्व आहे ही कल्पनासुद्धा वेदात्याला भीतिदायक वाटते. मग अनत कायद्याच्या अस्तित्वाची कल्पना त्याला किती भीतिदायक वाटेल हे तुम्हीच पहा कारण या कायद्याला कधीच अत येणार नसला तर त्यातून सुटका होण्याची–मुक्तीची–मुळीच आशा नको कालाच्या अतापर्यंत त्याला बाधून ठेवील असा कायदा अस्तित्वात असला तर गवताच्या पातीत आणि त्याच्यात फरक तो काय ? याकरिता सृष्टीच्या अनत कायद्याच्या या कल्पनेवर आम्ही वेदाती विश्वास ठेवीत नाही.

आपले इतिकर्तव्य मुक्ति मिळविणे हे होय, असे आम्ही म्हणतो मुक्ति मिळविणे म्हणजेच परमेश्वरस्वरूप होणे कोणत्याही वस्तूत जें सुख अथवा जो आनद आढळून येतो तो आणि मुक्तीचा आनद ही वास्तविक एकच आहेत, पण कोणत्याही समर्याद वस्तूशी आपला आनद जेव्हा एखादा मनुष्य निगडित करून ठेवतो तेव्हा त्याला मुक्तीच्या आनदाचा अत्यल्प अश मात्र प्राप्त होत असतो एखाद्या चोराला काही वस्तुलाभ झाला म्हणजे जो आनद त्याला होतो तो आनद आणि भक्ताला परमेश्वराच्या भेटीत झालेला आनद हे एकच आहेत पण चोराचा आनद अत्यत अल्प असून त्याबरोबर दु खाचें भलें मोठे ओझे आलेलें असते खरा शुद्ध आनद म्हणजे परमे-

श्वर शुद्ध प्रेम म्हणजे परमेश्वर मुक्ति म्हणजे परमेश्वर जें बद्ध आहे ते मात्र परमेश्वर नव्हे

मनुष्य सर्वदा मुक्तच आहे, पण अशी वस्तुस्थिति आहे हे त्याला शोधून काढावयाचे आहे आपण मुक्त आहो ही गोष्ट प्रत्येक क्षणी तो विसरत असतो. समजून अथवा न समजून जी जी धडपड आपण साऱ्या आयुष्यभर करीत असतो ती सारी या शोधाच्या मार्गातीलच होय एखादा सत्पुरुष मुक्तीसाठी धडपड करतो आणि अज्ञानग्रस्त मनुष्यही मुक्तीसाठीच सारे उद्योग करीत असतो या दोघात फरक इतकाच की आपण काय करीत आहो व ते कशासाठी करीत आहो याची जाणीव सत्पुरुषास असते आणि अज्ञानी मनुष्याला ती नसते अत्यत क्षुद्र अणूपासून तो देदीप्यमान ताऱ्यापर्यंत सर्व सृष्टि मुक्तीसाठी धडपड करीत आहे या मुक्तीच्या आनदाचा अशमात्र लाभ झाला म्हणजे तो अज्ञ मनुष्य तृप्त होऊन बसतो पोटाची भूक निवली म्हणजे तो तृप्त होतो अथवा तहानेची शातता झाली म्हणजे त्याची आकाक्षा थाबते, पण याहूनही फार बलवान् असे पाश आपणास तोडावयाचे आहेत ही जाणीव साधूच्या ठिकाणी जागृत असते. ताबड्या इडियन लोकाची मुक्तता गुलामगिरीतून झाली तेव्हा आपण सर्वथा मुक्त झालो असे त्यास वाटले असल्या क्षुद्र मुक्तीने साधूचा सतोष व्हावयाचा नाही

मुक्ति हे जीवात्म्याचे अखेरचे साध्य अथवा ध्येय होय असे आमचे तत्त्ववेत्ते सागतात ज्ञान मिळविणे हे अखेरचे साध्य होऊ शकणार नाही, कारण ज्ञान हा मिश्रपदार्थ आहे मुक्ति आणि शक्ति या दोहोचे जे मिश्रण ते ज्ञान, आम्हास फक्त मुक्ति पाहिजे सर्व मनुष्ये या मुक्तीकरिता धडपडत आहेत नुसते सामर्थ्य आपणापाशी असणे म्हणजे ज्ञान जवळ असणे असे होत नाही उदाहरणार्थ एखादा अर्वाचीन शास्त्रपारगत मनुष्य एखाद्या मैलापर्यंत विजेचा धक्का देऊ शकेल, पण प्रकृति अमर्याद स्थलापर्यंत हा धक्का पोहोचवू शकते अशा स्थितीत प्रकृतीचे पुतळे आपण का उभारू नयेत बरे ? कायदा हे आपले अखेरचे साध्य नव्हे कायदा मोडता येण्याचे सामर्थ्य असणे आपणास हवे आहे आपणांला कोणत्याही कायद्याचे बधन नको सर्व कायदे झुगारून देऊन उच्छृखल बनण्याची आपली इच्छा आहे आपण सदोदित कायद्याने

बाधलेले राहू तर मातीच्या गोळ्याची आणि आपली योग्यता सारखीच. आजच्या स्थितीत कायद्याच्या मर्यादेंत आपण आहो की नाही हा महत्त्वाचा प्रश्न नाही, पण आपण कायद्याच्या मर्यादेबाहेर आहो या एका विचारावरच मनुष्यजातीच्या साऱ्या इतिहासाची रचना झाली आहे. असे समजा की एखादा मनुष्य अरण्यात राहतो त्याला कोणत्याही प्रकारचे शिक्षण मिळालेले नसून त्याला काही ज्ञानही नाही तुमचा वरून सुटलेला धोडा खाली पडतो असे तो पाहतो अशा गोष्टी नेहमी घडतात तो धोडा स्वेच्छेने खाली पडला असे त्यास वाटते स्वेछेने वाटेल तिकडे गमन करण्यास त्या धोड्यास मोकळीक होती असे त्यास वाटते. त्या धोड्याला आत्मा आहे अशी त्याची कल्पना होते आत्म्याची कल्पना म्हणजे मुक्तीचीच कल्पना होय पण निराधार धोड्याने खाली पडणे भाग आहे असे ज्ञान त्याला झाले म्हणजे हा प्रकृतीचा कायदा आहे असे तो म्हणतो या पडण्यात धोड्याचे स्वातत्र्य काही नसून ती कृति अचेतन आहे असे तो म्हणतो माझ्या इच्छेस येईल तर येथून उठून मी बाहेर जाईन, अथवा इच्छेस येईल तर येथेच बसेन माझे मनुष्यपण या माझ्या स्वातत्र्यातच आहे अमुक ठिकाणी मी गेलेच पाहिजे असे असेल तर त्याच क्षणी माझे मनुष्यपण जाते आणि मी निव्वळ यत्र बनतो प्रकृतीच्या ठिकाणी अमर्याद शक्ति आहे हे खरें, पण प्रकृती हें निव्वळ यत्र आहे हे लक्षात ठेविले पाहिजे स्वातत्र्य असणे हेच सचेतनत्त्वाचे लक्षण होय अरण्यवासी मनुष्याची सर्वगत स्वातत्र्याची कल्पना बरोबर आहे असे वेदात सागतो त्याची कल्पना बरोबर आहे, पण तिची माडणी करण्याची पद्धत मात्र चुकीची आहे ही सर्व प्रकृति स्वतत्र असून कायद्याच्या मर्यादेत ती नाहीं असे तो म्हणतो अनेक प्रकारचे अनुभव घेऊन अखेरीस आपणही याच कल्पनेस येऊन पोहोचू पण त्या वेळीं तिची सशास्त्र माडणी करण्याचें ज्ञान आम्हास असेल उदाहरणार्थ मला बाहेर रस्त्यात जाण्याची इच्छा झाली माझ्या इच्छाशक्तीची प्रेरणा मला प्रथम मिळते, आणि मी तितकाच थाबतों आता माझ्या इच्छाशक्तीची प्रेरणा आणि माझें रस्त्यात प्रत्यक्ष जाणें या दोहोंमध्यें जो वेळ गेला तो सारा वेळ माझ्या इच्छाशक्तीचे कार्य चालू होते अशा प्रकारें प्रत्येक कार्य आणि कारण याचा सबध न तुटतां चालू राहणें याला आपण कायदा असें म्हणतो. माझ्या अनेक

कृत्यांत पुष्कळ लहान लहान दुवे असतात यामुळे माझी सारी कृत्ये कायद्या-नुरूप चालली आहेत असे मी म्हणत नाही, कारण प्रत्येक दुवा दुसऱ्यापासून वेगळा आहे असे मला वाटते. मी माझ्या स्वतत्र बुद्धीस अनुसरून काम करीत असतों मी पाच मिनिटे चालतों. पण चालण्यात गेलेल्या पाच मिनिटापूर्वी ही माझी इच्छाशक्ति काम करीत होतीच. त्या इच्छाशक्तीने चालण्याची प्रेरणा मला दिली. यामुळें मनुष्यप्राणी स्वतत्र आहे असे आपण म्हणतो त्याची सर्व कामे अशा रीतीने स्वतत्र विभागणीने दाखविता येतील. त्याच्या कार्यप्रवाहात केव्हा केव्हा अखडपणा आढळून आला तरी तेवढ्यामुळें त्याचे स्वातत्र्य नष्ट होते असे नाही, कारण, आपल्या कार्यात त्याला वाटेल तेव्हा बदल करता येतो प्रवाहात अशा रीतीने खड उत्पन्न करण्याचे सामर्थ्य असणे हीच स्वतत्र इच्छाशक्तीची मूळ कल्पना होय. सृष्टीत प्रवाहाचा अखडपणा फार काळपर्यंत चालतो असे आपणास आढळून येते. तथापि सृष्टीचा आरभ आणि अत ही ज्या इच्छाशक्तीने प्रेरित होतात ती इच्छाशक्ति स्वतंत्रच असली पाहिजे आरभी स्वतत्र इच्छाशक्तीने जी प्रेरणा मिळाली तीच एक-सारखी अद्यापि चालू आहे आपल्या स्वत च्या कर्मप्रवाहाशी ताडून पाहतां सृष्टीचा प्रवाह आपणास फार लाबलचक दिसतो. केवळ तत्त्वदृष्ट्या विचार करता आपण स्वतत्र नाही असे शास्त्रदृष्ट्या दिसते तथापि 'मी स्वतत्र आहे' ही जाणीव आपल्या ठिकाणी कायम आहे हे लक्षात ठेवले पाहिजे ही जाणीव कशी उत्पन्न झाली याचा विचार केला पाहिजे आपल्या ठिकाणी दोन प्रका-रच्या प्रेरणा आहेत असे आपणास आढळून येईल आपली सर्व कृत्ये बाह्य कारणानी घडून येतात असें आपली विवेचक बुद्धि आपणास सागते, आणि त्याच वेळी प्रत्येक प्रेरणेबरोबर 'मी स्वतत्र आहे' ही जाणीवही आपल्या ठिकाणी असते वेदांताने या कोड्याचे असे उत्तर दिले आहे की प्रत्येकाच्या ठिकाणी अतर्गत स्वातत्र्य आहे जीवात्मा वस्तुतः स्वतत्र आहे; पण जीवा-त्म्याची कार्यें मन आणि देह याच्या द्वारें घडत असून मन आणि देह हीं स्वतत्र नाहीत.

क्रियेला प्रतिक्रिया आपल्या हातून घडू लागली कीं आपले स्वातत्र्य नष्ट होऊन आपण गुलाम बनतों एकादा मनुष्य मला काहीं दोष लावतो आणि क्रोधाच्या रूपानें मी प्रतिक्रिया करतों. त्यानें जो लहानसा स्पंद उत्पन्न केला

त्या स्पदाने मला गुलाम केले अशा ठिकाणी आपलें स्वातंत्र्य आपण दाखविले पाहिजे.

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥**

सर्वत्र परमेश्वराचे एकच रूप जे पाहतात तेच खरे साधु याच आयुष्यात त्यानी स्वर्ग जिकला असून समानतेच्या पायावर ते स्थिर होऊन बसलेले आहेत परमेश्वर पवित्र आहे त्या अर्थी सर्वच पवित्र असे त्यास वाटतें यामुळे असे साधु म्हणजे परमेश्वराच्या प्रत्यक्ष मूर्तीच होत त्याना जिवत परमेश्वर म्हणण्यास काय हरकत आहे? याच साध्याकडे आपण सर्व जात आहों. आपले पूजनाचे सर्व प्रकार आणि आपली कृत्ये म्हणजे त्या साध्याकडे जाण्याचे मार्गच होत पैशाच्या मागे लागलेला मनुष्य दारिद्र्यशृखलेपासून मुक्त होण्याची इच्छा करीत असतो मनुष्याचे प्रत्येक कृत्य म्हणजे परमेशपूजनच होय कारण, कशातून तरी मुक्त व्हावयाचे आहे या जाणिवेनेच प्रत्येक मनुष्य प्रत्येक काम करीत असतो प्रत्यक्ष अथवा परंपरेनें प्रत्येक कार्य जाणीव दाखवीत असते ज्या कार्यांने आपलें स्वातंत्र्य दुरावते तेवढीच कार्यें त्याज्य होत जाणून अथवा न जाणून सर्व विश्व परमेशपूजन करीत आहे शाप देत असताही परमेशपूजनाचा हाही एक प्रकार आहे हें त्यास समजत नाही इतकेच. कारण जो शाप देत असतो तोही मुक्तीसाठी धडपडत असतोच कोणतेही कार्य प्रतिकार्य म्हणून केल्यानें गुलामगिरीच्या शृखलेत आपण पडतों हें आपल्या लक्षात येत नाही

आपले सामर्थ्य मर्यादित आहे ही कल्पना आपणांस झुगारून देता आली तर सर्व गोष्टी याच क्षणी साध्य करणे आपणांस शक्य आहे हा काय तो कालावधीचा प्रश्न आहे असें असेल तर आपले सामर्थ्य वाढवून कालाची गति कमी करणें आपल्या हाती आहे. संगमरवरी दगड कसा तयार होतो हें शोधून काढून एका शास्त्रज्ञानें बारा वर्षांच्या अवधीत एक तसा दगड तयार केला असा दगड तयार करण्यास सृष्टीला कित्येक शतकांचा काल लागतो. कित्येक शतकानी होणारी गोष्ट बारा वर्षाच्या अवधींत ज्ञानाच्या सामर्थ्यानें सिद्ध झाली हे प्रत्येकानें लक्षात ठेवण्यासारखे आहे.

२१

## आत्मानुभव आणि तो मिळविण्याचे मार्ग.

—०—

सर्व जगानें एकमतानें एकाच धर्माचा स्वीकार केला तर त्यासारखी दुसरी मोठी आपत्ति नाही परमेशपूजनाचा एकच मार्ग सर्वांनी स्वीकारणे व नीतीचें एकच माप सर्व जगाने ठरविणे या सर्वांत मोठ्या आपत्ति होत असें झालें तर जगांतील सर्व धर्म मरून जाऊन जगाची धार्मिक प्रगतिही बद पडेल भल्याबुऱ्या कोणत्याही मार्गानें लोकाच्या मागे लागून त्याना आपला धर्म ग्रहण करण्यास लावण्यापेक्षा त्याच्या दृष्टीनें असणाऱ्या उच्च साध्यातील अडचणी दूर करणे हें आपलें कर्तव्य आहे. आपले ध्येय कितीही उच्च असलें तरी केवळ जबरीनें अथवा गोडीगुलाबीनेही परधर्मीयाकडून त्याचे ग्रहण न समजतां करविणें ठीक नाही. आपला धर्म सार्वत्रिक व्हावा म्हणून जे कोणी यत्न करीत असतील त्याचा उद्योग आपणास वायफळ करावयाचा असेल तर सर्वांस त्यांच्या मार्गांत मदत करणें हाच योग्य मार्ग होय सर्व मनुष्यजातीचे साध्य व सर्व धर्मांचेही अखेरचे साध्य एकच आहे. परमेश्वराशीं ऐक्य हें ते साध्य होय परमेश्वराशी ऐक्य आणि आत्मानुभव ही एकच आहेत. कारण प्रत्येक मनुष्याचे खरें अतर्गत स्वरूप परमेश्वरत्व हेंच आहे. आता साध्य एकत्र असले तरी भिन्न प्रकृतीस अनुसरून ते साधण्याचे मार्ग वेगवेगळे होणें स्वाभाविक आहे

हें साध्य सिद्ध करण्याच्या मार्गास योग असे म्हणतात. युज् म्हणजे संयोग पावणें या सस्कृत शब्दापासून योग शब्द निघाला आहे. योग म्हणजे परमेश्वराशीं अर्थात् आपल्या स्वत च्या खऱ्या स्वरूपाशी संयुक्त होणे. कर्मयोग, भक्तियोग, राजयोग आणि ज्ञानयोग असे योगाचे चार मुख्य प्रकार आहेत

प्रत्येक मनुष्यानें आपल्या प्रकृतिस्वभावानुरूप आपली वाढ करून घेतली पाहिजे. कोणतेही शास्त्र शिकण्याचे मार्ग जसे ठरीव असतात त्याचप्रमाणें धर्मज्ञानाचे मार्गही ठरीव आहेत. धर्मांचे अखेरचे साध्य सिद्ध करण्याच्या मार्गास आम्ही योग असे म्हणतों आणि स्वभावभेदास अनुसरून योग मार्ग वेगवेगळे आहेत.

**१ कर्मयोग**—मनुष्याने कर्तव्यरत राहून त्या मार्गानें आत्मानुभव घेणें हा कर्मयोग

**२ भक्तियोग**—साकार परमेश्वराचे भजन पूजन करून व त्याची एकातिक भक्ति करून आत्मानुभवास पोहोचणे हा भक्तियोग

**३ राजयोग**—मनाचे सयमन करून त्या मार्गानें समाधीपर्यंत पोहोचणे हा राजयोग

**४ ज्ञानयोग**—शुद्ध ज्ञानाने आत्मरूप ओळखून त्याशी एकरूप होणें हा ज्ञानयोग

एकाच केंद्राकडे म्हणजे परमेश्वराकडे जाण्याचे हे निरनिराळे मार्ग आहेत धर्मविचाराच्या बाबीत अनेक प्रकारची विविधता असणे हें खरोखर फार फायद्याचे आहे सर्व धर्म ज्या अर्थी मनुष्याच्या धार्मिक जीवनास उत्तेजन देतात त्या अर्थी ते सर्वच चांगले आहेत असे म्हणावयास काय हरकत आहे ? अनेक पथ आणि अनेक मते अस्तित्वात असली तर सर्व मनुष्यास धार्मिक स्फूर्ति उत्पन्न करण्यास अधिक सधि प्राप्त होईल

ओकबीच ख्रिश्चन युनिव्हर्सिटीपुढे सर्व जगाच्या ऐक्यासबधी बोलत असता स्वामी म्हणाले —

मूलत सर्व धर्म एकरूपच होते आपला धर्म तेवढाच खरा व बाकीचे सर्व धर्म खोटे असून जगाला ख्रिस्ताच्या प्रकाशाचीच आज जरूर आहे असें ख्रिस्ती लोकास मनापासून वाटत असले तरी सर्व धर्म वस्तुत एकरूपच आहेत हे खोटे नाही धर्माच्या बाबतीत सर्व जगानें आपल्याशी सगनमत करावें अशी ख्रिस्तानुयायाची इच्छा असेल तर परधर्मसहिष्णुता त्यानी प्रथम बाळगिली पाहिजे ज्यात परमेश्वराचा साक्षी नाही असे एकही अत -करण दुनियेत नाही ही गोष्ट आपणास येशू ख्रिस्ताचे अनुयायी म्हणविणारानी तरी कबूल केलीच पाहिजे प्रत्येक सत्पुरुषात परमेश्वराचा वास आहे ही गोष्ट खुद्द येशू ख्रिस्तानेंही कबूल केली आहे. एखाद्या वचनावर अथवा मतावर नुसता विश्वास ठेवला म्हणजे तो मनुष्य धार्मिक झाला असे होत नाही. परमेश्वराच्या इच्छेस अनुसरून जो प्रत्यक्ष वर्तणूक करितो तोच खरा धार्मिक होय स्वत· शुद्ध मार्गानें चालणें व लोकास त्याच्या शुद्ध मार्गात मदत करणे या एकाच मार्गानें जगाचे ऐक्य सिद्ध होईल.

# ज्ञानयोग-व्याख्यान-माला.

१

## धर्माची आवश्यकता.

मानवजातीची उन्नति साधण्याकरितां ज्या निरनिराळ्या प्रकारच्या शक्ति कार्य करीत होत्या व साप्रतही करीत आहेत त्यात अत्यत बलवती अशी एक शक्ति आहे. या शक्तीच्या दृश्य अथवा स्पष्ट स्वरूपास धर्म असे नांव आहे सर्व प्रकारच्या समाजरचनेच्या मुळाशी कुठेंतरी याच शक्तीचे कार्य चालू असतें. ज्या प्रेरणेमुळे मनुष्यें सघ अथवा समाज करून राहू लागली त्या प्रचड प्रेरणेचा उगमही याच शक्तीपासून झाला आहे कुलाच्या, हवामानाच्या अथवा वशाच्या बधनापेक्षा धर्मबधन अधिक शक्तिमान असल्याचा प्रत्यय आपणास पुष्कळ प्रसगी येतो, हे आपणास ठाऊक आहेच. एकाच वशातील अथवा एकाच कुलातील व्यक्तीपेक्षा एकाच परमेश्वराची पूजा करणारे भजक प्रसगी एकमेकाशी अधिक चिकटून राहतात ही गोष्ट मशहूर आहे. एकाच परमेश्वराचे भजक एकमेकास मदत करण्यास जितके तयार असतात तितकी मदत प्रत्यक्ष भाऊ आपल्या भावासही करीत नाही धर्माचा उगम केव्हा व कसा झाला याचा शोध लावण्याचा यत्न पुष्कळ प्रकारे झाला आहे जे धर्म पुरातन काळापासून आजपर्यत चालत आले आहेत ते आपलें एक विशिष्ट स्वरूप असल्याचे सागतात. असामान्यत्व हें त्याचे विशिष्ट स्वरूप होय. आपला जन्म खुद्द परमेश्वरापासून झाला आहे असे प्रत्येक धर्म म्हणतो. धर्माचा जन्म जणू काय मनुष्याच्या मेंदूत होऊच शकत नाही, असें त्याचें म्हणणे आहे मनुष्यप्राण्याच्या मेंदूहून उच्चतर अशा दुसऱ्या कोणत्यातरी ठिकाणातून आपला जन्म झाला आहे असे प्रत्येक धर्म म्हणतो.

यासबधी दोन उपपत्तींबद्दल अर्वाचीन पडिताचें बऱ्याच अशी बहुमत झालें आहे. पूर्वजपूजेपासून धर्माचा अवतार झाला अशी एक उपपत्ति असून

अनताच्या उत्क्रांतीतून धर्म अवतरला अशी दुसरी उपपत्ति आहे पूर्वजाची पूजा करण्याची जी चाल प्राचीन लोकांत होती तीतूनच धर्मकल्पनेचा उदय झाला असे एका पक्षाचें म्हणणें असून, प्रकृतीच्या शक्तीचे स्पष्टीकरण म्हणजेच धर्म असे दुसऱ्या पक्षाचे म्हणणें आहे आपल्या मृत झालेल्या बाधवाचें स्मरण कायम ठेवण्याची इच्छा मनुष्यमात्रात आहे आणि त्याच्या जडदेहाची विघटना होऊन ते मातीत मिळाले तरीही ते कोठेतरी जिवत असावेत अशी कल्पना मनुष्याच्या मनात येते यामुळेंच त्याजसाठी कोठे-तरी अन्न वगैरे ठेवावे व अशा रीतीने त्याचे पूजन करावें अशी इच्छा त्याला होते. अशा प्रकारच्या इच्छेचे जें स्वरूप अधिकाधिक परिणत होत गेलें त्याला आपण धर्म असे म्हणतों. इजिप्शियन्, बाबिलोनियन्, चिनी, व दुसऱ्या कित्येक अमेरिकेतील मानवशाखाचा इतिहास पाहिला तर पूर्वज-पूजा हीच धर्माच्या मुळाशी होती असें स्पष्ट दिसून येण्याजोगा पुरावा साप-डतो. मनुष्याला दोन आत्मे आहेत असा जुन्या इजिप्शियन् लोकांचा समज होता प्रत्येक मानवदेशात सम स्वरूपाचे दोन प्राणी राहतात व मनुष्य मृत झाला म्हणजे दुसरा प्राणी शरीराच्या बाहेर निघून जातो व एक तसाच जिवत राहतो असा त्याचा समज होता जोंपर्यंत शरिराला धक्का लागला नाही तोंपर्यंतच बाहेर गेलेल्या प्राण्याचे जीवित सुरक्षित राहते या समजानेंच इजिप्शियन लोक मृतदेहाच्या सरक्षणार्थ इतकी विलक्षण काळजी घेत असत. मृत देह सुरक्षित राखण्याकरिताच प्रचड पिऱ्यामिड् नावाच्या इमारती त्यानी बाधल्या मृत देह या इमारतीत ते ठेवीत असत. कारण या देहाचा एखादा भाग दुखावला तर बाहेर गेलेल्या प्राण्याचा तोच भाग दुखावतो असा त्याचा समज असे पूर्वजपूजेची कल्पना या ठिकाणी अगदी स्पष्टपणे नजरेस येते जुन्या बाबिलोनियन लोकातही थोड्याशा फरकानें हीच द्विजीविकल्पना प्रचलित होती शरिरातील दुसरा जीव मृत्यूनतर आपलें पूर्वीचे सर्व प्रेम विसरतो असें ते म्हणत हा बाहेर गेलेला जीव जिवत मनुष्यांस दहशत घालून आपणास अन्नपाणी देण्यास त्यास भाग पाडतो असें ते म्हणत मृतजीवाचें प्रत्यक्ष बायकामुलांवरील प्रेमही नष्ट होतें, असें ते म्हणत जुन्या हिंदुलोकांतही पूर्वजपूजेचे अवशेष सांपडतात चिनी लोकात पूर्वजपूजेपासूनच धर्म निघाला असल्याचें दिसून येते. ही पूर्वज-

पूजा चिनात आजमितीसही चालू आहे चिनात कोणत्याही एका धर्माचा विशेष प्रचार आज चालू असेल तर तो धर्म पूर्वजपूजा हाच होय या सर्व प्रकारांवरून धर्म पूर्वजपूजेंतूनच अवतरला या मतास एका अशी बरीच बळकटी येते.

उलटपक्षी धर्माचे मूळ प्रकृतिपूजेत आहे असे काही पडित प्राचीन आर्य ग्रथावरून सिद्ध करू पाहतात हिंदुस्थानात सर्वत्र पूर्वजपूजेचा प्रचार होता असें सिद्ध करण्याजोगा पुरावा सापडतो तरी अत्यत प्राचीन ग्रथात पूर्वज-पूजेचा मागमूसही कोठें आढळून येत नाही आर्यकुलाचा अत्यत प्राचीन ग्रथ म्हटला म्हणजे ऋग्वेद सहिता हा होय या ग्रथात पूर्वजपूजेचा मागमूसही नाही. या ग्रथांत प्रकृतिपूजा सर्वत्र आढळून येते असे अर्वाचीन पडिताचे मत आहे आपल्या दृष्टिसमोर नटलेल्या प्रकृतीच्या मागें काय आहे याचा शोध लावण्याकरिता मानवी मन धडपडत असल्याचे येथे आढळून येते. अरुणोदय, सायकाळ, प्रचड झझावात, प्रकृतीचे प्रचड सामर्थ्य स्पष्ट कर-णाऱ्या गोष्टी व प्रकृतीच्या ठिकाणी दृग्गोचर होणारी अपूर्व शोभा या सर्वा-कडे मानवी मन ओढले जाऊन या प्रकृतीपलीकडे उड्डाण करून या गोष्टीचे मूल रूप जाणण्याची इच्छा तें करीत असल्याचे आढळून येते. या धडपडी-तच त्या मनानें या देखाव्यावर सजीवत्वाचा आरोप केला. या देखाव्याना जीवात्मा आणि देह असून हे देहधारी देखावे कित्येक वेळां अत्यत सुदर असल्याचे व कित्येक वेळा वर्णनातीत असल्याचें त्या मनानें कल्पिले हाच प्रकार प्राचीन ग्रीक लोकातही आढळून येतो त्यांच्या सर्व दतकथा पाहि-ल्या तर त्यात प्रकृतिपूजा सर्वत्र आढळते त्याचप्रमाणे प्राचीन जर्मन, स्कॅन्डिनेव्हियन् वगैरे आर्यवशीय कुले प्रकृतीची उपासक होती असे आढ-ळून येते. अशा रीतीनें पडिताच्या या मतासही बरीच पुष्टि मिळते

याप्रमाणे या दोन्ही मतास आधार मिळत असून ही मते परस्परविरुद्धशी भासतात; तथापि यांचीही एकवाक्यता होण्यासारखी आहे. ज्या सामान्य पायावर या विरोधी मतांची एकवाक्यता होऊ शकते तोच माझ्या मतें धर्मप्रवृत्तीचा मूलारभ होय. हा मूल पाया म्हटला म्हणजे इद्रियातीत होण्याची इच्छा हा होय. आपल्या मृत पूर्वजाचे आत्मे कोठें आहेत हें शोधण्या-करितां ही धडपड असो अथवा शरिराचा विनाश झाल्यानतर जीवात्म्याचे

पाठीमागे काय होते हे जाणण्याची इच्छा असो अथवा प्रकृतीच्या ज्या प्रचड शक्ति विश्वात वावरत असल्याचे दिसते त्या शक्तीच्या मुळाशी काय आहे हें जाणण्याची इच्छा असो, मानवी मन इद्रियातीत होण्याची--इद्रियांपलीकडे काय आहे हे जाणण्याची—धडपड करीत असल्याचे आढळून येते. या स्पष्टीकरणाबद्दल विशेष नवल वाटण्याचें कारण नाही अशा प्रकारच्या स्वप्नसृष्टीतून धर्मांचा पहिला किरण उदय पावावा हे अगदीं स्वाभाविक आहे असे मला वाटते आत्मा अमर आहे या तत्त्वाची कल्पना स्वप्नसृष्टीतून उदय पावावी हे अगदी साहजिक आहे स्पप्नसृष्टी खरोखरच मोठी आश्चर्यजनक नाही काय ? मुले आणि अशिक्षित मनुष्यें याच्या दृष्टीला स्वप्नसृष्टि आणि जागेपणीची सृष्टि यात फारसा भेद वाटत नाही हें आपणास ठाऊक आहेच देह मृत झाल्याप्रमाणें पडला असताही मन नानाप्रकारच्या उद्योगात मग्न राहू शकते यावरून स्पप्नसृष्टीही खरीच आहे असा तर्क त्यानी बाधला तर ते रीतसरच आहे असे म्हटले पाहिजे अशा स्थितीत चालू देहाची विघटना झाल्यानतरही मन पूर्वीप्रमाणेच कार्यव्यापृत राहील असा सिद्धात कोणीं काढला तर त्यात नवल वाटण्यासारखे काय आहे ? सामान्य सृष्टीच्या पलीकडे काही तरी आहे असे जें मानवी मनास वाटतें त्याचें मूळ येथेच आहे या स्वप्नसृष्टीच्या कल्पनेतून चढत्या पायरीनें मानवी मन अधिकाधिक उच्च सिद्धाताकडे धांव घेते आता स्वप्नसृष्टीतील गोष्टी जागेपणीं खऱ्या ठरत नाहीत असा अनुभव लक्षावधि लोकास नित्य आल्यामुळें स्वप्नसृष्टि म्हणजे निराळे अस्तित्व नसून जागृत सृष्टीतील अनुभवाची पुनरावृत्ति होय असे त्याना आढळून आले.

या काळानतर अधिक शोधास सुरुवात झाली, व या शोधाची दिशा बाह्यसृष्टीकडून वळून अत सृष्टीकडे लागली मनाच्या निरनिराळ्या स्थितीचा अभ्यास करण्यास शास्त्रज्ञांनीं सुरवात केली जागृतींत अथवा स्वप्नसृष्टीत मनाची जी अवस्था असते तीहूनही उच्चतर अशा मनाच्या अवस्था असतात ही गोष्ट या अभ्यासात त्यास कळून आली जगातील ज्या धर्मांची रचना सुव्यवस्थित पद्धतीने झाली आहे त्या सर्वांत या मन.स्थितीचा उल्लेख आपणास आढळून येतो. काही धर्मांत हिला अत्यानदाची स्थिती व कांहीत ईश्वरी प्रेरणेची स्थिति असें नाव दिलें आहे सर्व धर्मस्थापक, भविष्यवादी

अथवा ईश्वराचे दूत अशा प्रकारच्या मन स्थितीस प्राप्त झाले होते असा उल्लेख सर्व धर्मांत आढळतो. धर्मांच्या राज्यातील सत्यप्रमेयाशी त्याची भेट झाली त्या वेळी जागृति, स्वप्न अथवा सुषुप्ति यापैकी कोणत्याही अवस्थेत तें नसूनही यापेक्षा निराळ्या स्थितीत त्यास प्रेरणा झाली असे वर्णन सर्व धर्मांत केले आहे आपल्या जाग्रदवस्थेत आपणा सभोंवतीच्या वस्तु आपणास जितक्या स्पष्टपणे दिसतात त्याहून अधिक स्पष्टपणे सत्य वस्तु त्यांस दिसल्या उदाहरणार्थ वेद हे ऋषिप्रणीत आहेत असे म्हणतात हे ऋषि मन्त्रद्रष्टे होते मन्त्रद्रष्टे म्हणजे मन्त्र ज्यांनी पाहिले ते वैदिक मन्त्रांत जे विचार ग्रथित झाले आहेत ते विचार त्यानी पाहिले. ज्या इद्रियातीत वस्तूशी त्याची प्रत्यक्ष भेट झाली तिचेच वर्णन आपण लिहिले असे ऋषीनी म्हटलें आहे यहुदी व ख्रिस्ती या धर्मातही असे उल्लेख आहेत

या बाबींत बौद्धधर्मासंबधी काही आक्षेप घेता येण्यासारखा आहे परमेश्वर अथवा आत्मा यांच्या अस्तित्वावर बौद्धांचा विश्वास नसता इद्रियातीत स्थितीतून बौद्धधर्माचा उद्भव झाला असें कसे म्हणता येईल ? या प्रश्नाचें उत्तर इतकेच की बौद्धानीही एका अनत नियामक शक्तीला मान्यता दिली आहे या शक्तीचें अस्तित्व केवळ बुद्धिगम्य मार्गानें बुद्धाला सापडले नसून इद्रियातीत स्थितीत या अनत नियामक शक्तीचा शोध त्याला लागला बुद्धाचे चरित्र ज्या कोणी वाचले असेल त्याला बुद्धाच्या इद्रियातीत स्थितीचें वर्णन आढळून आले असेल बुद्ध बोधिवृक्षाखाली बसला असता इद्रियातीत स्थितीस प्राप्त झाला असे वर्णन त्याच्या चरित्रात केले आहे त्यानें जें कांही ज्ञान लोकांस सांगितलें ते याच स्थितीत त्याला प्राप्त झालें आहे त्या ज्ञानाची प्राप्ति केवळ बुद्धिगम्य मार्गानेंच त्याला झालेली नव्हती.

कित्येक प्रसंगी इद्रियांची मर्यादा उल्लघून व विचारवती बुद्धीलाही मागे टाकून मन पलीकडच्या प्रदेशात उड्डाण करू शकतें असें विधान सर्व धर्मांनी केलें असल्याचें वरील हकिकतीवरून दिसून येईल. ज्या गोष्टी इद्रियाच्या आधारानें अथवा विवेचक बुद्धीच्या सूक्ष्म विचारानें त्याला कधीही कळल्या नसत्या, त्या गोष्टी अशा इद्रियातीत स्थितीत त्याला कळतात. जगातील सर्व धर्मांचा पाया याच इद्रियातीत स्थितीत सांपडलेल्या तत्त्वांवर रचिला आहे आतां हीं तत्त्वें खरी आहेत कीं नाहीत याचा निवाडा करण्याचा हक्क आप-

णांस अवश्य आहे. ही तत्त्वें विवेचक बुद्धीला मान्य होण्यासारखी आहेत की नाहीत हे ठरविण्यास आपणास हरकत नाही तथापि इद्रियाची मर्यादा मन उल्लघन करू शकतें व बुद्धीच्या मर्यादेपलीकडेही ते जाऊ शकतें असें विधान जगात सांप्रत अस्तित्वात असलेल्या सर्व धर्मांनीं केले आहे हें मात्र खरें या स्थितीचा प्रत्यक्ष अनुभव घेतां येतो असे सर्व धर्मांचें म्हणणे आहे

सर्व धर्मांनी सागितलेल्या या गोष्टीत सत्याश कितपत आहे हा विचार क्षणभर बाजूस ठेवला तर त्या सर्व धर्माना सामान्य असा एक विशेष आढळून येतो त्यानी सागितलेल्या सर्व गोष्टी परोक्ष सृष्टीतील आहेत पदार्थविज्ञान वगैरे शास्त्रांच्या शोधांप्रमाणे या गोष्टी प्रत्यक्ष नाहीत भौतिक शास्त्राच्या शोधाचा अनुभव आपणांस प्रत्यक्ष दृष्टीने घेता येतो धर्मांनी सागितलेल्या गोष्टीचा अनुभव प्रत्यक्ष घेतां येत नसून त्याचें स्वरूप परोक्ष असतें. अत्यत सुव्यवस्थितपणे ज्या धर्माची माडणी झाली आहे त्या धर्मात याच परोक्ष तत्त्वांस विशिष्ट रूप प्राप्त झाले आहे याच परोक्ष तत्त्वाला एखाद्या धर्मात सर्वव्यापी असे म्हटले आहे त्यालाच दुसऱ्या एखाद्या धर्मानें परमेश्वर असें नाव दिले आहे. तिसऱ्या एखाद्यानें त्यालाच शास्त्र अथवा कायदा म्हटले आहे. सर्व धर्मांनी सागितलेली इद्रियातीत स्थिति ज्या पडितास मान्य नाही, त्यानीही आपल्या उपदेशात प्राचीनाच्या परोक्ष तत्त्वाचा अगिकार केला आहे ( Moral Law, Ideal Unity ), वगैरे नावाखाली या प्राचीन परोक्ष तत्त्वाचा अगिकार त्यानी केला आहे यावरून हे परोक्ष तत्त्व इद्रियाच्या मर्यादे बाहेरचे आहे ही गोष्ट त्यानीही मान्य केली आहे असें म्हणावयास हरकत नाही. अत्यत पूर्णत्वास पावलेला असा एकही मनुष्यप्राणी आपल्यापैकी कोणीही पाहिलेला नाही आपल्या कल्पनेप्रमाणें सर्वोत्कृष्ट अथवा उत्तमोत्तम असाही मनुष्य आपण पाहिला नाही तथापि अशा मनुष्याच्या अस्तित्वावर भरंवसा ठेवा असे सर्व म्हणतात. तसेच सर्वोत्कृष्ट मनुष्य आपल्या अवलोकनांत केव्हाही येण्यासारखा नसला तरी उत्तमोत्तमपणाची कल्पना आपल्या चित्तात असल्यावाचून आपली उत्तरोत्तर सुधारणा होत जाणेही शक्य नाहीं यावरून या सर्व धर्मातून एकच सामान्य तत्त्व निघते ते हेंच की आपणा सर्वांचे साध्य असें काही तरी परोक्ष तत्त्व आहे व याच तत्त्वाला व्यक्त परमेश्वर, अव्यक्त आत्मा, नीतीचा

कायदा, सर्वव्यापी, सर्वसार वगैरे नावें दिली गेली आहेत आपण सर्व याच साध्याकडे पोहोचण्यासाठी धडपडत आहों कोणीही मनुष्य कोणत्याही स्थितीत असो अथवा कशाही प्रकारचा असो, त्याच्या चित्तात अनत सामर्थ्याचे साध्य असतेच अनत आनदाची कल्पना प्रत्येकाच्या चित्तात असते आपण आपल्या भोवती जी अनेक कार्ये पाहतो आणि जी कार्यव्यापृतता अथवा धडपड आपणास आपल्या सभोवती दिसते तिचा अतिम हेतू याच अनत सामर्थ्याकडे अथवा या अनत आनदाकडे पोहोचण्याचा आहे, तथापि या अनत सामर्थ्याच्या प्राप्तीसाठी आपण कितीही धडपड केली तरी ही प्राप्ति इद्रियद्वारा आपणास व्हावयाची नाही ही गोष्ट फारच थोडक्या लोकाच्या लक्षात लवकर येते **यततामपि सिद्धानां कश्चिन्माम् वेत्ति तत्त्वत.** । तो अनत आनद इद्रियद्वारा प्राप्त होण्यासारखा नाही ही गोष्ट अशा लोकाच्या लक्षात लवकर येते इद्रियांचा अथवा देहाचा विस्तार कितीही मोठा झाला तरी त्यात तो अनत आनद सामावू शकणार नाही हे त्याच्या लवकर ध्यानात येतें मर्यादित वस्तूच्या द्वारे अमर्याद वस्तु प्रत्यक्षत्वास आणणें अशक्य आहे, आणि अनत आनदाच्या मागे लागलेली मनुष्ये लवकर अथवा उशिरा हें तत्त्व जाणतात व मर्यादित इद्रियाच्या द्वारे अमर्याद आनद घेण्याचा फुकट यत्न सोडून देतात त्यागाचा मूळपाया हाच मर्यादिताच्या द्वारे अमर्याद प्रत्यक्षत्वास आणण्याचा यत्न सोडून देणे हाच त्याग देहाच्या द्वारें अनत आनद व्यक्त करण्याचा यत्न करता करता ही गोष्ट अशक्य आहे असा अनुभव आला म्हणजे देहाचा नाद सोडून देणे हाच त्याग सर्व नीतिशास्त्राचा पाया हा त्यागच होय त्यागाचा पाया मुळात असल्यावाचून नीतिशास्त्राची उभारणी करता येणेंच शक्य नाही. ज्यात त्याग सागितला नाही असा नीतिशास्त्राचा एकही निर्बंध अद्यापि अस्तित्वात आलेला नाही

"मी नव्हे तर तू" हा नीतिशास्त्राचा आरभ होय. "मी माझे व्यक्तित्व —माझा अहकार—कायम राखून त्या अनत सामर्थ्याचा अथवा त्या अनत आनदाचा उपभोग घेईन" असे म्हणणारास ही गोष्ट अशक्य आहे असें नीतिशास्त्र सागते कोणत्याही बाबीत स्वत बद्दल विचार करण्यापूर्वी इतराबद्दल आधी विचार करा असे नीतिशास्त्राचे सागणे आहे. 'सर्वा आधी मी' हे इंद्रियाचे मागणे आहे. या उलट नीतिशास्त्र म्हणते सर्वांच्या अखेरीस मी

अशा रीतीनें नीतिशास्त्राचे सर्व निर्बंध त्यागाच्या पायावर रचले गेले आहेत स्वत्व–अहकार वाढवावयाचा नसून त्याचा उच्छेद करावयाचा हा नीतिशास्त्राचा अतिम हेतु आहे इद्रियाच्या मर्यादेच्या हद्दीत अनत व्यक्त होऊ शकणार नाही. ही गोष्ट अशक्य आहे एवढेच नव्हे तर तिचा नुसता विचार करावा इतक्या योग्यतेचीही ती नाही

याकरितां तें अनत व्यक्त करण्याची इच्छा ज्याला असेल त्यानें ही जड सृष्टीची पायरी सोडून देऊन दुसऱ्या कोठे तरी उड्डाण केलें पाहिजे नीतिशास्त्राने आजपर्यंत अनेक प्रकारचे निर्बंध निर्माण केले आहेत, पण या सर्व निर्बंधाच्या मुळाशी एकच हेतु आहे अहकार नाश करणें हा सर्व नीतिनिर्बंधाचा आदिहेतू आहे अहकार समूळ नष्ट करणे हें नीतिशास्त्राचे अखेरचें साध्य आहे स्वत बद्दल विचार करू नका असे लोकास सागितलें की ताबडतोब ते घाबरून जातात आपले स्वत्व म्हणून जी काही कल्पना त्यांनी उराशी बाळगलेली असते तिचा त्याग करणें त्याच्या जिवावर येतें तथापि हीच माणसे नीतिशास्त्राच्या अत्युच्च साध्याला मान डोलवितात नीतिशास्त्राचे साध्य योग्य आहे असे ते म्हणतात. नीतिशास्त्राचे अखेरचें साध्य अहकाराची वाढ हें नसून अहकारनाश हे आहे ही गोष्ट त्याच्या लक्षात येत नाही

उपयुक्ततावादाच्या दृष्टीनें मनुष्यामनुष्यांतील नीतिबधनाचें स्पष्टीकरण करणे शक्य नाही, कारण केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीनें मनुष्यामनुष्यांतील नीतिबधनें कशी असावी हें आपणास ठरविता येत नाही इद्रियातीत स्थितीचा पाठिंबा असल्यावांचून नीतिशास्त्र अस्तित्वातच येऊ शकत नाही अनताकडे जाण्याची धडपड सुरू नसेल तर आपणा मनुष्यांस साध्य अथवा ध्येय असे कांहीच उरणार नाहीं ते साध्य आपल्या चित्तात आहे म्हणूनच ही सारी धडपड सुरू आहे त्या साध्याच्या कल्पनेच्या अभावीं धडपडही उरणार नाही. केवळ समाजाचे बध कायम राखावे या हेतूनें कोणीं कांही बधनें निर्माण केली तर तेवढ्यानें नीतिशास्त्राच्या सिद्धान्ताचें स्पष्टीकरण करणें शक्य नाहीं अनताच्या पाठीमागें धडपड करणें उपयुक्ततावाद्यांस संमत नाही. इद्रियांच्या पलीकडे जाणें ही गोष्ट त्यांस अशक्य आणि मूर्ख-पणाची वाटते अशा रीतीनें एकीकडे भोगाचा उपदेश करीत असतांही

नीतिशास्त्राचे निर्बंध पाळा असा उपदेश हेच लोक करीत असतात अहंकार वाढविण्यास उत्तेजन देत असताही समाजाचे कल्याण करा असा उपदेश हेच लोक आम्हास करतात हे आश्चर्य नव्हे काय ? समाजाचे कल्याण तरी आम्ही काय म्हणून करावें ? दुसऱ्याच्या उपयोगी पडणें ही दुय्यम दर्जाची गोष्ट आहे. आपणास कोणतें तरी साध्य हवें कोणते तरी साध्य चित्तांत असल्यावाचून धडपड सुरू राहणार नाही आणि धडपडीच्या अभावी उन्नतीही होणार नाही. नीतिशास्त्र हें अखेरचे साध्य होऊ शकणार नाही. आमच्या अखेरच्या साध्याचे ते एक साध्य मात्र आहे जर आमचे साध्यच नष्ट झाले तर तुमच्या नीतिशास्त्राच्या अनुरोधानें तरी आम्ही कां चालावें ? परक्याचे बरें करण्याऐवजी त्याना मी इजा का करू नये ? सुख मिळविणें हेंच जर मानवजातीचे अखेरचे साध्य असेल, तर परक्यास दु ख देऊनही मी स्वत स सुखी का करू नये ? असे करण्यास तुमची कोणती आडकाठी आहे ? दुसरें असे की उपयुक्ततावादाचा मूळ पायाच अत्यत आकुंचित आहे साप्रतचे समाजनिर्बंध आणि त्याच्या चालीरीती ही समाजाच्या चालू स्थितीला अनुरूप अशी बनलेली आहेत, पण समाज अनत काळ असाच चालेल असे मानण्यास उपयुक्ततावाद्यांजवळ काय पुरावा आहे ? कित्येक युगांपूर्वी समाजाला अस्तित्वच नव्हतें, आणि कांही युगानतर त्याचें अस्तित्व नष्ट होणे ही अशक्य गोष्ट आहे असे नाही उत्क्रान्तीच्या उच्चतर स्थितीकडे जाण्याच्या मार्गातील एखाद्या पायरीवर आज आमचा समाज असेल ही गोष्ट अगदी संभवनीय आहे केवळ चालू समाजस्थितीचा विचार करून त्या अन्वयें रचिलेले निर्बंध अनत स्वरूपाचे होऊ शकतील ही गोष्ट शक्य नाहीं मानवी मनाच्या सर्व भावनाचे आकलन असे निर्बंध कधीही करू शकणार नाहीत. उपयुक्ततावाद्याच्या उपपत्ति कितीही चागल्या झाल्या, तरी फार झालें तर, चालू समाजव्यवस्थेत मात्र त्याचा उपयोग होईल या पलीकडे त्या उपपत्तीना कवडीचीही किंमत नाहीं उलटपक्षी धर्म आणि इद्रियातीत स्थिति यांचा पाठिंबा घेऊन ज्या नीतिशास्त्राची उभारणी झाली आहे ते नीतिशास्त्र सर्व मानवी भावनाचे आकलन करू शकेल. नीतिशास्त्राने केवळ व्यक्तीच्या दृष्टीनें विचार केला असला–निर्बंध घातले असले तरी तें आपली परंपरा अनतापर्यंत नेऊन पोंचविते. समाजाचा विचार नीतिशास्त्र करतें

तेव्हाही समाज म्हणजे व्यक्तीचा समुदाय हीच व्याख्या त्याच्या ध्यानी असते व्यक्तीचा अनताशी असलेला संबध ज्याप्रमाणे नीतिशास्त्र लक्षांत ठेविते, त्याचप्रमाणे व्यक्तिसमुदायाचा म्हणजे समाजाचा अनताशी असलेला सबधही ते विसरत नाही, मग हा व्यक्तिसमुदाय—हा समाज कोणत्याही काळी आणि कोणत्याही स्थितीत असो यावरून इद्रियातीत धर्माची आवश्यकता मानवजातीस किती आहे हे आपल्या लक्षात येईल जड पदार्थांचा विचार क्षणभर कितीही सुखदायक वाटला तरी सदा सर्वदा त्यातच गुग होऊन राहणे मानवी मनास शक्यच नाही

धार्मिक म्हणजे इद्रियातीत विषयाबद्दल फार विचार करीत बसले असता लौकिक विषयाकडे आमचे लक्ष लागत नाही व त्यामुळे ससार बिघडतो असे कित्येक म्हणतात चिनी सत्पुरुष कन्फ्यूशिअस याच्या वेळीही लोक असेंच म्हणत आपण प्रथम ससार साभाळू परलोकाचा विचार मागून केव्हातरी करता येईल ही मानवी वृत्ति अत्यत प्राचीन काळीही दिसून येते आपण ससाराची काळजी घ्यावी हें अयोग्य नाही, तथापि धार्मिक बाबीच्या दृढ विचारामुळें जर आमचा ससार बिघडत असेल तर सासारिक बाबीच्या दृढ विचारामुळें आमचा इहलोक जातो आणि परलोकही जातो संसाराचा ध्यास घेऊन बसल्यामुळें आपण केवळ जडवादी होऊन बसतो केवळ सृष्टी-वर विजय मिळविणे हेच मनुष्याचे साध्य आहे असे मानणे योग्य नाही आमचे साध्य याहून अधिक उच्च प्रतीचे साध्य आहे

दृश्य सृष्टीपलीकडे जाण्यासाठी मानवी प्राणी जोंपर्यंत धडपड करीत आहे, तोपर्यंतच मनुष्य या नावाला तो योग्य आहे प्रकृतीच्या मर्यादेपली-कडे जाण्यासाठी धडपड करणें हेच मनुष्यत्वाचे मुख्य लक्षण आहे ही प्रकृ-तीची मर्यादा बाह्य जगात आहे, त्याचप्रमाणे अत सृष्टीतही ती आहे आमच्या देहातील व आमच्या बाहेर असलेल्या सृष्टीतील अणुरेणूचे शासन करणें एवढेंच प्रकृतीचें काम आहे असे नाही, तर अत.सृष्टीत जो अत्यत गूढ असा स्वभाव आहे व ज्यामुळें बाह्य सृष्टीचें अनुशासन होतें, त्या अत्यत गूढ स्वभावाचे नियमन करणें हेंही प्रकृतीचें काम आहे. बाह्य सृष्टीवर विजय मिळवून ती आपल्या ताब्यांत आणणे हा उद्योग मोठा चांगला आणि स्तुत्य आहे यात सशय नाही, तथापि अतर्गत सृष्टीवर विजय मिळविणें हें त्याहूनही

अधिक चागले व कौतुकास्पद आहे ग्रह आणि तारे याचे नियमन ज्या कायद्यानी होते ते कायदे समजून घेणे चागले आणि कौतुकास्पद आहे, तथापि अतर्गत भावना आणि मनोविकार व मानवी मनाची इच्छाशक्ति याचें नियमन ज्या कायद्यानें होते ते कायदे समजून घेणे कितीतरी पटीने अधिक चांगले आणि अधिक कौतुकास्पद आहे या अत सृष्टीवर विजय मिळविणें व मानवी मनात ज्या सूक्ष्म भावना उठतात त्याचे गूढ रहस्य जाणणे हे फक्त धर्मांचे कार्य आहे जड सृष्टीतील घडामोडी समजण्याची इच्छा होणे हे सामान्य मनुष्यास स्वाभाविक आहे सूक्ष्म सृष्टीचे अस्तित्व ग्रहण करण्याची शक्ति सामान्य मनुष्यास नसते यामुळे तिच्यातील रहस्ये तो आकलन करू शकत नाही हजारों कोकराचा सहार करणाऱ्या सिंव्हाकडे कौतुकानें पाहणारे हजारो प्रेक्षक असतात सिंहाचा क्षणैक विजय म्हणजे गरीब बिचाऱ्या हजारों कोकराचा मृत्यु ही कल्पना त्याच्या चित्तास शिवतही नाही सिंहाचे प्रचड बळ पाहून तेवढ्याचेच ते कौतुक करतात, कारण, जड सामर्थ्याच्या देखाव्याने आनदित होणे एवढेच सामर्थ्य त्याच्या मनात असते सामान्य मानवी मनाची स्थिति अशा प्रकारची आहे केवळ बाह्यसृष्टीतील पदार्थ मात्र त्यास समजतात व त्यांतूनच ते आनद घेत असतात तथापि प्रत्येक समाजात असे थोडेतरी प्राणी आढळतात की ज्याचे सुख इद्रियगत नसते त्याचे सुख इद्रियबाह्य असते. केव्हा केव्हा जड सृष्टीपलीकडील एखादा किरण त्याच्या चित्तात प्रवेश करतो. या प्रकाशमय किरणाच्या दिशेने जाण्यासाठी असे प्राणी धडपडत असतात. जगातील निरनिराळ्या राष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास आपण सूक्ष्म दृष्टीने केला तर अशा प्रकारच्या लोकाच्या वाढीबरोबरच राष्ट्राचीही वाढ होऊन ते उदयास येत असेल असे आपणास आढळून येईल. ज्या ज्या वेळी अनताचा अभ्यास करणारी माणसे राष्ट्रात कमी होत त्या त्या वेळी राष्ट्रही अधोगतीस जाऊ लागे. इद्रियातीत प्रदेशाचा अभ्यास करणे ही गोष्ट म्हणजे निरर्थक श्रम होत असे उपयुक्ततावाद्यानी कितीही ओरडून सागितले तरी इतिहास त्याच्या विरुद्ध साक्ष देत आहे यात संशय नाही. यावरून प्रत्येक मानववशाच्या सामर्थ्याच्या झऱ्याचे मूळ त्याच्या धर्मवीरात असते व हे धर्मवीर अस्तगत होऊ लागून त्या वशावर जडवादाचा पगडा बसू लागला म्हणजे तो वश मृत्युपथास लागतो असे दिसून येईल. धर्माच्या अभ्यासानें सूक्ष्म प्रमेयाचे ज्ञान

आपणास होते धर्माच्या अभ्यासाने आपल्या चित्तात समाधान उत्पन्न होते या महत्वाच्या गोष्टी क्षणभर बाजूस ठेवल्या तरी धर्माचा अभ्यास मानवी मनास अत्यत बलदायक आहे यात सशय नाही धर्माच्या अभ्यासाने कुविचार नष्ट होऊन प्रगल्भ विचाराचे बीजारोपण मनोभूमीत होते व त्यामुळे मनुष्याचे अत करण सुदृढ व वीर्यवान् होते अनताच्या मागे लागणे, अनताचे आक्रमण करू पाहणे, इद्रियानी निगडित असलेल्या सृष्टीच्या बाहेर उड्डाण करण्यासाठी धडपड करणे, नराचा नारायण होऊ पाहणें हाच मनुष्यत्वाचा मोठा विजय होय; हेच आपल्या माणुसकीस शोभणारे आहे कित्येकाना खाद्यपेय पदार्थांतच मोठा आनद वाटत असतो अशा रीतीने आनदाचा उपभोग त्यानी घेऊ नये असे म्हणण्याचा अधिकार आम्हास नाही इकडच्या तिकडच्या नानाविध वस्तू जमा करून ठेवण्यातच कित्येकास आनद होत असतो यानीही आपल्या रीतीने आनदाचा उपभोग खुशाल घ्यावा, पण सृष्टिबाह्य विचारात ज्याना आनद होतो त्याना आपल्या मार्गाने जाऊ द्यावे त्याच्या मार्गात अडथळा घालण्याचा अधिकार त्यास नाही मनोभावनेची पायरी जों जो अधिक खालच्या दर्ज्याची तों तो इद्रियगत आनदाकडे तिचा ओढा अधिक असतो. चतुष्पाद प्राण्याचा आनद फक्त इद्रियगत असतो इद्रियाचा सतोष हीच त्याच्या आनदाची अत्युच्च परिसीमा आपले भक्ष्य एखादा कुत्रा अथवा लाडगा केवढ्या आनदाने खात असतो ते पहा. अशा प्रकारचा जिव्हानद फारच थोड्या मनुष्यात दिसून येत असेल सर्व राष्ट्रातील हलक्या प्रतीच्या समाजाकडे पाहिले तर त्याचा आनद इद्रियगत असतो असे दिसून येईल त्याच राष्ट्रातील सस्कृत व सुशिक्षित लोक विचाराच्या आनदात निमग्न झालेले आढळून येतील. तत्त्वज्ञान, कला व शास्त्रे याच्या आनदात तेथील बुद्धिमान् लोक गर्क असल्याचे दिसून येईल धर्मविचार हा या दोन्ही कक्षापलीकडील प्रदेश आहे धर्म हा मुळातच अनत स्वरूपाचा विषय आहे त्याचा प्रदेश हा अत्युच्च प्रदेश होय; आणि त्यात मिळणाऱ्या आनदाची लज्जत चाखण्याची पात्रता ज्यास असेल त्यास तेथील आनद हा अत्युच्च आनद होय. याकरिता केवळ उपयुक्ततेच्या दृष्टीने पाहताही धर्माचा अभ्यास प्रत्येक मनुष्याने करावा हें योग्य आहे प्रत्येकानें सुख मिळविणे हेच मनुष्यजातीचे इतिकर्तव्य आहे असे उपयुक्ततावादी

म्हणतात, धर्मविचारापासून मिळणारे सुख हे अत्युच्च कोटीचे होय मग तें अत्युच्च सुख ज्या योगे मिळेल ती गोष्ट करणें उपयुक्ततावाद्याच्या दृष्टीनेही श्रेयस्कर नाही काय? धर्माचा अभ्यास करणें ही गोष्ट प्रत्येकाला आवश्यक आहे असे मला वाटते त्याची आवश्यकता त्यापासून घडणाऱ्या परिणामावरूनच दिसून येण्यासारखी आहे मनुष्याच्या मनाला चालन देणारी ती एक अत्यत मोठी शक्ति आहे इद्रियातीत व्हावे ही आशा मनुष्याच्या ठिकाणी जेवढ्या मोठ्या उत्साहाची प्रेरणा करते तेवढी दुसऱ्या कोणत्याही विचारानें त्याच्या ठिकाणी उत्पन्न होत नाही मानवजातीचा आजपर्यंतचा इतिहास पाहिला तर ही गोष्ट कोणासही कळून येईल. धर्मविचाराच्या आगी जें हें सामर्थ्य प्राचीन काळी होते तेच आजही आहे केवळ उपयुक्ततावादाच्या दृष्टीनें वागूनही काही माणसे सच्छील आणि नीतिमान् असू शकतील हे मी नाकबूल करीत नाही याच वादाचा अगीकार करून अत्यत सच्छील आणि नीतिमान असे पुरुष या जगात होऊन गेले हेंही मला कबूल आहे तथापि सर्व जग ज्यानी हालवून सोडले, लोहचुबकाकडे लोखड धाव घेते त्याप्रमाणें सर्व जगाला आपणाकडे धाव घ्यावयास ज्यानी लाविले व ज्याची प्रतिमा आज हजारों नव्हे तर लक्षावधि लोकाच्या चित्तात खेळत आहे असे पुरुष धर्मवीर होते. सर्व जगाला हालविण्याचे हे सामर्थ्य त्यांस धर्मामुळे प्राप्त झाले अनत शक्तीचा प्रत्यक्ष अनुभव घेणे असेल तर धर्माच्या बळावाचून दुसऱ्या कोणत्याही उपायाने ही गोष्ट साध्य होणार नाही. धर्माचा अभ्यास करणें हा प्रत्येक मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क असून त्याची प्रकृतिही त्याला त्याच मार्गानें नेत आहे आपली दानत तुम्हास उत्तम बनवावयाची असेल, जगात काही महत्कार्य करावे अशी तुमची इच्छा असेल, इतरांस तुम्ही शाति मिळून देणार असाल व स्वत सही शाति मिळवू पाहात असाल तर या गोष्टी साधण्यास धर्मबळावाचून दुसरें बळ उपयोगी पडणार नाहीं या मार्गाच्या दिशेनें तुम्हास चालन देण्यास धर्म मात्र समर्थ आहे याकरिता या दृष्टीनेही त्याचा अभ्यास इष्ट आहे साप्रत धर्माचा अभ्यास करावयाचा तो पूर्वीहून अधिक विस्तृत दिशेनें केला पाहिजे धर्म म्हणजे मतामताचे भांडण हा पूर्वीचा धर्माभ्यासाचा अर्थ आता टाकून दिला पाहिजे. अशा प्रकारच्या आकुचित आणि मर्यादित विचारांस आता रजा

दिली पाहिजे प्रत्येक मानवकुलाला अथवा प्रत्येक राष्ट्राला निराळा धर्म आहे असे मानून इतरास तुच्छ लेखण्याचे दिवस आता निघून गेले आहेत अशा प्रकारच्या सर्व कल्पनाचा त्याग आता केला पाहिजे

मनुष्याचे मन जो जो विस्तार पावत जाते तो तो धर्माच्या पायऱ्याही अधिक विस्तृत होत जातात. एकाद्याच्या चित्तात एखादा विचार उद्भवतो न उद्भवतो तोंच पृथ्वीच्या चारी दिशास तो जाऊन पोहोचतो साप्रतही अशी वेळ आली आहे केवळ जड मार्गानेही साऱ्या जगाशी आपला सबध आज घडू लागला आहे याकरिता जगाचा भावी धर्म म्हणजे सर्व जगाचा—सर्व विश्वाचा—तोच धर्म झाला पाहिजे

जगात जें जें काही चागले आणि महत्त्वाचे कार्य घडत असेल त्याचा अंतर्भाव या भावी धर्मात झाला पाहिजे तसेंच सर्वाची वाढ होईल अशा प्रकारची सवड त्या धर्मात असली पाहिजे पूर्वी जें काही चागले कार्य होऊन गेले आहे त्याचे नीट रक्षण करून भावी कार्यासाठी आपले बाहू पसरून आपण तयार असले पाहिजे. आपल्या पूर्वीच्या साठ्यात काही नवीन भर पडू पाहात असेल तर तिचा अतर्भाव आपण केला पाहिजे. एखाद्याच्या परमेश्वरविषयक कल्पना वेगळ्या असल्या तरी तेवढ्यासाठी या धर्मानें त्याला तुच्छ लेखता कामा नये त्याने सर्व प्रकारच्या लोकास पोटाशी घेतले पाहिजे. ज्याचा परमेश्वरावर भरवसा नव्हता असे पुष्कळ धर्मवीर आणि पुष्कळ शहाणे लोक माझ्या आयुष्यात माझ्या पाहण्यांत आले पण परमेश्वर या अक्षरानी आपणास जो काही बोध होतो त्याहून त्यास होणारा बोध कदाचित् अधिक चागला असू शकेल व्यक्त परमेश्वर, अव्यक्त अनत, नीतिबधन, अत्युच्च युक्त पुरुष या सर्वांचा अतर्भाव धर्मात होतो हे सारे धर्माच्या व्याख्येत येतात. अशा रीतीने सर्व धर्मांत उदार झाले म्हणजे कल्याण करण्याचे त्याचे सामर्थ्य शतपट अधिक वाढेल धर्माच्या आगी विलक्षण सामर्थ्य असल्यामुळें पुष्कळ वेळां त्यानी जगाचे बऱ्यापेक्षा वाईटच अधिक केलें आहे. धर्मात आकुंचितपणाचा व मर्यादेचा प्रवेश झाला की त्याच्या सामर्थ्याचा दुरुपयोग होऊ लागून त्यापासून चागल्यापेक्षां वाईट फलच अधिक निघते.

केवळ एकमेकाशी तटे करावे याच हेतूने आजही अनेक पथ आणि मडळ्या निर्माण झाल्या आहेत मते तीच असली तरी त्यांच्या प्रसाराचे मार्ग भिन्न झाले की एकाच मतात फूट पडून दोन पथ उद्भवतात याकरिता धर्मानी हा आकुचितपणा टाकून देऊन आता अधिक उदार झाले पाहिजे. धर्मकल्पना विश्वाइतक्या विस्तृत आणि अनत झाल्या पाहिजेत असे झाले तरच धर्माचे खरे सामर्थ्य आपल्या उपयोगी पडेल हे सामर्थ्य साप्रत नुकतेंच व्यक्त होऊ लागले आहे सर्व धर्म मरणाच्या पथास लागले आहेत असेही कोणी कोणी म्हणतात, पण आताच ते उदयास येत आहेत असा माझा समज आहे शुद्ध आणि विस्तृत असे धर्माचे सामर्थ्य प्रत्येक मनुष्याच्या अत करणात प्रवेश करणार आहे भटाभिक्षुकाच्या अथवा मूठभर लोकाच्या हाती धर्म जोवर नादत होता तोंवर देवळात, ग्रन्थात, हटवादी मतात, आचारात आणि बाह्य देखाव्यात तो दडी मारून बसला होता येथून बाहेर पडून ज्या वेळी तो विश्वव्यापी होईल त्याच वेळी त्याला सत्यता आणि जिवतपणा ही प्राप्त होतील आपल्या प्रत्येक चळवळीत तो दिसू लागेल; तो आपला स्वभावच होऊन बसेल. समाजदेहाच्या रोमरोमात तो भिनून जाईल, आणि अशा स्थितीत सत्कार्य करण्याचे त्याचे सामर्थ्य पूर्वापेक्षां कितीतरी अधिक वाढेल.

सर्व धर्मात परस्पर सहानुकपा आता उत्पन्न झाली पाहिजे एका धर्माची पतनाची वेळ आता आली तर त्याबरोबर बाकीचेही पतन पावतील तसेंच एकाच्या उदयाबरोबर बाकीच्याचाही उदय होईल याकरिता सर्व धर्मानी आता एकजुटीने राहिले पाहिजे परस्पराबद्दल आदर आणि पूज्यभाव मनात असला म्हणजे परस्पराबद्दल सहानुकपा वाटते दुसऱ्याबद्दल सहानुकपा दाखविण्यानें आपण त्यावर उपकार करतो अथवा त्यामुळे आपला मोठेपणा वाढतो असा भाव चित्तात असला म्हणजे दुसऱ्याबद्दल सहानुकपा उत्पन्न होत नाही मानसिक शक्तीचे अवलोकन करून त्याद्वारे अथवा भौतिक शास्त्राच्या द्वारे जे नवे पथ आज निघू पाहत आहेत त्याना तर या परस्पर सहानुकपेची आवश्यकता अधिकच आहे.

ही एकतानता घडवून आणण्यासाठी उभयपक्षी देवाण घेवाण झाली पाहिजे अशा रीतीने हटवादीपणाच्या मताचा त्याग उभयपक्षी झाला

पाहिजे त्यानी असा त्याग केला तर त्याची स्वत ची स्थिति पूर्वीहून अधिक चागली होऊन ते सत्याच्या अधिक सन्निध जातील. दिक्कालाच्या विस्तारात जें ज्ञान साठविलेले आहे तें त्यास प्राप्त होईल ते ज्ञान व दिक्कालातीत ज्ञान ही दोन्ही एकरूप होतील त्याच्या एकीकरणाच्या ठिकाणी मन आणि इद्रिय ही पोचू शकत नाहीत. ते ज्ञान केवलरूप, अनत, आणि एकमेवाद्वितीय आहे

---

## २

## मनुष्याची खरी प्रकृति.

इद्रियजन्य सुखासंबधी मनुष्याच्या मनाची आसक्ति विलक्षण दृढ आहे, तथापि तो ज्यांत राहतो आणि वावरतो ते जग त्याला कितीही सत्य आहे असें वाटत असलें तरी "हें खरोखरच सत्य आहे," असा प्रश्न त्याच्या चित्तात केव्हा ना केव्हातरी आल्यावाचून राहत नाही एका व्यक्तीची ही गोष्ट राष्ट्रासही लागू आहे ज्या मनुष्याचा प्रत्येक क्षण कोणत्या ना कोणत्या इद्रियजन्य सुखाचा उपभोग घेण्यात जात असल्यामुळें ज्याला असा प्रश्न चित्तांत उपस्थित होण्यास क्षणाचीसुद्धा फुरसत नाही अशा मनुष्यालाही मृत्यु गाठतो. त्या वेळी 'हें सारें सत्य आहे काय' असा प्रश्न त्याच्या मनात आल्यावाचून राहत नाही या प्रश्नापासूनच धर्माच्या प्रदेशास आरंभ होतो आणि या प्रश्नाच्या उत्तरात त्या प्रवेशाची परिसीमा होते ज्या अत्यत प्राचीन काळाच्या उदरात इतिहासही डोकावू शकत नाही आणि ज्या काळाचा पुसट व अधुक प्रकाश दतकथाच्या रूपानें मात्र आज आपणांस दिसतो त्या काळातही 'या जगाचें पुढे काय होणार?' 'सत्य तरी काय आहे?' असे पश्न उद्भवत होते

'मनुष्य मृत झाला म्हणजे एक वाद उपस्थित होतो तो कायमचा नष्ट झाला आहे असें एक पक्ष म्हणतो. आणि तो अद्यापि जिवत आहे असें दुसरा पक्ष म्हणतो. यात खरा पक्ष कोणता?'

**कठोपनिषत्.**

या प्रश्नाला अनेकानी अनेक प्रकारची उत्तरें दिली आहेत सूक्ष्मेंद्रिय-शास्त्र, तत्त्वज्ञान आणि धर्म या सर्वानी या एकाच प्रश्नाचे उत्तर देण्याचा यत्न केला आहे. किंबहुना या एकाच प्रश्नाच्या उत्तरासाठी हीं सारीं शास्त्रें निर्माण झाली आहेत. याच वेळी 'इंद्रियाच्या पलीकडे काय आहे, सत्य काय आहे?' हे प्रश्न मनुष्याच्या मनात उद्भवून त्याची शांति भग पावू नये अशीही खटपट सुरू होती हे प्रश्न जागच्या जागीच जिरवून टाकण्याचा यत्नही कित्येकांनी केला, पण, मृत्यूचें साम्राज्य जोंपर्यंत जगावर चालू आहे तोपर्यंत हे प्रश्न दडपून टाकण्याचा यत्न कधीही सफल होणार नाहीं. चालू क्षणापलीकडे पहावयाचे नाही व आपल्या सर्व आशा आणि इच्छा या दृश्यापलीकडे जाऊ द्यावयाच्या नाहीत असा यत्न करण्याची बडबड आपण करितो इंद्रियातीत वस्तूचा विचारच करावयाचा नाही अशासाठीं आपण धडपडत असतों. बाह्य जग आपल्या ह्या यत्नाला बहुधा मदतच करीत असते चालू लक्षणापलीकडे आपणास जाऊ न देण्यासाठी साऱ्या जगाने एकदिलानें यत्न केला तरी मृत्यूचें साम्राज्य आपल्या नजरेसमोर दिसत आहे तोपर्यंत हा प्रश्न आपणासमोर आल्यावाचून राहणार नाही 'ज्या सर्व वस्तूस आम्ही इतक्या चिकाटीने मिठी मारून बसलों आहो त्या सर्वांचे पर्यवसान अखेरीस मृत्यूतच होणार काय? ह्या सर्व वस्तू केवळ सत्यमय आहेत व त्या सर्वात अत्यंत चिरस्थायी आहेत असे समजून आम्ही त्यास जवळ करितो, पण, मृत्यु त्या सर्वांचे हरण करतोसे दिसते मग याची अखेर मृत्युवश होणे हाच काय? असे प्रश्न आपल्या चित्तात आल्यावाचून राहणार नाहीत क्षणार्धात हें जग अदृश्य होते. ज्या कड्यापलीकडे अथाग विस्तार पसरला आहे अशा कड्यावर उभे राहिले असता एखाद्याचे मन कितीही वज्रप्राय असले तरी त्यास धक्का बसल्यावाचून राहत नाही. अशा स्थितीत 'हें सारें सत्य आहे काय?' असा प्रश्न त्याच्या चित्तांत उद्भवल्या-वाचून राहणार नाही साऱ्या जन्मभर निरनिराळ्या आशा मनुष्य बांधीत असतो त्या आशाच्या पूर्तीकरितां आपले सारें बळ एकवटून तो त्या आशेच्या इमारतीस एकएक धोंडा जोडीत असतो, आणि एखाद्या क्षणार्धातच हा सारा डोलारा एकदम अदृश्य होतो 'या साऱ्या आशा खऱ्या आहेत काय?' या प्रश्नाचे उत्तर देण्यावाचून आपणास गत्यंतरच नाही. हा प्रश्न मानवी मनाच्या

ठिकाणी इतका दृढमूल झालेला आहे की दीर्घकाळानेही त्याचे निर्मूलन होत नाही किंबहुना आपल्या आयुष्याचा काळ जो जो अधिक जातो तो तो हा प्रश्न अधिकच जोरानें उद्भवतो याशिवाय मनुष्याच्या मनात सुखाचीही इच्छा असते स्वत स सुखी करण्यासाठी प्रत्येक वस्तूच्या मागे आपण धावपळ करीत असतों इद्रियजन्य बाह्य जगात आपण वेड्यासारखे एकसारखे पळत सुटतो ज्याची इद्रियजन्य सुखाची इच्छा पूर्ण झाली आहे अशा एखाद्या तरुणास 'हे सर्व खरे आहे काय?' असा प्रश्न आपण केला तर 'ते खरे आहे' असेच उत्तर तो देईल, कारण, त्याच्या दृष्टीने ते सारे खरेच दिसत असते कालेकरून हाच तरुण वृद्ध झाला व प्रत्येक वस्तु आपणास चुकवून जाऊ पहात आहे असा अनुभव त्याला आला म्हणजे आपल्या नशिबास तो दोष लावील अखेरीस आपल्या साऱ्या इच्छा तृप्त होणे शक्य नाही असा अनुभव त्याला येतो जेथे जावे तेथे वज्राची भित समोर असून ती आपणास पलीकडे जाऊ देत नाही असे त्याला कळून येते. इद्रियद्वारा केलेल्या प्रत्येक क्रियेला इद्रियच प्रतिक्रिया करू लागते. प्रत्येक वस्तू क्षणभगुर दिसू लागते. सुखोपभोग, दु खें, चैन, सपत्ति, सत्ता, दारिद्र्य आणि फार काय पण प्रत्यक्ष जीवितही क्षणभगूर वाटू लागते.

अशा स्थितीत मनुष्याच्या पुढे दोन मार्ग राहतात हें सर्व दृश्य केवळ शून्यवत् आहे, आपणास याचे काही ज्ञान नाही, आणि गतकालाबद्दल ज्याप्रमाणे आपणास कांही समजत नाही त्याचप्रमाणे भविष्य काळाबद्दलही काही समजावयाचे नाही. हा शून्यवाद्याचा ( Nihilist ) मार्ग होय भूतकाल आणि भविष्यकाल हे दोन्हीही लक्षात न घेता जो कोणी केवळ वर्तमानकालास चिकटू पाहतो तो खरोखर अगदीच मूर्ख म्हटला पाहिजे भूत आणि भविष्य या दोन्ही कालांचा त्याग ज्याला करावयाचा असेल त्यानें वर्तमानकालही लक्षात घेता उपयोगी नाही. भूत आणि भविष्य हे दोन्ही काल सोडून युक्त वर्तमान काल कबूल करणे म्हणजे आईबापाचे अस्तित्व नाकबूल करून मुलाचे अस्तित्व आहे असे ठामपणे सागण्यासारखें आहे. भूत आणि भविष्य या दोहोंची गणना करावयाची नसेल तर वर्तमानालाही आपल्या चित्तांतून रजा दिली पाहिजे असें केले तरच ते युक्तीस जुळून होईल. शून्यवाद्याचा हा मार्ग झाला. वास्तविक पाहता या मार्गाला प्रत्यक्ष

अस्तित्व नाही खरा शून्यवादी माझ्या पाहण्यात एकही आला नाही शून्य-वादाच्या गप्पा सागणें सोपे आहे, पण त्याप्रमाणे वागणे क्षणभरही शक्य नाही.

आता दुसरा मार्ग असा —हें विश्वाचे कोडे उलगडण्याचा यत्न करणे, सत्याच्या शोधात राहणे आणि क्षणोक्षणी बदलणाऱ्या व क्षणभगुर अशा विश्वात चिरकालीन न बदलणारे आणि सत्य असे तत्त्व काय आहे हें शोधण्याचा यत्न करणे हा दुसरा मार्ग आपलें हें शरीर जडवस्तूच्या अणूचे बनले आहे या आपल्या देहात सत्य असे काही आहे काय? मानवी मनाचा आजपर्यंतचा इतिहास अवलोकन केला तर हा शोध फार प्राचीन काळापासून एकसारखा सुरू आहे असे आपणास आढळून येईल अत्यत प्राचीन काळींही प्रकाशाचा पुसट पुसट किरण मानवी मनात प्रवेश करीत होता असे आपणास आढळून येईल. त्या काळीही या देहाबाहेर पाऊल टाकण्याचा यत्न करणारी माणसे होती या देहाच्या बाहेर त्याना जी वस्तु आढळून आली ती अंशत देहासारखीच होती तथापि ती वस्तु देह नव्हती हा बाह्य देह पचत्वास गेला तरीही ती वस्तु शिल्लक राहते व या देहापेक्षा ती अधिक चिरस्थाई आहे, अधिक पूर्ण आहे असे त्या काळीही मानवी मनास आढळून आले होते मृत शरीरास दहन करणाऱ्या अग्नीला उद्देशून म्हटलेली पुढील अर्थाची ऋचा ऋग्वेदात आढळते “ हे अग्नि, तुझ्या हस्तात त्याला न दुखवता घेऊन जा. त्याला पूर्ण शरीर दे त्याला तेजोमय देह दे पितर जेथे राहतात, ज्या ठिकाणी दु खाचे अस्तित्व नाही व जेथे मृत्यूही नाही अशा ठिकाणी त्याला घेऊन जा ” अशा प्रकारच्या कल्पना प्रत्येक धर्मात तुम्हास आढळून येतील याबरोबरच दुसऱ्याही एका कल्पनेचा प्रवेश आपल्या चित्तात होतो मनुष्यप्राणी हा आपल्या पूर्वीच्या उच्चस्थितीतून पतन पावलेला प्राणी आहे ही कल्पना सर्व धर्मात एकसारखीच आढळून येते ही विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट होय ज्यात अशा प्रकारची कल्पना नाही असा एकही धर्म नाही. कित्येक धर्मानी ही कल्पना दतकथेच्या रूपानें व्यक्त केली असून दुसऱ्या कित्येकानी तत्त्वज्ञानाच्या रोख ठोक आणि स्पष्ट शब्दानी ती सागितली आहे. त्याचप्रमाणे आणखी कित्येकानी काव्याच्या मनोहर भाषेत ती गुफिली आहे. साप्रतचा मनुष्यप्राणी म्हणजे आपल्या पूर्वीच्या स्थितीतून

पतन पावलेला प्राणी आहे ही कल्पना प्रत्येक दतकथेतून आणि प्रत्येक धर्म-पुस्तकांतून व्यक्त झाली आहे यहुद्यांच्या धर्मपुस्तकात आदामच्या पत-नाची दतकथा सागितली आहे तीतील रहस्य हेच होय. हिंदूच्या धर्म-ग्रंथांतूनही ही कल्पना पुन पुन्हा व्यक्त केलेली आढळून येते. मनुष्यप्राणी पवित्र आणि शक्तिमान होता त्या वेळी त्याचा चालू देह वाटेल तितका काळ त्याला राखता येत होता व त्याला स्वत लाच रमण्याची इच्छा होईपर्यंत तो मरत नव्हता, अशा कालाची वर्णनें हिदु धर्मग्रथात आढळतात या कालाला सत्ययुग असें नाव त्यानी दिले आहे त्या काली दु खाचे अस्तित्व नव्हते. त्या काली दुष्टत्वही नव्हते साप्रतचा काल हा अवनत काल आहे अशी वर्णनें हिंदु धर्मग्रथात सर्वत्र आढळतात. याबरोबरच प्रलयकालाची कल्पनाही सर्वत्र आढळून येते यावरून चालू युग हे पूर्वीच्या युगाचे अवनतरूप आहे असा सर्व धर्मांचा समज आहे हे कळून येईल पूर्वीचा सत्ययुगाचा काल दिवसेदिवस भ्रष्ट होत जाऊन अखेरीस प्रलय होऊन बहुतेक मानव-जाति नष्ट झाली व उन्नतीच्या कालाम पुन्हा सुरवात झाली अशी प्रलयाची कल्पना आहे. आता ही मानवजाति हळूहळू उन्नतावस्थेकडे जात असून आपल्या पूर्वीच्या शुद्ध स्थितीस ती पुन्हा परत जाईल अशी कल्पना सर्व धर्मांत आहे. जुन्या करारात जलप्रलयाची सागितलेली कथा तुम्हास ठाऊक असेलच हीच कथा प्राचीन बाबिलोनियन, इजिप्शियन्, चिनी व हिंदू लोकातही होती. मनु नावाचा एक प्राचीन महर्षी गगेच्या काठी तपश्चर्या करीत असता एक लहानसा मासा त्याच्यापाशीं आला त्यानें आपल्या जव-ळील भाड्यात त्याला टाकून मनूने त्याला विचारले, ‘ तुला काय पाहिजे ? ’ माशानें उत्तर दिलें ‘ एक मोठा मासा माझा पाठलाग करीत आहे त्यापासून माझें रक्षण करा ’ त्या लहान माशाला मनूनें आपल्या घरी नेले व तो सकाळीं उठून पाहतो तों तो मासा त्या भाड्याएवढाच मोठा झाला अस-ल्याचें त्याला आढळून आले तो मासा मनूला म्हणाला, ‘ या भाड्यात माझा समावेश आतां होत नाही ’ मनूनें त्याला एका तळयात सोडले दुसऱ्या दिवशी तो मासा तळ्याएवढा मोठा झाला आहे असे मनूस दिसले तेव्हा मनूनें त्याला नदीत सोडले. दुसऱ्या दिवशी तो नदीएवढा झाला आहे असें पाहून त्यानें त्याला समुद्रांत सोडले, तेव्हां तो मासा म्हणाला ‘ हे मनु,

मी विश्वकर्मा आहे जगाचा प्रलय मी आता करणार आहे याची आगाऊ सूचना तुला देण्याकरिता या रूपाने मी तुजपाशी आलों तू एक तारू बांध; व त्यात प्रत्येक जातीच्या प्राण्याचे एकएक जोडपे ठेव, व त्यात तूं आपल्या कुटुंबासह रहा जलप्रलय झाल्यानंतर माझे एक शिंग पाण्याबाहेर तुला दिसेल तें तारू त्या शिंगाला बांधून टाक पाणी उसरून गेल्यानंतर तेथून बाहेर पडून नवीन सृष्टी निर्माण कर ' अशा रीतीने जलप्रलय झाला व वर सांगितल्याप्रमाणे मनु व त्याचे कुटुंब त्या प्रलयातून वाचले त्याच्या बरोबर प्रत्येक जातीच्या प्राण्याचे जोडपे होते व प्रत्येक झाडाचे बीही होते पाणी उसरून गेल्यानंतर मनूने नवी सृष्टी केली आपण सर्व मनूचे वंशज असल्यामुळें आपणास 'मानव' अशी संज्ञा प्राप्त झाली

भाषा म्हणजे मनुष्याच्या अंतर्गत भागात जें सत्य आहे त्याच्या स्पष्टीकरणाचा यत्न एखादें लहान मूल न समजण्यासारखे बोबडे बोल बोलते. त्यातही अत्युच्च दर्ज्याचे तत्त्वज्ञान सांगण्याची त्याची धडपड चाललेली असते, असे मला खास वाटते योग्य प्रकारचे स्पष्टीकरणाचे साधन नसल्यामुळें त्यास तसे करता येत नाही ही गोष्ट वेगळी महापंडिताच्या आणि बोबड्या मुलाच्या भाषेत फरक इतकाच की, पंडिताची भाषा अधिक स्पष्ट असते आणि त्या बोबड्या मुलाची अधिक अस्पष्ट असते त्या दोन्ही भाषांची जात पाहिली तर ती एकच. त्यांच्या जातकुळीत फरक नाही. त्यांत फरक आहे तो फक्त परिमाणाचा, म्हणजे एक स्पष्ट व एक अस्पष्ट आजच्या स्थितीस आपली भाषापद्धति अत्यंत ठाकठिकीची, शुद्ध व नियमबद्ध अशी झाली आहे पूर्वकाळी हीच भाषापद्धति अर्धवट स्पष्ट, भ्रमोत्पादक व केवळ दंतकथानाच योग्य अशी होती तथापि पद्धतीत असा फरक असला म्हणून या दोन भाषांची जात वेगळी म्हणता येईल काय? त्या सर्व दंतकथांच्या पोटी उच्च कल्पना वावरत होत्या या कल्पना स्पष्ट होण्याकरिता—व्यक्तपणास येण्याकरितां—धडपडत होत्या प्राचीन दंतकथात पुष्कळ सत्य प्रमेयें गुंफलेली आढळतात आपल्या अलीकडच्या नमुनेदार आणि सुंदर भाषेच्या पोटी पुष्कळ वेळा नुसता केरकचरा भरलेला असतो असे मला मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें याकरिता केवळ दंतकथा म्हणून तिचा विचार न करता अव्हेर करणें योग्य नाही. अर्वाचीन अमक्या तमक्या पंडिताच्या अथवा

पडितेच्या मताशी एखादी दतकथा जुळत नसली तर ती विचार न करिता झुगारून देणे योग्य नाही. एखाद्या प्राचीन भविष्यवाद्यानें एखादें मत पुढं आणले तर ते भविष्यवाद्याचे मत म्हणून डोळे मिटून त्याचा स्वीकार करा, असे कोणी म्हटले म्हणजे तुम्हीच त्याला हासता. मग या अर्वाचीन पडिताच्या अथवा पडिताबाईच्या मताचा स्वीकार डोळे मिटून करावा असे कोणी म्हटले तर तुम्हास अधिक हसू लोटले पाहिजे. अर्वाचीनकाळी मोझेसचे, बुद्धाचे अथवा ख्रिस्ताचे अवतरण कोणी उच्चारून दाखविले तर लोक त्याला हसत सुटतात, पण तेच त्यानें हक्सले, टिंडाल अथवा डार्विन् याचे वाक्य उच्चारल्यास याच लोकाच्या तोंडास कुलूप बसते 'हक्सले अमुक म्हणतो' असे कोणी म्हटल्याबरोबर विचार केल्यावाचून सर्वजण माना डोलवितात आम्ही अधविश्वास सोडून दिला आहे अशी घमेड अर्वाचीन लोकास आहे तिचे हे खासे उदाहरण आहे! प्राचीनकाळी धार्मिक भोळसरपणा होता आणि अर्वाचीन काळी शास्त्रीय भोळसरपणा बोकाळला आहे. फरक इतकाच की प्राचीनकाळच्या अधविश्वासातून आणि भोळसरपणातून जीवनदायी आणि इद्रियातीत अशा कल्पना जन्म पावल्या आणि अर्वाचीन काळच्या शास्त्रीय भोळसरपणातून अधाशीपणा आणि इद्रियसुखलोलुपता ही रत्ने बाहेर पडली आहेत. जुन्या भोळसरपणाचा परिणाम ईशपूजनात झाला आणि नव्या भोळसरपणाचा परिणाम घाणेरड्या इद्रियपूजनात होत आहे अर्वाचीन शास्त्राचे भक्त सत्ता आणि कीर्ति यांच्या मागे हात धुवून लागले आहेत या दोन भोळसरपणात फरक हाच

आता आपण दतकथाकडे वळू. मनुष्याचे साप्रतचे स्वरूप हे त्याच्या पूर्व रूपाहून अवनतरूप आहे ही कल्पना या सर्व दतकथामागे आहे हे अगोदर सांगितलेच आहे अर्वाचीन काळाचा विचार करता अर्वाचीन शोधांचे मत या मताविरुद्ध असल्याचे दिसून येईल उत्क्रातिवादीही या मताचें खडण करतात असे दिसते. त्याच्या मताप्रमाणे खालच्या प्राण्याची उत्क्राति होत होत त्यातून मनुष्य निर्माण झाला आहे. याकरिता त्याच्या मते दतकथानी सागितलेलें मत खरें असणे शक्य नाही असे आहे तथापि हिंदुस्थानातील एका दतकथेप्रमाणे पाहता या विरोधाची एकवाक्यता होणें शक्य आहे हिंदु दतकथात युगाची कल्पना अतर्भूत झाली आहे.

त्याच्या मताप्रमाणे लाटाच्या उदयास्ताप्रमाणे उत्क्रातीचाही उदयास्त होत असतो. लाट उच्चतेच्या परमावधीस पोंचली म्हणजे पाठोपाठ तिचे पतन होते हे पतन नीचतमावस्थेस गेले म्हणजे नव्या लाटेच्या उदयास पुन्हा सुरवात होते अशा रीतीने उदय आणि अस्त एकामागून एक जातात व येतात ही गति चक्राकार आहे आता अगदी अर्वाचीन शोधाचा विचार केला तरी केवळ उत्क्रातिद्वाराच मनुष्यप्राणी निर्माण होऊ शकतो असे सिद्ध करता येत नाही. अमुक वस्तु उत्क्रात झाली असे म्हटले की ती कोणत्या तरी अपक्रात स्थितीतून उत्क्रात स्थितीस आली असली पाहिजे हे आपोआपच ठरते उत्क्रांति हा शब्द उच्चारताच अपक्रातीचाही अतर्भाव त्यात आपोआपच होतो एखाद्या यत्रात पूर्वी जी काही शक्ति भरून ठेविली असेल तितकीच बाहेर पडेल असे अर्वाचीन शास्त्रीही तुम्हास सागतील नास्तित्वातून कोण-त्याही प्रकारचे अस्तित्व उत्पन्न करता येणार नाही (**नासतो विद्यते भावः।** गीता–२–१६ ) मनुष्यप्राणी हा नीचतमावस्थेतून उत्क्रात झालेला प्राणी असेल तर बुद्ध, अथवा ख्रिस्त या पूर्णपुरुषात नीचतम प्राणी अपक्रात अवस्थेत असला पाहिजे हे उघड आहे कारण असे नसेल तर हे पूर्ण पुरुष कोणत्या अवस्थेतून उत्क्रात झाले? नास्तित्वातून कोणतेही अस्तित्व निर्माण होऊ शकत नाही हा सिद्धात आपणास ठाऊक आहेच अशा रीतीने प्राचीन दतकथा अथवा धर्मपुस्तके याचे मत आणि अर्वाचीन शास्त्राचे मत यांत बाह्यत भासणाऱ्या विरोधाची एकवाक्यता आपणास करतां येते. दिवसें-दिवस अधिकाधिक उच्च स्वरूपाकडे जात जात अखेरीस पूर्ण पुरुषाच्या रूपाने व्यक्त होणारी शक्तीही नास्तित्वातून उत्पन्न झाली असेल हें सभवत नाही तिचे अस्तित्व कोठे तरी होते. तिचे अस्तित्व शोधीत शोधीत आपण अगदीं नीचतम प्राण्यापर्यत पोचलो तर तेथे कोणत्यातरी स्वरूपात तिचें अ-स्तित्व आपणास आढळून येईल. ज्याला आपण जीवात्मा, विचारशक्ति इत्यादि नावें देतों ती शक्ति देहातील निरनिराळ्या घटकांच्या समीकरणापासून उत्पन्न झाली आहे की विचारशक्तीपासून देह स्पष्टीकरणास आला आहे याबद्दल सध्या मोठा कडाक्याचा वाद सुरू आहे. विचारशक्तीपासूनच देह स्पष्टत्वास आला असून देहामुळे विचारशक्ति प्रादुर्भूत झालेली नाहीं असें अर्थातच जगातील सर्व धर्मांचे मत आहे. उलट पक्षी ज्याला आपण

विचारशक्ति वगैरे नावे देतो ती शक्ति देहघटकाच्या समीकरणातून उत्पन्न झाली आहे असे मानणारे अनेक अर्वाचीन पडित आहेत हे दुसरे मत खरें मानले तर आणखी एक नवाच प्रश्न उपस्थित होतो जड परमाणूच्या रासायनिक अथवा स्थूल सयोगातून आत्मा अथवा विचारशक्ति वगैरे उत्पन्न होतात असे मानले तर शरीर कसे उत्पन्न होते या प्रश्नास उत्तर मिळत नाही जे परमाणू आज शरीराच्या रूपानें दिसतात त्याचे ते मिश्रण कोणत्या शक्तीने केले ? जड परमाणूच्या प्रचड विस्तारातून योग्य तितके परमाणू निवडून काढून माझे विशिष्ट शरीर एका आकाराचे व दुसरे एखादे दुसऱ्या विशिष्ट आकाराचे कोणी निर्माण केले ? आज निरनिराळ्या शरीरात जे अनत विश्वप्रकार निर्माण झाले ते कोणी निर्माण केले ? शरीरघटकाच्या सयोगातून जीवात्मा उत्पन्न होतो असे म्हणणे म्हणजे घोडा मागे आणि गाडी पुढे अशी जोड करण्यासारखे आहे हे मिश्रण तरी कसे उत्पन्न झाले ? हें मिश्रण करण्यास कोणती शक्ति उपयोगी पडली ? ज्या शक्तीमुळे परमाणूचा सयोग होऊन जीवात्मा व शरीर उत्पन्न झाले ती शक्ति आणखी एक निराळीच होती असे उत्तर तुम्ही दिले तर ते योग्य उत्तर होणार नाही. जी उपपत्ति पूर्वी अस्तित्वात असलेल्या उपपत्तीशी विरोध करीत नाही व जीमुळे प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टीची सगति लागते तीच उपपत्ति गृहीत धरणें अधिक योग्य होईल. तिच्यामुळे सर्वच अडचणीचे निवारण होईल असे नाही. तथापि पुष्कळशा गोष्टीची सगति लागेल जड परमाणू घेऊन जी शक्ति शरीरबध बनविते तीच शक्ति शरीरद्वारा स्पष्टीकरणास येते, असे म्हणणें न्यायास अधिक अनुसरून होईल—तर्कशास्त्रास ते अधिक समत होईल. याकरिता शरीरघटकाच्या सयोगाने उत्पन्न झालेल्या विचारशक्तीस त्या घटकाच्या बाहेर अथवा त्या घटकांव्यतिरिक्त स्वतत्र अस्तित्व नसतें, असें म्हणणें सयुक्तिक नाही. याशिवाय जडवस्तूतून चैतन्य-शक्ति उत्पन्न होऊ शकणार नाही हेही लक्ष्यात ठेविले पाहिजे. उलटपक्षीं ज्याला आपण जड परमाणू असे म्हणतो त्यालाच मुळात अस्तित्व नाही असेहि आम्ही सिद्ध करू शकू. जड परमाणू ही शक्तीची एक अवस्था आहे. घनपणा, काठिण्य अथवा जड वस्तूची दुसरी कोणतीही स्थिति हा गतीचा एक परिणाम आहे असे सिद्ध करता येणे शक्य आहे. हवेचा स्तभ चक्राकार गतीने सपाट्याने फिरू लागला

असता तो घन आणि कठीण होतो, व कठीण वस्तूवर आदळून त्याचा भेद करू शकतो प्रचड वादळाच्या वेळी प्रवाही वायुही मोठमोठी झाडें व घरें-दारे मोडून टाकतात कोळ्याच्या जाळ्यातील क्षुद्र ततु अत्यत तीव्र अशा गतीने फेकता आला तर मोठ्या लोखडी साखळदडासारखा आघात तो करू शकेल व एखाद्या दुर्भेद्य वृक्षालाही छेदून जाईल अशा रीतीने या गोष्टीचा विचार केला तर जिला आपण जडवस्तू असे म्हणतों तिला खरे अस्तित्वच नाही असे सिद्ध करणे अवघड नाही, पण याच्या उलट उपपत्ति गृहीत धरली तर ती मात्र सिद्ध करणे शक्य नाही

आता या देहाच्या द्वारे जी शक्ति स्पष्टीकरणास येते तिचे स्वरूप काय आहे याचा विचार केला पाहिजे देहाबाहेर पसरलेल्या जड अणूतून काही घेऊन व त्यास कामी लावून त्यातून आकार म्हणजे नरदेह उत्पन्न करणे हे त्या शक्तीचे कार्य आहें हे आपणा सर्वास ठाऊक आहेच त्या शक्तीचे दुसरें कोणतेही स्वरूप असले अथवा नसले तरी देह घडविण्याचे कार्य ती करते तुमचे आमचे देह घडविण्यास बाहेरून दुसरे कोणी आले आहे असें नाही. मी अन्न खाल्ले आणि त्यामुळे दुसरा लठ्ठ झाला असे कधी घडत नाही दुस-ऱ्याने खाल्लेले अन्न माझ्या उपयोगी पडत नाही त्या अन्नाचे पचन मलाच करावे लागते. मलाच रक्त बनवावे लागते व त्या अन्नातून हाडेही मलाच बनवावी लागतात अशा प्रकारच्या या चत्मकारिक शक्तीचे स्वरूप तरी काय आहे? गतकालाच्या अथवा भविष्य कालाच्या कल्पनानी पुष्कळ लोक भाबावून जातात अशा प्रकारच्या कल्पना म्हणजे निव्वळ कल्पनेचेच खेळ होत असे त्यास वाटते. आपण आपला चालू प्रश्न हाती घेऊ आपल्या द्वारे स्पष्टीकरणास येणाऱ्या शक्तीचे स्वरूप काय आहे असा आपला प्रश्न आहे आप-ल्या या देहाच्या द्वारे व्यक्त होणारी शक्ति म्हणजे एक तेजोमय पदार्थ असून त्याला जड देहासारखाच आकार आहे व जड देहाच्या पतनानतर तो शिल्लक उरतो अशी कल्पना प्राचीनकाळी सर्व धर्मात रूढ होती हें आपणास ठाऊक आहेच. यानतरच्या काळातही पूर्वकल्पना लुप्त होऊन तिच्या जागी एक उच्चतर कल्पना प्रादुर्भूत झाली. हा तेजोमय देह, म्हणजे त्या शक्तीचे स्पष्टरूप नव्हे अशी दुसरी कल्पना पहिलीच्या जागी आली जेथे आकार म्हणून आहे तेथे अनेक अणूचे समिश्रण झाले असलेच पाहिजे, व या मिश्रणास गति

देणारी आणखी एखादी शक्ति त्यामागे असली पाहिजे या जड देहाची हालचाल करण्याकरिता जर तेजोमय देहाचे अस्तित्व असावे लागते तर त्याच कारणाने त्या तेजोमय देहाची हालचाल करण्याकरिता त्याहून निराळी अशी एखादी शक्ति त्यामागे असली पाहिजे तेजोमय देहाच्या मागे असलेल्या या शक्तीस आत्मा असे नाव सस्कृतात आहे आत्मा तेजोमय देहाच्या द्वारे बाह्य अथवा स्थूल देहाची हालचाल करतो तेजोमय देह हा मनाचा कोश होय, व आत्मा त्या देहाच्याही पलीकडे आहे मन म्हणजेही आत्मा नव्हे मनाला त्याची क्रियाशक्ति देणारा व मनाच्या द्वारे शरीर चालविणारा तो आत्मा तुम्हास एक आत्मा आहे त्याचप्रमाणे मला व इतर सर्वांस एकएक निरनिराळा आत्मा आहे त्याचप्रमाणे आपणा सर्वांस एकएक तेजोमय देह असून त्याद्वारे आपण आपले स्थूल देह चालवितो यानतर आत्मा म्हणजे काय, त्याचे स्वरूप काय, इत्यादि प्रश्न उपस्थित झाले आत्मा म्हणजे देह नव्हे व मनही नव्हे असे म्हणता तर त्याचे स्वरूप तरी काय? या प्रश्नावर पुष्कळ भवति न भवति झाली, या प्रचड वादविवादातून अनेक मते उद्भवली, अनेक प्रकारच्या तत्त्वज्ञानाच्या सरण्या निर्माण झाल्या या एकदर वादविवादाच्या अखेरीस या आत्म्याच्या स्वरूपाबद्दल जे काही सिद्धात निश्चित झाले आहेत ते मी तुम्हास सागतो आत्म्याचे स्वरूप कसेही असले तरी त्याला आकार नाही व ज्या वस्तूला आकार नाही ती वस्तू सर्वव्यापी असली पाहिजे याबद्दल सर्व दर्शनाची एकवाक्यता झाली आहे असे दिसते कालकल्पना मनाच्या अस्तित्वापासून सुरू होते त्याचप्रमाणे देशकल्पनेलाही मनाच्या ठिकाणीच अस्तित्व आहे तसेच कालावाचून निमित्ताचे अस्तित्व सभवत नाही कार्यकारणाच्या परपरेची कल्पना अस्तित्वात आल्यावाचून निमित्ताची कल्पनाही सभवत नाही याकरिता काल, देश आणि निमित्त यांचें अस्तित्व मनाच्या ठिकाणी असून आत्मा हा मनोबाह्य व निराकार असल्यामुळे तो कालातीत, स्थलातीत व निमित्तातीत असला पाहिजे आता जर तो काल, स्थल व निमित्त याच्या पलीकडचा असेल तर तो अनतही असला पाहिजे आता यापुढे आमच्या तत्त्वज्ञानाची अत्युच्च पायरी लागते. अनत वस्तू दोन असू शकत नाहींत. जर आत्मा अनत वस्तू असेल तर तो एकच असला पाहिजे, याकरिता तुमचा एक

आत्मा, माझा एक आत्मा अशा प्रकारच्या अनेक आत्म्याचे अस्तित्व सभवतच नाही. याकरिता निरनिराळ्या आत्म्याची कल्पना असत्य असली पाहिजे याकरिता सत्य पुरुष एकच असला पाहिजे, अनत असला पाहिजे, सर्वव्यापी असला पाहिजे व केवळ चैतन्यरूप असला पाहिजे जड देहाच्या ठिकाणी दिसून येणारा पुरुष हे खऱ्या पुरुषाचे बद्ध स्थितीतील एक रूप आहे या दृष्टीने विचार करिता दतकथाचे सिद्धात खरे आहेत असे म्हणावे लागते कोणी मनुष्य कितीही मोठा झाला तरी त्याच्या पलीकडे असलेल्या सत्यपुरुषाचे तो प्रतिबिब मात्र आहे असे प्राचीन दतकथाचे मत आहे हा सत्य पुरुष—चैतन्यरूप पुरुष—कार्यकारणाच्या पलीकडे असल्यामुळे व देशकालनिमित्त याच्याही पलीकडे असल्यामुळे तो मुक्तस्थितीत असला पाहिजे तो कधीच बद्ध नव्हता व त्याला बद्ध करणें शक्यही नाही बाह्यत दिसणारा पुरुष–त्या चैतन्य पुरुषाचे प्रतिबिब–देश, काल आणि निमित्त यानी नियत्रित असल्यामुळें तो बद्धही आहे अथवा हीच गोष्ट आमच्या तत्त्वज्ञानाच्या भाषेत बोलावयाची म्हटली तर तो वस्तुत बद्ध नसून बद्ध असल्यासारखा भासतो असे म्हणता येईल आपल्या जीवात्म्याचे सत्यस्वरूप हेच सर्वव्यापी केवळ चैतन्यमय व अनत असे हे रूप आहे प्रत्येक आत्मा अनत आहे. याकरिता त्याच्या जन्ममरणाचा प्रश्नच सभवत नाही एके वेळी काही मुलाची परिक्षा चालली होती. त्याना काही कठीण प्रश्न परीक्षक विचारीत होता. 'पृथ्वी पडत का नाही ?' असा एक प्रश्न त्या परीक्षकानें विचारला. गुरुत्वाकर्षणाबद्दल मुलास कितपत माहिती आहे हे त्यास पाहावयाचे होते. बऱ्याचशा मुलास या प्रश्नाचे उत्तर देता आले नाही. काहीनी काही वेडीवाकडी उत्तरें दिली शेवटी एका छोट्या मुलीने परीक्षकास प्रश्न केला 'ही पृथ्वी कोठे पडणार ?' या प्रश्नातच पहिल्या प्रश्नाचे उत्तर मिळाले. मूळ प्रश्नच मूर्खपणाचा होता, चढ आणि पड ही पृथ्वीच्या ठिकाणी सभवतच नाहीत तिने चढावे कोठे आणि पडावे तरी कोठे ? आकाशाच्या अनत विस्तारात वर आणि खाली असे काही सभवतच नाही. त्यात कोठें जाणें नाही आणि येणेंही नाही. याकरिता गत आणि भविष्य अशा दोन्ही कल्पनांचा आपण त्याग केला व देह नियत्रित असून जाणारा व येणारा आहे म्हणून त्याचाही विचार सोडून दिला तर आपण तत्त्वज्ञानाच्या वरच्या

पायरीस सहजच पोहोचू हा देह म्हणजे खरा पुरुष नव्हे त्याचप्रमाणें मनही आकुचित व विस्तृत होत असल्यामुळे तेही सत्य वस्तु नव्हे या दोहोच्या पलीकडे असलेले चैतन्य हेच अनतकाल राहणारे आहे देह आणि मन यात प्रत्येक क्षणी बदल होत असतो किंबहुना एकसारख्या बदलणाऱ्या जड वस्तूला मन आणि देह अशी नावे आपण दिली आहेत एखादी नदी ज्याप्रमाणे एकसारखी वाहत असते व पहिले पाणी टाकून नवे घेत असते व असे करीत असताही तिचा प्रवाह अखड चालू असतो त्याचप्रमाणे देह व मन ही प्रत्येक क्षणी बदलत असताही त्याचा प्रवाह अखड चालू असतो आपल्या देहातील प्रत्येक परमाणू प्रत्येक क्षणी बदलत आहे, काही मिनिटानी आपणास नवा देह प्राप्त होत असतो, आणि असे असताही आपला तोच देह आहे असे आपण समजतो. मनासही हीच गोष्ट लागू आहे एका क्षणी ते सुखाच्या शिखरावर बसले असता दुसऱ्या क्षणी दु खाच्या डोहात उडी घेते एका क्षणी ते शक्तिमान् तर दुसऱ्या क्षणी तेच मन दुर्बल बनते. अशा रीतीने त्याचे चक्रावर परिभ्रमण अखड चालू आहे याकरिता मन हे अखड चैतन्य होऊ शकणार नाही जे बद्ध आहे त्यातच बदल होऊ शकतो अनत बदलू शकते असे म्हणणे सर्वथा चुकीचे आहे, कारण तसे घडणे शक्यच नाही देहाच्या बधनात तुम्ही आम्ही आहो तोवरच आपण हालचाल करू शकू या विश्वातील प्रत्येक अणुरेणु एकसारखा बदलत आहे, पण विश्वाचा समष्टिरूपाने विचार केला तर अनतकाल ते जशाच्या तसेच आहे, ते बदलू शकत नाही गति ही सापेक्ष स्थिति आहे दुसरे काही स्थिर असते म्हणून त्याच्या अपेक्षेने मी हालचाल करीत असतो या विश्वातील काही अणु स्थिर असले तर त्याच्या अपेक्षेने दुसऱ्या काहीत हाल-चाल सुरू असते असे आपण म्हणतो, पण विश्वाचा समष्टिरूपाने विचार करता ते स्थिर आहे असेच म्हटले पाहिजे, कारण त्याच्याशी तुलना कर-ण्यास स्थिर अथवा चल अशी दुसरी वस्तूच नाही मग त्याला 'चल' असे कसे म्हणता येईल? विश्वबाह्य अशी दुसरी वस्तूच अस्तित्वात नाही या-करिता समष्टिरूप विश्व हे कधीही न बदलणारे, कधीही हालचाल न करणारें आणि केवलरूप असे आहे खऱ्या पुरुषाचे स्वरूपही हेंच याकरिता आमचे जें सत्यरूप आहे ते विश्वरूप असून व्यष्टिरूप अथवा देहरूप नव्हे देहाच्या

बधनात नियत्रित झालेले जें रूप आपणास दिसते ते आपले खरे रूप नव्हे आपले खरे रूप या साडेतीन हात देहातच गुरफटलेले असून आपणात नित्य बदल सुरू आहे हा विचार आपणास कितीही सुखदायक वाटत असला तरी तो भ्रम आहे फार प्राचीन काळापासून हा भ्रम आपणास चिकटला आहे तुम्ही विश्वव्यापी आहा असे कोणास सागितले तर भयाने त्याची घाबरगुडी वळते जगातील प्रत्येक वस्तूच्या द्वारे तुम्ही कार्य करीत आहा, प्रत्येक पायाने तुम्हीच चालत आहा, प्रत्येक तोडाने तुम्हीच भाषण करीत आहा आणि प्रत्येक अत करणाने तुमच्याच ठिकाणी भावना उत्पन्न होते

अशा प्रकारचे भाषण लोकाना केले तर ते घाबरून जातात. आमचे वैय्यक्तिक अस्तित्व हरवून जाणार की काय असा प्रश्न ते करतात, पण व्यक्तित्व म्हणजे तरी काय ? अमुक हे व्यक्तित्व असे कोणी मला दाखवून देईल तर त्याचे मजवर अनत उपकार होतील मुलाला लहानपणी मिशा नसतात तेच मूल मोठे झाले म्हणजे त्याचाच पुरुष बनून त्याला मिशा आणि दाढी ही दोन्ही येतात त्याचे व्यक्तित्व त्याच्या देहातच गुरफटलेले असते तर दाढी मिशाचा देह प्राप्त झाल्याबरोबर ते नष्ट झाले असते माझे व्यक्तित्व माझ्या देहातच निगडित असते तर माझा एखादा डोळा अथवा हात जाण्याबरोबर तेही नष्ट झाले असते एखाद्या दारूबाजाने आपले व्यक्तित्व दारू पिणाऱ्या देहातच आहे असे म्हणून दारू पिणे सोडू नये असेच तुमचे म्हणणे आहे काय ? तुमच्या या विचारसरणीने चालले तर चोराने चोरी करणे सोडू नये व कोणीही आपल्या बऱ्यावाईट सवयी टाकू नयेत असे होईल याकरिता ही विचारसरणीच चुकीची आहे अनतत्व हेच तुमचे खरे व्यक्तित्व आहे अनतत्व हेच कायते चिरजीवी म्हणजे कधीही न बदलणारें अस्तित्व आहे सदासर्वकाल एकसारखी टिकणारी एवढीच अवस्था आहे याशिवाय बाकीची प्रत्येक वस्तु आणि स्थिति प्रत्येक क्षणी बदलत आहे आपले व्यक्तित्व स्मृतिरूप आहे असे म्हटले तर ते म्हणणेही बरोबर नाही माझ्या मस्तकावर एखादा आघात होऊन माझी पूर्वस्मृति नष्ट झाली असे समजा मग अशा स्थितीत माझें व्यक्तित्व नाहीसे होऊन मी साफ हरवलो असे म्हणावयाचे काय ? माझ्या बालपणीच्या दोनतीन वर्षाच्या वयापर्यंत घडलेल्या गोष्टी मला स्मरत नाहीत. स्मृति आणि अस्तित्व ही एकरूप आहेत असे म्हटले तर ज्याची

स्मृति मला नाही ते माझे अस्तित्व नव्हतेच असे म्हणावयाचे काय ? आयुष्याच्या ज्या भागाची आठवण मला नाही तेवढा काल मी अस्तित्वातच नव्हतो असे म्हणावयाचे काय ? व्यक्तित्वाची ही अत्यंत आकुंचित कल्पना आहे. अद्यापि खरे व्यक्तित्व आम्ही संपादनच केलेले नाही. ते संपादन करण्यासाठी आम्ही एकसारखे धडपड करीत आहो हे मात्र खरे ते व्यक्तित्व म्हणजे अनंतत्व मनुष्याचे खरे रूप तेच ज्याचे जीवन विश्वमय झाले तोच खरोखर जगतो असे म्हटले पाहिजे. नियंत्रित वस्तूकडे जों जों आपण अधिक ओढ घेतों तों तों आपण झपाट्याने मृत्यूकडे जात असतो ज्याक्षणी आपले जीवित विश्वमय बनत असते तेवढेच क्षण आपण वास्तविकरीत्या जगत असतो या देहबंधनातच गुरफटून बसणे हा शुद्ध मृत्यु होय मृत्यूची आपणास इतकी भीति वाटते याचेही कारण हेच विश्वात एकतरी सजीव वस्तु असेपर्यंत मी जिवंतच आहे अशी भावना ज्याच्या ठिकाणी दृढमूल होईल तोच मृत्यूचे भय जिंकील 'मी सर्वव्यापी आहे, मी प्रत्येक देहात, जीवात आणि साऱ्या विश्वात आहे,' असें म्हणण्याची पात्रता ज्याला येईल त्यालाच निर्भयता प्राप्त होईल. प्रत्येक क्षणी बदलणाऱ्या वस्तूबद्दल त्या चिरंजीवी आहेत अशी भावना करणे मूर्खपणाचे आहे चैतन्यमय पुरुष हीच खरी व्यक्ति आहे, कारण, तो अनंत आहे. अनंत वस्तूचे भाग करता येणार नाहीत अनंतत्वाचे खंडश तुकडे करता येणार नाहीत अनंतकालपर्यंत एकरूप असे तेच रूप आहे. तेच खरे व्यक्तित्व आणि तोच खरा पुरुष मनुष्याचे खरे रूप तेच हे आपले विशिष्टत्व व्यक्त करण्याकरिता—स्पष्टत्वास आणण्याकरिता चाललेली जी धडपड ते आपले सध्याचे सामान्य मानवी रूप. आपले विशिष्टरूप हे या धडपडीपलीकडे आपली जी उत्क्रांति होत आहे ती चैतन्याची उत्क्रांति नव्हे. ज्या उत्क्रांतीच्या योगाने वाइटाचे स्वरूप पालटत पालटत चांगलें होते अथवा ज्यायोगें पशुत्वाचे मानुषी रूप होते ती उत्क्रांति चैतन्याची नव्हे चैतन्याचे जें व्यक्त अथवा स्थूलरूप आहे त्याची अथवा त्या प्रकृतिरूपाची उत्क्रांति होते तुमच्या आणि माझ्यामध्ये एखादा पडदा आड आला आहे असें समजा या पडद्याला एक बारीक छिद्र आहे अशी कल्पना करा या छिद्रातून तुमच्यापैकीं काही थोडे चेहरे मात्र मला दिसतात. आतां अशी कल्पना करा की हें छिद्र विस्तृत होत जात आहे. तें

जो जो मोठे होत जाईल तो तों अधिक चेहरे मात्र मला दिसतील हे उघड आहे तें छिद्र विस्तृत होत होत अखेरीस तो सबध पडदा नाहीसा झाला म्हणजे तुम्हा सर्वांचे चेहरे मला स्पष्ट दिसू लागतील. या उदाहरणात तुमच्यात काही बदल झाला आहे असे नाही. तुम्ही सर्व जागच्या जागीच होता. तुम्ही कोठे गेला नव्हता अथवा कोठून आलाही नाही. छिद्र जों जो विस्तृत होत गेले अथवा उत्क्रात होत गेलें तो तो तुम्ही मला अधिकाधिक पूर्ण रूपाने दिसू लागला. आपल्या चैतन्यालाही हीच गोष्ट लागू आहे. आपण पूर्णत्व पावणे म्हणजे चैतन्य पूर्णत्वास येते असे नव्हे. आपले चैतन्यरूप मूळचेच मुक्त आणि पूर्ण आहे. मरणानतर मनुष्याचे काय होते, परमेश्वराचे अस्तित्व आहे की नाही, अशा प्रकारच्या ज्या अनत कल्पना धर्मग्रथात आढळून येतात त्या का उद्भवल्या ? परमेश्वर म्हणून कोणी असावा अशी कल्पना करून मनुष्य त्याच्या पाठीमागे का लागतो, परमेश्वराचे स्वरूप अथवा पूर्ण पुरुषाचे स्वरूप आपल्या मनश्चक्षूपुढे ठेवून ते आपले अखेरचे साध्य आहे अशी भावना मनुष्यप्राणी का करतो ? समाजाच्या प्रत्येक परिस्थितीतील आणि प्रत्येक राष्ट्रातील प्रत्येक मनुष्य अशा प्रकारच्या कोणत्या तरी ध्येयाच्या मागे असतो माझ्यात काही तरी उणीव आहे ही जाणीव प्रत्येकाच्या अतर्यामी असते व ती भरून काढण्याकरिता त्याची सारखी धडपड सुरू असते. या कल्पनेचा त्याग करणे आपणास शक्यच नाही, कारण, या पूर्ण पुरुषाच्या अथवा ईश्वराच्या कल्पनेचा वास आपल्या अतर्यामाच्या खोल भागात पक्का होऊन राहिलेला आहे ही कल्पना आपल्याच अतर्यामातील आहे याची जाणीव आपणास नसते बाहेरून कोठून तरी आपल्या डोक्यात ती शिरली असावी असा आपला चुकीचा समज झालेला आहे परमेश्वर आपल्या अत करणात असून तोच आपल्या स्वत च्या भेटीसाठी तुम्हास पुढे पुढे ढकलीत आहे. त्याचा अनुभव आपणास व्हावा म्हणून तोच आपणास एकसारखा उत्तेजन देत आहे ( **ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेर्जुन तिष्ठति ।** गीता १८–६१ ) देवळात, चर्चात, भुयारात, डोंगराच्या कपाटात आणि स्वर्गातही त्याला शोधून शोधून दमल्यावर आपण पूर्वी ज्या ठिकाणाहून निघालो तेथेंच परत येतो. अशा रीतीने एक वर्तुळ पूर्ण करून आपल्या जीवात्म्याकडे परत आल्यावर ज्याच्या भेटीसाठी आपण धडपडत होतों, देवळे आणि अरण्यें धुडीत होतो,

टाहो फोडून अश्रु गाळीत होतो, जें गुढातले गूढ आहे असे आपणास वाटत होते ते परमेश्वराचेच स्वरूप आपल्या अत्यत सन्निध आहे किबहुना तोच आपण आहो व आपल्या देहाचे आणि जीवात्म्याचे खरे स्वरूप तेच आहे असा अनुभव आपणास येतो तुमचे खरें स्वरूप हे हा तुमचा प्रकृतिगुणच आहे तोच स्पष्टत्वास येऊ द्या तो स्पष्टत्वास येण्याच्या मार्गांतील अडथळे दूर करण्याचा अट्टाहास करा. पवित्र होण्यासाठी धडपडण्याचे कारण तुम्हास नाही पवित्र होण्याची जरूरच तुम्हास नाही, कारण, तुम्ही आधीच पवित्र आहा. पूर्णत्व पावण्यासाठीही काही करावयास नको, कारण तुम्ही आधीच पूर्ण आहा आपल्या भोवती प्रकृतीचे आवरण पडद्यासारखे आड आल्यामुळे त्या पडद्या पलीकडचे सत्यरूप आपणास दिसत नाही आपल्या मनात येणारा प्रत्येक सद्विचार आणि त्या सद्विचारास अनुरूप अशी घडणारी आपली प्रत्येक कृति ही शस्त्रासारखी असून त्यायोगे तो पडदा फाडण्यास आपणास साधन प्राप्त होते हा पडदा जो जो अधिक फाटत जातो तो तो त्यापलीकडील अनतत्व—ईश्वरत्व—अधिक अधिक स्पष्टरूपाने आपणास दिसू लागते मनुष्याचा सारा इतिहास हाच पडदा जो जो अधिक विरळ होत जातो तो तो त्या पलीकडील प्रकाश अधिक अधिक उज्ज्वल होतो. कारण प्रकाशणे हाच त्याचा प्रकृतिस्वभाव आहे प्रकाशणे हा तुमचा मूलस्वभावच आहे त्याला जाणता येणे शक्य नाही त्याला जाणण्यासाठी आपण व्यर्थ धडपड करीत असतो जर तो जाणण्याजोगा विषय असता तर त्याचा हल्लीचा प्रकृतिभाव आहे तो कायम राहिला नसता तो चिरतनरूपाचा आहे, ज्ञानाच्या पलीकडचा तो आहे ज्ञान ही निगडित स्थिति आहे ज्ञानाला सीमा आहे तुमचा मूलस्वभाव सीमेच्या पलीकडचा आहे त्याला सीमा नाही व ज्ञानाला सीमा आहे म्हणून तो जाणता येणे शक्य नाही ज्ञान म्हणजे अमूर्ताला मूर्त रूप देणे अथवा प्रत्यक्षत्वास आणणे चैतन्यरूप हे या विश्वाचे साक्षी आहे हेच तुमचे मूलरूप ज्ञान ही या रूपाच्या खालची पायरी आहे या मूलरूपापासून भ्रष्ट होऊन एक पायरी खाली उतरणे म्हणजे ज्ञान आपण मूळचे अनतरूप आहो अशा स्थितीत त्याचे ज्ञान आपणास कसे होईल? केवळ चैतन्यरूप असणे हा प्रत्यक्ष मनुष्याचा प्रकृतिस्वभाव आहे हाच प्रकृतिस्वभाव व्यक्तत्वास आणण्याची खटपट प्रत्येक मनुष्य अनेक प्रकारें

करीत असतो. नीतिशास्त्राचे अनेक मार्ग निर्माण झाले याचेही कारण हेच. मूलप्रकृति व्यक्त करण्याकरिता ज्या निरनिराळ्या मार्गांनी निरनिराळ्या मनुष्यांनी धडपड केली व यामुळेच निरनिराळी नीतिवर्धन ग्रंथरूपाने अवतरली सर्व नीतिग्रंथाचे सार काय आहे? निरनिराळ्या ग्रंथानी ज्या निरनिराळ्या मार्गांचे उद्घाटन केले आहे त्या सर्वात मध्यवर्ती अशी एकच कल्पना सर्वत्र आढळून येते ती कल्पना परहित साधणे ही होय. स्वार्थाची दृष्टि मोडून प्रत्येकाने परहितार्थ झटावे असा उपदेश सर्व नीतिग्रंथानी केला आहे. मनुष्यासबंधी आणि पशूसबंधीही साऱ्या मनुष्यजातीने उदार बुद्धि ठेवणे हेच मनुष्यजातीचे आद्य कर्तव्य आहे, व हाच तिचा मुख्य मार्ग आहे असे प्रत्येक नीतिग्रंथ म्हणतो या सर्व उपदेशाच्या मुळाशी पाहिले तर ते एकच आहे "मी विश्वरूप आहे, हे सर्व विश्व एकरूप आहे" हे तत्त्व या सर्व उपदेशाच्या मुळाशी आहे तसे नसेल तर हा सर्व उपदेश व्यर्थ ठरतो या उपदेशाचे काही कारणच उरत नाही माझ्या इतर बांधवास मी मदत का करावी? इतराचे मी बरे का करावे? असे करण्याचे मला कारण काय? याचे कारण हेच की सर्वत्र जो एकभाव भरून राहिला आहे त्याची जाणीव माझ्याही चित्तात आहे यामुळे परक्याबद्दल माझ्या चित्तात सहानुकंपा साहजिकच उत्पन्न होते एखादा मनुष्य शुद्ध दगडाच्या अंतःकरणाचा असला तरी केव्हा तरी इतरासाठी त्याचे अंतःकरण पाझरते अशा रीतीने आपले आकुंचित स्वत्व विसरून विश्वरूप होणे म्हणजेच खरे व्यक्तित्व प्राप्त करून घेणे होय. हे तत्त्व ऐकून ज्याच्या छातीत धडकी भरते अशा मनुष्यालाही नीतीसंबंधी प्रश्न तुम्ही केल्यास स्वत्व विसरणे हीच अत्युत्तम नीति होय असे तोसुद्धा तुम्हाला सांगेल स्वत्व विसरणे हेच तत्त्व सर्व नीतीच्या मुळाशी आहे ही गोष्ट त्यालाही मान्य होईल पूर्णपणे स्वत्व विसरणे म्हणजे काय? याचा अर्थ इतकाच की स्वत्व म्हणून जी स्वार्थी आकुंचित कल्पना तुमच्या चित्तात ठाम होऊन बसली आहे तिचा त्याग करणे. स्वार्थी दृष्टीचा समूळ उच्छेद करणे म्हणजेच स्वत्व विसरणे. 'मी' आणि 'माझे' अथवा अहंकार आणि ममता ही पूर्वग्रहाच्या योगाने उत्पन्न झाली आहेत. पूर्वकाळी मूर्खपणाच्या कल्पनास आपण चिकटून बसलो व त्यामुळे 'मी' आणि 'माझे' या कल्पनेचा उदय आपल्या ठिकाणी झाला. सांप्रतचे हे आपले स्वार्थी

स्वत्व आपण जों जों विसरत जाऊ तों तों आपले खरे स्वत्व अधिकाधिक दृश्यत्वास येत जाईल सर्व नीतिबधनाच्या मुळाशी असलेले तत्त्व हेंच होय. कोणाला हे समजत असेल अथवा नसेल पण सर्व जग हळू हळू याच तत्त्वाकडे जात आहे याच तत्त्वाचा आचार करण्याची खटपट कमी अधिक प्रमाणाने ते करीत आहे मनुष्यजातीपैकी पुष्कळ जण या तत्त्वाचा विचार न समजता करीत असतात. आपणास हाच आचार समजून उमजून करावयाचा आहे मी आणि माझे या कल्पनाचा त्याग करून माझें खोटे स्वार्थी स्वत्व मला विसरावयाचे आहे ही गोष्ट सर्वाच्या ध्यानी आणून द्यावयास पाहिजे. दृश्य मानवी रूपामागें अनतरूप भरले आहे त्याच्या पाठीमागे तेजोमय अनत अग्नि प्रज्वलित झालेला आहे या सत्य प्रकाशाचा एक अधुकसा किरण मात्र मनुष्यरूपात दिसतो त्या अनत अग्नीचा एक स्फुलिग मात्र मनुष्याच्या ठिकाणी दृग्गोचर होतो अनतत्त्व हाच मनुष्याचा प्रकृतिस्वभाव आहे

या आपल्या मूळरूपाची ओळख कशी करून घ्यावी याचे ज्ञान सपादन करणे प्रत्येकास अवश्य आहे आता अशा प्रकारच्या ज्ञानाचा उपयोग काय असा प्रश्न वारंवार विचारण्यात येत असतो. हल्लीच्या दिवसात प्रत्येक गोष्टीची किंमत उपयुक्ततेच्या कसोटीवर ठरविली जाते. प्रत्येक गोष्टीचे रूपातर अखेरीस किती रुपये आणे आणि पै होईल हे पाहून मग तिचे महत्व ठरविले जाते वास्तविक पाहता सत्याला हा उपयुक्ततेचा अथवा पैशाचा काटा लावण्याचा अधिकार कोणास कसा पोचतो हेच मला समजत नाही तुम्हाला असा अधिकार काय आहे ? सत्यवस्तूची तुमच्या व्यवहारात काही उपयुक्तता ठरली नाही म्हणून तिचे सत्यपण गेलें काय ? उपयुक्तता ही सत्याची कसोटी नव्हे आता असे आहे तरी हें ज्ञान अत्यत उपयुक्त आहे असे सागण्यास मला दिक्कत वाटत नाही. प्रत्येक प्राण्याची धडपड सुखप्राप्तीसाठी चालली आहे हें तर आपण नित्य पाहातोच, पण प्रत्येकजण हें सुख क्षणभगुर वस्तूंत शोधीत आहे ज्याना सत्यत्व नाही आणि ज्याना चिरस्थायी रूप नाही अशा वस्तूत सुखाचा शोध आपण करीत असतों इद्रियाच्या तृप्तीच्या मागे लागून सुखाची प्राप्ती आजपर्यंत कोणासही झालेली नाहीं. इद्रियजन्य सुखें भोगून पूर्ण सुखप्राप्ति झाली असा एकही मनुष्य आजप-

र्यंत पाहण्यात आलेला नाही सुखाची प्राप्ति फक्त चैतन्याच्या ठिकाणी मात्र आहे याकरिता या चैतन्यात सुख कसे शोधावे हे ज्ञान प्राप्त करून घेणे हे मनुष्यजातीस अत्यत उपयुक्त आहे याशिवाय अज्ञान हे आपल्या दु ख-प्राप्तीचे अत्यत मोठे कारण आहे हाही मुद्दा ध्यानात ठेवण्यासारखा आहे. अनतत्त्वाच्या ठिकाणी दु खाची व्याप्ती आहे व ते शात आहे असा भ्रम पडणे हे सर्वांत मोठे अज्ञान होय आपले स्वत चे रूप चिरस्थायी, पूर्ण, पवित्र व शुद्ध चैतन्यमय असता आपण केवळ भावनारूप आहों, आपण केवळ देहरूप आहो असें वाटणे हा सर्व अज्ञानाचा पाया होय सर्व प्रकारच्या स्वार्थबुद्धीचा उगम येथूनच होतो हा देह म्हणजे ‘मी’ अशी भावना माझ्या ठिकाणी उत्पन्न झाली म्हणजे त्या देहाच्या रक्षणाची काळजी मला लागते त्यालाच सुरक्षित व ऐषआरामात ठेवावे असे मला वाटू लागते त्या देहाची जोपासना करण्यात इतराचे देह खर्ची पडले तरी त्याची पर्वा मला वाटत नाही हा देह म्हणजे ‘मी’ अशी भावना माझ्या ठिकाणी ज्या क्षणी उत्पन्न होते त्याच क्षणी ‘मी’ आणि ‘तू’ या द्वैतासही प्रारभ होतो द्वैतभावना माझ्या चित्तात उभी राहिली की दुसऱ्या दुष्टभावना उत्पन्न होण्यास आपोआप अवसर सापडतो, व त्या उत्पन्न होण्याबरोबर त्याना शोधीत त्याच्या मागोमाग दु खही येतेच या ज्ञानाचा जो अत्यत मोठा उपयोग आहे तो हाच मी म्हणजे देह ही भावना एकदर मनुष्यजातीच्या एका अत्यल्प अशानेही टाकून दिली तरीसुद्धा हे जग उद्या नदनवन बनून जाईल पण हल्लीच्या जडज्ञानाच्या वाढीने अथवा नानाविध यत्रसामग्री बनल्यानें ही गोष्ट सिद्ध होणार नाही चैतन्यरूपाच्या ज्ञानावाचून नुसते जडज्ञान म्हणजे आगीत तेलच होय हे जडज्ञान स्वार्थी मनुष्याच्या हातात देणे म्हणजे इतरास लुबाडण्याचे एक साधन त्याच्या हाती देण्यासारखे आहे. ज्याचा स्वार्थ बळावलेला आहे अशाच्या हाती हे जडज्ञान गेले म्हणजे परक्यासाठी जीव देण्याऐवजी स्वत च्या हितासाठी इतराचे जीव मात्र तो घेईल.

आता हें ज्ञान व्यवहार्य आहे की काय, याचाही विचार करणे अवश्य आहे “आमच्या सारख्या ससारी मनुष्यास हें ज्ञान मिळविणे शक्य आहे की काय असाही एक प्रश्न नित्य उपस्थित होत असतो साप्रतच्या समाज-

रचनेत या ज्ञानाचा व्यावहारिक उपयोग होईल की काय अशी शका पुष्कळास येत असते सत्य वस्तूने तुमच्या समाजाची गुलामगिरी पतकरलेली नाही. तुमच्या समाजापुढे हात जोडून ती कधीही उभी राहणार नाही तुमची सामाजिक रचना जुन्या पद्धतीची असो की अर्वाचीन असो सत्य तिच्यापुढे मान लवविणार नाही. सत्याला अनुसरून तुमच्या समाजाने चालले पाहिजे समाजाने सत्यापुढे मान वाकविली पाहिजे त्याचा भग न होईल अशा रीतीने तुम्ही आपली समाजरचना केली पाहिजे अशा रीतीने चालावयाची तुमच्या समाजाची इच्छा नसेल तर त्याने मरणास तयार झाले पाहिजे सत्याचा मूळ पाया वरून त्यावरच समाजरचनेची इमारत उठविली पाहिजे तुमच्या ममाजरचनेला अनुरूप व्हावे यासाठी आपले रूप सत्य कधीही पालटणार नाही समाजात राहून परार्थबुद्धिपालनासारख्या उदात्त तत्त्वाचा आचार करता येणे शक्य नसेल तर तो समाज सोडून देऊन अरण्यात चालते होणे शतपट अधिक चागले असे करणारा मनुष्य खरा शूर होय जगात दोन प्रकारचे धैर्य आहे तोफेच्या तोडावर धावून जाणे हा एक प्रकार, व जी गोष्ट आपल्या विवेकबुद्धीस पटली आहे ती कोणाचीही मुर्वत न बाळगता करणे हा दुसरा प्रकार एका बादशहाने एका काळी हिदुस्थानावर स्वारी केली होती हिदुस्थानात गेल्यावर तेथील साधुसताची भेट घ्यावी असा उपदेश त्याच्या गुरूने त्याला केला होता. शोध करता करता त्या बादशहाला अशा प्रकारचा एक साधु आढळला ते साधु महाराज शिलातलावर बसले होते साधु महाराजाशी राजाने काही वेळ भाषण केले तेव्हा त्याचे ज्ञान पाहून राजाला फार सतोष झाला व त्याने त्या साधूला आपणाबरोबर आपल्या देशी येण्याची विनति केली तेव्हा साधु म्हणाला, ‘राजा, माझ्या या अरण्यातच मी सुखी आहे मी तुजबरोबर येऊ इच्छित नाही’ राजा म्हणाला, ‘मी तुम्हास पुष्कळ द्रव्य देईन आणि तुमचा दर्जा वाढवीन. मी मोठा सत्ताधारी बादशहा आहे यावर साधूने उत्तर दिले ‘मला या वस्तूची मुळीच जरूर नाही’ तेव्हा बादशहा म्हणाला, ‘तुम्ही मजबरोबर न आला तर मी तुमचा वध करीन.’ साधूने सौम्य मुद्रेने हास्य करून उत्तर दिले, ‘राजा, तू अगदीच मूर्खासारखे बोललास तू मला मारू शकणार नाहीस ज्या मला सूर्य वाळवू शकत नाही,

अग्नि जाळू शकत नाही, तरवार कापू शकत नाही त्या मला तू कसे मारशील ? मला जन्म नाही आणि मृत्यूही नाही मी अमर, सर्वशक्तिमान् आणि सर्व भूतांतरात्मा आहे ' अत्यंत निर्भय चित्तातून येणारें उत्तर हें आहे चैतन्याशी ज्याची समरसता झाली आहे त्याच्याच तोंडातून असे उत्तर येईल तोफेच्या तोंडावर धावून जाण्यास जें धैर्य लागते त्याला सिंहाचें अथवा वाघाचे धैर्य असे म्हणता येईल त्याची तुलना या चैतन्यमय धैर्याबरोबर करता येणार नाही इ स १८५७ साली हिंदुस्थानात बंड झाले त्यावेळी तेथे एक स्वामी राहत होते एका मुसलमान बंडवाल्याने त्यांना सुरीने जबर जखम केली तेव्हा दुसऱ्या काही हिंदु बंडवाल्यांनी त्या मुसलमानाला पकडून स्वामींसमोर आणून उभे केले व ' याचा जीव घेऊ काय ? ' असा प्रश्न त्यांना केला स्वामींनी शांतपणे वर पाहून उत्तर केले ' प्रियबंधु, तू आणि तो एकच आहेस तू तोच तो ' इतके बोलून स्वामी गतप्राण झाले चैतन्ययुक्त धैर्याचे हे एक दुसरे उदाहरण आहे आपल्या बळकट स्नायूबद्दल प्रौढी मारण्यांत काय अर्थ आहे ? तुमच्या पाश्चात्य समाजरचनेच्या उत्तमपणाबद्दल तुम्हास मोठी घमेंड आहे, पण सत्याशी तुमच्या समाजाचा मेळ तुम्हास पाडता न येईल तर त्या समाजरचनेचा उत्तमपणा तो कोठें राहिला ? तुमच्या समाजरचनेत सत्याला थारा न मिळाला तर ती रचना निर्दोष कशी म्हणावी ? सत्य तत्त्वास अनुसरून आचरण करण्याचे धैर्य तुमच्या आंगी असले पाहिजे. तुमच्या समाजरचनेत अशा प्रकारचें धैर्य अव्यवहार्य ठरत असेल तर तुमच्या मोठेपणाच्या वल्गना फुकट होत रुपये, आणे आणि पै यावाचून दुसरे काहीच व्यवहार्य नाही काय ? असे असेल तर आपल्या समाजरचनेच्या उत्कृष्टपणाबद्दल फुकट घमेंड कशाला बाळगता ? ज्या समाजरचनेत उच्च तत्त्वे व्यवहार्य होऊ शकतात, तीच समाजरचना सर्वांस श्रेष्ठ होय ज्या समाजरचनेत ती व्यवहार्य होऊ शकत नाहीत ती समाजरचना मोडून तिच्या जागी नवी रचना जितक्या लवकर करावी तितके बरे असे माझे मत आहे भगिनीबंधूंनो, अशा कामासाठी धैर्याने पुढे या सत्य तत्त्वास अनुसरून वागण्याचें धैर्य तुमच्या आंगी वसूंद्या. अशा प्रकारच्या छातीच्या माणसाची जगास आज फार जरूरी आहे सत्यान्वेषणासाठी जें धैर्य लागते ते आंगी आणण्यासाठी खटपट करा तत्त्वास अनुसरून आचरण

करण्यासाठी जे धैर्य लागते ते मिळविण्याचा अट्टाहास करा मृत्यू आला तरी जे धैर्य ढळत नाही किंबहुना मृत्यूला जे आदरपूर्वक पाचारण करते असे धैर्य ज्याच्या आगी येईल त्यालाच 'मी चैतन्यमय आहें' असे ज्ञान होईल. 'साऱ्या विश्वात मला कोणी मारू शकत नाही' असे स्वानुभवाने तो म्हणेल, आणि मुक्ति त्याला माळ घालील. अशाच स्थितीत जीवात्म्याचे खरें स्वरूप तुम्हास समजेल. 'आत्म्यासबधी प्रथम ऐकून घ्या, मग त्यावर विचार करा व नतर त्याचेच ध्यान करा' असे श्रुतिवचन आहे.

अलीकडे कर्मयोगाची बोलबोला करून विचार-प्रवृत्तीचा उच्छेद करावयाचा अशी प्रवृत्ती मोठ्या जोराने वाढू पाहात आहे कर्तृत्ववान् व्हावें हे फार चागले आहे यात शका नाही, पण कर्मप्रवणता विचारावर अवलबून असते हेंही ध्यानात ठेवले पाहिजे चैतन्यशक्तीचे जे थोडेबहुत प्रकटीकरण स्नायूच्या द्वारें होत असते त्याला कर्म असे म्हणतात ज्या ठिकाणी विचाराचा अभाव आहे त्या ठिकाणी कार्याचाही अभावच होणार. याकरिता अत्युच्च विचारानी आपले मेदू प्रथम तुडुब भरून घ्या अत्युच्च साध्य तुमच्या नजरेसमोर असू द्या. अशा प्रकारचे विचार आणि अशा प्रकारचे साध्य ही तुमच्या नजरेसमोर रात्रदिवस खेळत राहिली म्हणजे त्यातून महत्कार्य निर्माण होईल आपण अपवित्र आहो, आपल्या हातून काय होणार असल्या प्रकारचे विचार डोक्यातून प्रथम हुसकावून लावा. आम्ही पवित्र आहों असे चिंतन नित्य करीत जा. आपण क्षुद्र आहो अशा प्रकारची भुरळ आपणच आपणास पाडून घेतली आहे आपण जन्मास आलो आहो आणि आपण आता मरणार असा भ्रम आपणच आपणास पाडून घेतला असल्यामुळे भीतीने आपण सदोदित कापत असतो.

एके वेळी एक गरोदर सिंहीण आपल्या भक्ष्याच्या शोधासाठी अरण्यात फिरत होती. समोरून मेढराचा एक थवा जात असलेला पाहून तिने त्या थव्यावर झाप घातली, पण, त्या गर्भिणीला हे श्रम सहन न होऊन प्राण तिच्या देहास सोडून गेले, व इतक्यात एक बच्चा तिच्या उदरातून बाहेर आला. तो सिंहाचा बच्चा त्या मेढरातच राहिला व त्याच्या सगतीनें तो गवत खाऊ लागला. तसेच तो बकऱ्यासारखें ओरडूही लागला. कालेंकरून तो वाढून मोठा झाला तरी आपण मेढरू आहो हा त्याचा भ्रम कायमच होता.

एके दिवशी एक सिंह भक्ष्याच्या शोधार्थ फिरता फिरता त्या मेंढराच्या कळपाजवळ आला त्या कळपात आपला एक जातभाई आहे व तो भिऊन पळत आहे असे पाहून त्या सिंहाला मोठें नवल वाटले त्या मेंढरातील सिंहाजवळ जाण्याचा यत्न त्या नव्या सिंहाने केला, पण, तो मेंढरातील सिंह भीतीने पळून जाऊन रानात दडून राहिला रानातील सिंहाने पाळत ठेवून अखेरीस त्या मेंढरातील सिंहास गाठले व त्यास म्हटले, 'अरे तू सिंह आहेस ' मेंढरातील सिंह म्हणाला, 'मी बकरा आहें ' असे म्हणून त्याने बकऱ्यासारखा ध्वनि काढला रानातील सिंहाने त्याला एका तळ्याच्या काठी नेले व तळ्याच्या काठाजवळ आपल्या शेजारीं त्याला उभे करून दोघाचेही पडलेले प्रतिबिंब त्यानें त्याला दाखविले व म्हटलें, 'इकडे पहा ही माझी पडच्छाया आणि तुझी पडच्छाया पहा ' मेंढरातील सिंहाने त्या दोन्ही पडच्छाया पाहून त्या दोहोंची परस्पराशी तुलना केली तेव्हा आपण सिंह आहो अशी त्याची क्षणार्धात खात्री झाली. त्याबरोबर त्याने प्रचंड गर्जना केली, त्याचा बे बे स्वर कोठें नष्ट झाला हे त्याला समजलेंही नाही तुम्ही असेच सिंह आहा तुम्ही चैतन्यमय आहा, तुम्ही पवित्र, अमर्याद आणि पूर्ण आहा साऱ्या विश्वाची शक्ति तुमच्या ठिकाणी एकवटून राहिली आहे अशा स्थितीत तुम्ही आर्तस्वर का काढावा ? तुम्हास जन्म नाही आणि मृत्यूही नाही मग तुम्ही का रडावें ? तुम्हांस रोगाचे भय नाही अथवा दु खाचेही भय नाही आकाशासारखा तुमचा विस्तार अनंत आहे. आकाशाच्या पृष्ठभागी नाना रंगाचे ढग येतात व जातात पण आकाशाची नीलिमा त्यामुळें लिप्त न होता सतत एकसारखीच राहते जगात दुष्टपणा भरला आहे असे आपणास का वाटते ? एका जागी एक लाकडाचा बुधका होता. एके दिवशी रात्री एक चोर त्या रस्त्याने चालला असता त्याला तो बुधका पाहून पोलीसचा शिपाई आहे असे वाटले. आपल्या प्रिय पात्राची वाट पाहाणाऱ्या एका तरुण पुरुषाला तोच बुधका स्त्रीसारखा दिसला. भुताच्या गोष्टी नित्य ऐकणाऱ्या एका मुलाला तोच बुधका भुतासारखा दिसून तो मुलगा मोठ्यानें ओरडू लागला त्या बुधक्याची इतकी स्वरूपे वारवार पालटली असतांही तो स्वत. जशाचा तसाच होता याच रीतीनें आपण जसे असतों तसे आपणास जग दिसत असते. एखादें तान्हे मूल एका

खोलीत पडून राहिले आहे असे समजा त्याच्या शेजारी असलेली एक सोन्याच्या नाण्याची थैली एक चोर घेऊन जात आहे अशी कल्पना करा अशा स्थितीत आत आलेला मनुष्य चोर आहे व तो सोने चोरीत आहे अशी कल्पना त्या तान्ह्याच्या मनात येईल काय ? त्याच्या मनात चोरीच्या कल्पनेला अद्याप वावच मिळालेला नसल्यामुळे बाह्य जगातही चोरी त्याला दिसत नाही आपल्या अतर्गत सृष्टीत जे काही अस्तित्वात असते तेच आपण बाह्य जगात पाहत असतो त्या तान्ह्याच्या अत सृष्टीत चोराचे अस्तित्व नसल्यामुळे बाह्य सृष्टीतही त्याला चोर दिसत नाही सर्व प्रकारच्या ज्ञानाची गोष्ट अशीच आहे याकरिता जग दुष्ट आणि पापी आहे अशी ओरड करणे मूर्खपणाचे आहे अद्यापिही जगात दुष्टपणाचे अस्तित्व आपणास दिसते याबद्दल मात्र तुम्हास वाईट वाटले पाहिजे याबद्दल तुम्ही अश्रू गाळले पाहिजेत जगात जिकडे तिकडे आपणास अद्यापिही पाप दिसून येते याबद्दल तुम्ही रडले पाहिजे जगात सुधारणा व्हावी म्हणून तुम्हास कोणास मदत करावयाची असेल तर जगाविरुद्ध कधीही बोटे मोडू नका अशाने ते अधिक भ्रष्ट मात्र होईल अशाने ते अधिक दुर्बळ होईल पाप आणि दु ख याचे तरी वास्तविक स्वरूप काय आहे ? दौर्बल्य हेच याचे शास्त्रीय रूप दौर्बल्यामुळे ही उत्पन्न झाली आहेत हल्लीच्या शिक्षणपद्धतीने दिवसेदिवस जग अधिक दुर्बळ मात्र होत चालले आहे " तुम्ही पापी आहा, भ्रष्ट आहा, दुर्बळ आहा " अशा प्रकारची भाषा लहानपणापासून एकसारखी कानावर आदळत असल्यामुळे लोक खरोखरच दुर्बळ होत चालले आहेत. ' तुम्ही अनताची उज्ज्वल स्वरूपाची मुले आहात असे लोकास शिकवीत चला. एखादा खरा दुबळा तुम्हास भेटला तरी त्यालासुद्धा तुम्ही हेच सागा काही तरी विधायक, बलवान् व अत शक्तीस प्रोत्साहन देतील अशा प्रकारचे विचार लहानपणापासून सर्वांच्या मनात पेरून द्या. अशा प्रकारचे विचार आपल्या चित्तात प्रवेश करतील अशा प्रकारची आपली मनोभूमिका तयार करा. अशा प्रकारच्या विचाराचा प्रवेश होण्यासाठी आपल्या अत करणाचे द्वार सदोदित खुले राखले पाहिजे चित्ताला दुबळेपणा येईल अशा प्रकारच्या कोणत्याही विचाराचा स्पर्शसुद्धा चित्तास होऊ देऊ नका. दुर्बळ विचाराच्या आघातानी चित्ताला पक्षाघात होत असतो याकरिता त्याचा स्पर्शसुद्धा

होणार नाही अशी खबरदारी घ्या 'सोऽहं सोऽहं' हा जप आपल्या मनाला नित्य शिकवीत जा "मी आणि परमेश्वर एकच आहो" हा घटानाद रात्रंदिवस तुमच्या कानात गुणगुणत राहिला पाहिजे हा देह सोडून जाण्याची वेळ येईल तेव्हासुद्धा सोऽहं हेच म्हणा सत्य ते हेच साऱ्या विश्वात दिसून येणारी अनंत शक्ति तुमच्या ठिकाणी आहे तुमच्या मनाभोवती पडलेले भ्रमाचे पाश झुगारून द्या शूर व्हा सत्य काय आहे हे जाणून घ्या, आणि त्याप्रमाणे आचरण करा आपले साध्य अद्यापि फार दूर असले तरी '**उत्तिष्ठत, जाग्रत प्राप्य वरान्निबोधत।**'

---

## ३

## माया आणि भ्रम

माया हा शब्द तुम्हापैकी बहुतेक साऱ्याच्या कानावरून गेला असेल. भ्रम वगैरे अर्थाच्या अनुरोधाने हा शब्द बहुधा वापरण्यात येत असतो, तथापि अशा अर्थी हा शब्द वापरणे बरोबर आहे असे नाही, पण ज्या अर्थी मायावाद हा वेदांताच्या आधारस्तंभापैकी एक आहे त्या अर्थी या वादाचे खरे रहस्य लक्षात असणे फार अगत्याचे आहे पुष्कळ वेळा या शब्दाचा भलभलता अर्थ करण्यात येत असतो असे माझ्या पाहण्यात आले आहे याकरता आपण लक्ष्यपूर्वक माझे भाषण ऐकून घ्यावे अशी माझी विनंति आहे श्रुतिग्रंथात माया या शब्दाचा उपयोग दृग्भ्रम या अर्थी केला आहे. माया या शब्दाचा हा अत्यंत पुरातन अर्थ होय, तथापि त्या काळी मायावादाच्या उपपत्तीचे पूर्ण उद्घाटन झालेले नव्हते 'इंद्राने मायेच्या योगेकरून अनेक रूपे धारण केली अशा अर्थाची वाक्ये श्रुतीत सापडतात" अशा प्रकारच्या वाक्यात माया या शब्दाचा उपयोग जादू या अर्थी केला आहे अशाच अर्थी या शब्दाचा उपयोग झाला असल्याची आणखीही उदाहरणे आहेत यानंतरच्या काळातील ग्रंथात या शब्दाचा उपयोग केला असल्याचे कोठेही आढळत नाही, तथापि या मध्यंतरीच्या काळात मायावाद अगदीच नष्ट झाला होता असें मात्र नाही हळू हळू तो शास्त्रीय रूप धारण

करीत होता यानतर 'या विश्वाचे रहस्य आम्ही का जाणू शकत नाही' असा प्रश्न उपस्थित झाला या प्रश्नाला त्या काळी जें उत्तर मिळालें ते विशेष ध्यानात ठेवण्यासारखे आहे "कारण, आपले सर्व श्रम फुकट होत आहेत इद्रियजन्य सुखाच्या मागे आपण लागलो आहो इद्रियाना तृप्त करणाऱ्या वस्तूच्या सान्निध्याने आपण तुष्ट होतों, आणि आपण आशेच्या मागें लागून पळत सुटतो यामुळे सत्य वस्तूभोवती एक प्रकारचे धूम्रावरण आपण निर्माण करीत असतो" असे उत्तर या प्रश्नाला मिळाले. या उत्तरात माया या शब्दाचा प्रत्यक्ष उपयोग कोठेही केलेला नाही, तथापि सत्य आणि आपली दृष्टि याच्यामध्ये जो धूम्रपट आला आहे तोच आपल्या अज्ञानाचे कारण आहे हा सिद्धात या उत्तरात स्पष्ट दिसून येतो यानतरच्या काळातील एका उपनिषद् ग्रथात माया या शब्दाचा पुन्हा उल्लेख आढळतो, पण यावेळी त्याचा पूर्वकाळचा अर्थ पार बदलून गेला असून आणखी नव्याच अर्थाचा अतर्भाव या शब्दाच्या पोटी होत असल्याचे आढळून येते. मध्यतरींच्या काळात अनेक उपपत्तीवर वादविवाद झाले व कित्येक जुन्या उपपत्तीस पुन्हा चालन मिळाले. याशिवाय आणखी नव्या उपपत्तीही पुढे आल्या अखेरीस माया हा शब्द वेदात साहित्यात कायमचा वतनदार होऊन बसला श्वेताश्वतर उपनिषदात पुढील अर्थाचे वाक्य आढळते 'प्रकृति ही माया आहे असे जाणा. आणि या मायेचा शास्ता प्रत्यक्ष परमेश्वर हाच होय' यानतरच्या काळी झालेल्या तत्त्ववेत्त्यांसबधी विचार करता त्यानी या शब्दावर अनेक प्रकारचे अर्थ बसविण्याचा यत्न केला असल्याचें आढळून येते अशा तत्त्ववेत्त्यात श्रीमत् शकराचार्य हे प्रमुख होत बुद्धानुयायानीही हा शब्द उपयोगात आणण्याची थोडीबहुत खटपट केली होती, पण माया म्हणजे कल्पनातरग असा अर्थ त्यानीं रूढ केल्यामुळें पुढेही तो शब्द त्याच अर्थी उपयोगात येऊ लागला माया म्हणजे कल्पनातरंग असाच अर्थ साप्रत बहुधा सर्वांच्या चित्तात बसून गेला आहे माया असा शब्द एखाद्या हिंदूनें उच्चारताच जग म्हणजे भ्रम असा अर्थ लोकांच्या मनात येतो. बौद्ध साहित्याच्या दृष्टीनें या अर्थाला काही आधार आहे. कारण, बाह्य जग म्हणजे निव्वळ भ्रमाचा खेळ असा अर्थ समजणारे कित्येक तत्त्ववेत्ते होऊन गेले. बाह्य जगाला वास्तविक अस्तित्वच नाही असे या तत्त्ववेत्त्याचें निश्चित मत होतें;

पण वेदातशास्त्राने माया या शब्दाचा जो अर्थ अखेरीस निश्चित केला आहे त्याप्रमाणें पाहाता माया ही नुसती उपपत्तीही नव्हे अथवा नुसती कल्पनावशताही नव्हे. आपण म्हणजे कोण व आपल्या भोवती दिसतें त्याचे वास्तविक स्वरूप काय, या प्रश्नाचे केवळ सरळ उत्तर माया या शब्दाने वेदात्यानी दिले आहे श्रुतिग्रथ ज्या चित्तातून उद्भवले ती चित्तें तत्त्वशोधनात गुतलीं होती व तत्त्वाचा अभ्यास करावा इतकाच त्याचा हेतू होता, हें पूर्वी एकवार मी आपणास सागितलेंच आहे. इतर बारीक सारीक आनुषगिक गोष्टीची जुळणी करण्यास त्यास अवकाशच नव्हता. आनुषगिक गोष्टीसाठी वाट पहात बसण्या इतकी फुरसतच त्यास नव्हती. एकदर वस्तुजातीचे हार्द अथवा मर्म काय आहे इतकेच त्यास पहावयाचे होते. दृश्य जगापलीकडे असलेली वस्तु जणु काय त्यास पाचारण करीत होती व तिला भेटण्यास ते आतुर झाले होते. ज्याना आपण अर्वाचीन शास्त्रें म्हणतों ती शास्त्रे म्हणजे या पराविद्येच्या आनुषगिक गोष्टी मात्र होत. अशा गोष्टी उपनिषद् ग्रथात इकडे तिकडे विखुरल्या असल्याचे आपणास आढळून येते. त्यात बऱ्याचशा चुकाही आढळतात, तथापि मुख्य तत्त्वात मात्र त्यानी केव्हाही चूक केलेली नाहीं. उदाहरणार्थ अर्वाचीन शास्त्रानी ईथर या पदार्थाचा शोध अगदीं अलीकडे लावला आहे. हाच शोध आमच्या प्राचीन साहित्यात अर्वाचीन शोधाहूनही अधिक स्पष्टपणे नमूद झाला असल्याचे आढळून येते, पण तेथेही तो शोध केवळ तात्त्विक दृष्टीचा दिसतो. तत्त्वाची उच्च भूमि सोडून या शोधाचा उपयोग प्रत्यक्ष सृष्टीत आमचे प्राचीन लोक करू लागले तेव्हा मात्र त्यानी अनेक चुका केल्या जीवतत्त्व हें विश्वव्यापी असून या विश्वातील सर्व जीवसृष्टि त्यापासूनच उद्भवली आहे, ही अर्वाचीन शास्त्राची उपपत्ति प्राचीन ब्राह्मण ग्रथात आढळून येते. प्राणतत्त्वाची ज्यात स्तुति आहे असें एक लाबलचक स्तोत्र सहितेत आहे. पृथ्वीवर जीवसृष्टि प्रथम कशी उत्पन्न झाली, यासंबधी अर्वाचीन युरोपीय शास्त्रज्ञ पडितानी ज्या उपपत्ति पुढें आणल्या आहेत, त्यांशी अगदीं जुळत्या अशा उपपत्ति श्रुतींत आढळतात, हें ऐकून तुम्हास खरोखर नवल वाटेल. येथील जीवसृष्टि दुसऱ्या काहीं ग्रहांवरून आली असावी अशी एक अर्वाचीन उपपत्ति तुम्हा सर्वांच्या कानावरून गेली असेलच. पृथ्वीवरील जीवसृष्टि चद्रावरून आली अशी उपपत्ति कित्येक श्रुतिग्रथानी निश्चितपणें सागितली आहे.

व्यापक आणि महत्वाच्या उपपत्ति सिद्ध करण्याच्या कामी या वेदकालीन तत्त्ववेत्त्यांनी मोठे मनोधैर्य दाखविले असून कोणाची भीडभाड न ठेवता आपली मते धीटपणे ते प्रदर्शित करीत असत, असे आपणास दिसून येते. बाह्य जगाचा अभ्यास करून त्याद्वारें या विश्वाच्या कोड्याचा उलगडा होणे जितके शक्य आहे, तितक्या प्रकारें त्यानीं तो उलगडा केला आहे अर्वाचीन शास्त्रानी प्रत्येक बारीक सारीक गोष्टीचा माग लावण्याचा यत्न केला हे खरे, तथापि त्यामुळें या कोड्याच्या उलगड्याचे काम अशत सुद्धा अधिक सुलभ झालेले नाहीं. कारण या कामात मूळ तत्त्वदृष्ट्याच त्याची चूक झालेली आहे आकाश अथवा ईथर हे अखेरचे तत्त्व प्राचीन काळच्या शास्त्रज्ञानीं शोधून काढले, पण यामुळें विश्वाच्या कोड्याचा उलगडा त्या काळी झाला नाही. त्याच आकाशाच्या अथवा ईथरच्या अगाचा आणि उपागाचा अधिक अभ्यास आजच्या शास्त्रज्ञानी केला तरी त्याचे फळ पूर्वीच्याहून अविक चागले कसें निपजणार ? पूर्वकाळी या कोड्याचे उत्तर देण्यात ज्या तत्त्वाचा उपयोग झाला नाही, त्याच तत्त्वाच्या अगाचा आणि उपागाचा अधिक उपयोग सध्या तरी कसा होणार ? अगाच्या आणि उपागाच्या अभ्यासाने मूळ तत्त्वाच्या रूपात काही फेरपड तो काय ? मूळ तत्त्व ज्या अर्थी तसेच राहते, त्या अर्थी त्याच्या अगोपागाचा त्याहून अधिक उपयोग होणे शक्य नाहीं या बाबीत मूळ तत्त्वाचा शोध लावण्याच्या कामी हिंदू तत्त्ववेत्ते साप्रतच्या शास्त्रज्ञाच्या इतकेच धीट होते; एवढेच नव्हे तर कित्येक प्रसगी त्यानी अधिक धीटपणाही दर्शविला आहे आजपर्यंत अर्वाचीन शास्त्रज्ञांनी सिद्ध न केलेले असे सिद्धात त्यानी पूर्वीच सिद्ध करून ठेविले आहेत. त्याची दुसरी कित्येक मते अद्यापि सिद्धात या पदवीस पोचलीं नसून त्या उपपत्ति मात्र आहेत, पण या उपपत्तीचे स्वप्नसुद्धा पाश्चात्य शास्त्रज्ञास अद्यापि पडलेलें नाहीं. उदाहरणार्थ ईथर अथवा आकाश हे तत्त्व शोधून काढूनच स्वस्थ न बसता मनाचे पृथक्करण करून मन हे विरलतर आकाशरूप आहे असें त्यानीं सिद्ध केले. यानतर मनापलीकडे जाऊन त्याहूनही अधिक विरल अशा आकाशरूपाचा शोध त्यानीं लाविला; पण इतके झालें तरी विश्वाचे मूळ कोडें जसेच्या तसेच राहिले. एवढ्या प्रचड शोधानींही या मूळ कोड्याचें उत्तर दिले नाही बाह्य सृष्टीचे ज्ञान तुम्हीं कितीही सपादन केलें तरी या कोड्याचे उत्तर मिळणें शक्य नाहीं.

यावर अर्वाचीन शास्त्रज्ञ असें म्हणतील कीं, ‘ आम्हास बाह्यसृष्टीचे थोडेसे ज्ञान नुकतेच होऊ लागले आहे. आणखी काही हजार वर्षें गेल्यावर या कोड्याचे उत्तर देण्याचे ज्ञानही आम्हास प्राप्त होईल. ’ यावर वेदाती उत्तर देतो ‘ ही गोष्ट कधीच शक्य नाही. ’ कारण, मन हे बद्ध असून काहो विशिष्ट मर्यादेपलीकडे ते जाऊ शकत नाही, ही गोष्ट वेदांत्यानी नि सशय सिद्ध केलेली आहे. काल, देश आणि निमित्त याची उपाधी मन उल्लघू शकत नाही, असा वेदात्याचा ठाम सिद्धात आहे ज्याप्रमाणे मनुष्याला स्वत च्या देहाबाहेर उडी मारवत नाही त्याचप्रमाणे काल आणि देश यानी निर्माण केलेल्या कायद्यानीं जे बधन मनुष्यास घातलें आहे ते त्याच्याने उल्लघवत नाही निमित्त, काल आणि देश याच्या कायद्याची घटना कशी झाली हे पाहण्याचा यत्न करणें निष्फळ होईल, कारण, देश, काल आणि निमित्त या त्रयीचे अस्तित्व गृहीत केल्यावांचून असा यत्न करणेंही शक्य नाही ‘ या जगाला अस्तित्व आहे ’ या विधानाचा अर्थ तरी काय ? याचा अर्थ इतकाच की या विश्वाला निरपेक्ष अथवा केवल रूपाचे अस्तित्व नाही. तुमच्या अथवा माझ्या मनाच्या अपेक्षेनें मात्र त्याला अस्तित्व आहे. आपल्या पचेद्रियाच्या द्वाराने या विश्वाचा अनुभव आपणास होतो, पण आपणास आणखी एखादें सहावे इद्रिय असते तर या विश्वाचे रूप आपणास आणखी काही निराळेच दिसले असते ज्या इद्रियाच्या द्वारें विश्वानुभव घेऊन आपण त्याचे रूप अमुक आहे असें म्हणतो, त्या पचेद्रियात आणखी दोन तीन इद्रियाची भर पडली असती, तर विश्वाचे रूप साप्रतच्या रूपाहून आपणास आणखी काही निराळयाच प्रकारचें दिसलें असते. यावरून विश्वाला एकच ठरींव अथवा निश्चित रूप नाहीं असें सिद्ध होते; आणि विश्वाला ज्या अर्थी निश्चित रूप नाही, त्या अर्थी ते सद्रूप नव्हे हेंही सिद्ध होते. कधीही न बदलणारे आणि अनत असे रूप विश्वाला नाही. त्याचप्रमाणे त्याला मुळीच अस्तित्व नाही असे म्हणणेही शक्य नाही. कारण त्याला अस्तित्व आहे असा प्रत्यक्ष अनुभव आपणास होतो. हा आपला चालू अनुभव जमेम धरूनच पुढील मार्ग आपणास आक्रमावयाचा आहे. आहे आणि नाही अशा मिश्र स्वरूपाचे हे अस्तित्व आहे

आतां या विषयाचीही परोक्ष अथवा तात्त्रिक बाजू सोडून देऊन त्याच्या प्रत्यक्ष अथवा व्यावहारिक स्वरूपाकडे आपण वळलों, तर आपलें सारे

जीवित अस्तित्व आणि नास्तित्व अशा परस्पर विरोधानें भरलें असल्याचे आपणास आढळून येईल ज्ञानासबधीसुद्धा असाच विरोध आढळून येतो. मनुष्याला पाहिजे त्या वस्तूचे ज्ञान करून घेता येईल असें आरंभी भासते. फक्त त्याची इच्छा मात्र पाहिजे, म्हणजे हवें ते ज्ञान त्याला प्राप्त होईल, असें आपणास वाटत असते, पण ज्ञानसोपानाच्या थोड्याशा पायऱ्या तो चढून गेला नाहीं तोंच वज्रप्राय कठीण अशी भिंत आपल्या मार्गांत आडवी आली असल्याचे त्यास आढळून येतें ही भिंत त्याच्यानें उल्लघन करवत नाही एका विशिष्ट वर्तुळाच्या परिघातच आपली सारी धडपड असून या वर्तुळापलीकडे आपणास जाता येत नाहीं असे त्यास दिसून येते. त्याला स्वतःला अत्यत प्रिय व अत्यत जरूरीचीं अशी काहीं कोडीं असतात त्याचीं उत्तरें मिळविणे अत्यत आवश्यक आहे असे त्यास वाटत असते. ही उत्तरें मिळविण्यासाठी रात्रदिवस तो धडपडत असतो, पण ती उत्तरे त्याला मिळत नाहीत, कारण बुद्धीनें घालून दिलेल्या मर्यादेचे उल्लघन त्याला करवत नाही. असे असताही ही उत्तरें मिळविण्याची इच्छा त्याच्या हृदयात इतकी दृढमूल होऊन बसली आहे की ती त्याला स्वस्थ बसू देत नाही तथापि अशा प्रकारच्या इच्छेचे नियत्रण करून तिला दाबात ठेवण्यानेच तो सुखी होईल हे आपणास ठाऊक आहे आपल्या हृदयाच्या प्रत्येक ठोक्याबरोबर व आपल्या प्रत्येक श्वासोच्छ्वासाबरोबर स्वार्थाची इच्छा आपल्या हृदयात उद्भवत असते, पण असे असताही स्वार्थत्यागाच्या मार्गानेच आपलें कल्याण होईल असाही एक सदेश आपल्या कर्णसपुटात गुणगुणत असतो. जन्मत प्रत्येक मूल आशावादी असते. त्याला भावी सुखाची स्वप्नें पडत असतात. त्या मुलाचा तरुण पुरुष झाला म्हणजे तो अधिकच आशावादी बनतो. आपल्यावर कधींकाळीं तरी मृत्यु झडप घालील असें त्याच्या ध्यानींमनीही येत नाहीं. आपल्या आशेला कोठें तरी धक्का बसेल अथवा आपल्या पायरीवरून आपणास केव्हां तरी खालीं उतरावे लागेल असें त्यास चुकूनसुद्धा कधी वाटत नाहीं. कालेंकरून त्याला वृद्धत्व प्राप्त होतें, त्या वेळीं हे सारे जीवित म्हणजे मोडक्या तोडक्या वस्तूचा बाजार भरला आहे असे त्यास दिसून येते. त्याचीं सुखमय स्वप्नें हवेंतच विरून गेल्यामुळें तो निराशामय बनतो. अशा रीतीनें अत्यत पूर्ण अशा स्वरूपाच्या आशावादापासून निघून अखेरीस तो

दुसरे टोंक गांठतो व पूर्ण निराशावादी बनतो त्याच्या साऱ्या आयुष्यक्रमात प्रकृतीचे तडाखे त्याने खाल्लेले असतात अखेरीस आपण कोठे पोंचणार याची कल्पनासुद्धां न होता सस्तृतीच्या ओघाबरोबर यदृच्छेने कोणीकडे तरी तो वाहत असतो. ललितविस्तार या नावाचे एक बुद्धचरित आहे. त्यातील एका भागाची आठवण मला येथे होते. बुद्धाचा जन्म राजवाड्यात झाला होता. वास्तविक तो मनुष्यज्ञातीचा मार्गदर्शक असता राजवाड्यातील सुखोपभोगात आपले कर्तव्य विसरून गेला होता. पुढे काही देवदूत आले व त्याला जागृत करण्याकरिता त्यानी काही गाणीं गाइली, या साऱ्या गाण्यातील मुख्य मुद्दा इतकाच की आपण या जीवितनदीच्या ओघाबरोबर वाहत जात आहो व या ओघात मुक्काम करण्याजोगी एकही जागा अथवा विश्रांतीचे एकही स्थळ नाहीं. ज्याना खाण्यापिण्यास भरपूर मिळते अशी माणसे आशावादी असतात दु खाचे कोणीं नाव काढलेलेसुद्धा त्यास खपत नाही, कारण अशा प्रकारचे दु.ख आपणासही प्राप्त होईल की काय अशी भीति त्याना वाटते. जगात अनेक प्रकारचीं दु खें भरली आहेत असे ऐकण्याचे त्याच्या जीवावर येते. जग म्हणजे सुखाचे आगर आहे असे शब्द ऐकण्याने त्यास सतोष होतो. ‘ मला राहण्याला सुदर घर आहे, शीतोष्णाची अथवा भुकेची बाधा होण्याचा सभव मला नाही; याकरिता जगातील दु खाची भेसूर चित्रें मला दाखवू नका ’ असे हीं माणसे म्हणत असतात, पण अशी भाषा बोलणारे काही लोक असले तरी उलटपक्षीं भुकेने आणि थडीने मरणारे लोकही जगात कमी नाहीत. अशा लोकाना जगात सुख भरले आहे असे तुम्ही सागितले तर तुमच्या म्हणण्यावर ते कधीही विश्वास ठेवणार नाहीत. स्वतः दु ख भोगीत असता इतरानीं सुखी असावे अशी इच्छा तरी त्यास कशी होईल ? अशा रीतीने आशा आणि निराशा याच्या द्वद्वात आपण नित्य हेलकावे खात असतों.

यानतर या जगात मृत्यूची व्याप्ति सर्वत्र भरली आहे हे कोणासही नाकारता येणार नाही. सर्व जग मृत्यूकडे धाव घेत आहे. प्रत्येक वस्तूला मृत्यु आहे. आपली सर्व सुधारणा, आपल्या साऱ्या चैनीच्या वस्तू, आपली संपत्ति, आपलें ज्ञान इत्यादि सर्व वस्तूना एकच शेवट आहे, तो शेवट म्हणजे मृत्यु. जगांत काहीं निर्भेळ सत्य असेल तर ते हेंच. मोठमोठी शहरे

उत्पन्न होतात आणि काळाच्या पोटात जातात, प्रचड साम्राज्ये उदय पावतात आणि अस्तगत होतात, आकाशातील ताऱ्याचे तुकडे होऊन अखेरीस त्याची धूळ होते व ही धूळ दुसऱ्या ताऱ्याच्या वातावरणांत मिसळून जाते. अशा रीतीने हे विश्वचक्र चालू आहे. हे केव्हा चालू झालें हे कोणासही ठाऊक नाही. प्रत्येक वस्तूची अखेर मृत्यूत होते. जगांतील जीवनक्रमाची, सर्व सौदर्याची, सपत्तीची, सत्तेची आणि सद्गुणांचीही अखेर मृत्यूत होते. पापी लोक मरतात तसेच साधुसतही मृत्युवश होतात भिकाऱ्याना जसा काळ भक्षण करितो तसाच राजानाही करतो. अशा रीतीनें सर्व जग मृत्यूकडे धाव घेत असताही या जीविताला चिकटून बसावे ही इच्छा कोणालाही सुटलेली नाही. काही झाले तरी मरू नये असे प्रत्येकाला वाटते. आपल्या जीविताला इतकी घट्ट मिठी मारण्याची इच्छा आपणास का आहे हे ठाऊक नाहीं, पण ती आहे हे मात्र खरें या इच्छेचा त्याग आपणास करवत नाही. माया म्हणतात ती हीच

एखादी माता आपल्या मुलाचे मोठ्या काळजीने सगोपन करीत असते. तिचा सारा जीव—तिचा आत्मा त्या मुलात गुतून गेलेला असतो कालेकरून ते मूल मोठे होते त्या मुलाचा पुरुष होतो. प्रसगी तो चोऱ्या करू लागतो व दरोडेही घालतो. त्याचे आचरण केव्हां पशुवतही होत असते ज्या मातेने त्याचे लालनपालन केले, त्याच मातेच्या उपकाराची फेड लाथा बुक्क्यानी तो करतो आणि अशा स्थितीतही तिचा जीव त्या पोराकडे गुतलेला असतो. एखादे वेळी तिची विवेकबुद्धि जागृत झालीच तर प्रेमाच्या कल्पनेच्या पाघरुणाने तिला ती दडपून टाकते आपले हे खरें प्रेम नव्हे ही गोष्ट तिच्या लक्षात येत नाहीं. हा एक खोटा पाश आपणास जखडून टाकीत आहे असें तिच्या मनात येत नाही तिने कितीही खटपट केली तरी तिला हा पाश झुगारून देववत नाही. याचे नाव माया

आपण सारे लक्ष्मीच्या मागे धावत आहों. केव्हातरी ती आपणास वश होईल असें प्रत्येकास वाटते. वास्तविक पाहता सपत्ती प्राप्त होण्याचा सभव प्रत्येकाला अगदी थोडाच असतो, हें कोणाही सामान्य विवेकबुद्धीच्या माणसाच्या ध्यानात येण्याजोगें आहे. असे असताही प्रत्येकजण पैशाच्या प्राप्तीसाठीं एकसारखा धडपडत असतो. याचे नांव माया

या पृथ्वीवर मृत्यूचे साम्राज्य अव्याहतपणें चालू आहे हे नित्य पाहत असताही आपण अमर आहों असें आपणास वाटते राजा युधिष्ठिराला यक्षाने एक असा प्रश्न केला कीं, ' या जगात सर्वांत मोठे आश्चर्य कोणते ?' या प्रश्नाला राजानें उत्तर दिलें, ' माणसे मरतात ही गोष्ट आपण प्रत्यही पाहत असताही आपण अमर आहों असे आपणास वाटते हे सर्वात मोठे आश्चर्य आहे. ' माया म्हणतात ती हीच

आपल्या बुद्धीत, आपल्या ज्ञानात, किंबहुना आपल्या साऱ्या आयुष्यक्रमात असेच परस्परविरोधी प्रकार भरले आहेत जिकडे पहावे तिकडे अशा प्रकारच्या परस्परविरोधी वस्तू भरून राहिलेल्या दिसतात. एखाद्या देशात एखादा सुधारक समाजातील व्यगे नाहीशी करावी म्हणून धडपड करू लागतो, पण अशी व्यगे नाहीशी होण्याऐवजी दुसरीच व्यगे नवी उपस्थित होतात घर जुने होऊन मोडकळीस आले कीं जिकडे तिकडे पडझड होण्यास सुरवात होते एका जागी भिंतीला गिलावा करावा आणि तो वाळण्यापूर्वीच दुसऱ्या जागी एखादी तुळई खाली येते. तोच न्याय समाजालाही लागू आहे. आमच्या हिदुस्थानातील सुधारक असमत वैधव्याविरुद्ध आरडाओरड करून आकाशपाताळ एक करीत असतात पाश्चात्य देशात पुष्कळ स्त्रिया जन्मभर कुमारिकाच राहातात याला काय उपाय योजावा, ही काळजी तिकडच्या सुधारकास पडली आहे. तिकडच्या दु खी कुमारिकास साहाय्य हवे तर आमच्या इकडे विधवाचे क्लेश कमी करणारा कोणी तरी हवा. जुनाट सधिवात एका साध्यातून हुसकावला की, तेथून दुसऱ्या साध्यात बिऱ्हाड करतो, त्याचप्रमाणे दु खाचा रोग जगाच्या एका भागातून हुसकावला की तो दुसरीकडे जाऊन राहातो सस्कृति, विद्या आणि सपत्ति ही देशातल्या एखाद्या लहानशा विशिष्ट वर्गाच्या हाती राहू नयेत या इच्छेने एखादा सुधारक उठतो आणि चळवळ करू लागतो याचा लाभ सामान्य जनसमूहास व्हावा यासाठी तो मनापासून उद्योग करीत असतो; त्याच्या खटपटीनें या वस्तूचा लाभ होऊन थोडेफार लोक अधिक सुखी होतात, पण सस्कृतीबरोबर शारीरसुखाला ओहोटी लागते. सुखाची प्राप्ति कशी होईल याचे ज्ञान झाले म्हणजे आपल्या उणीवाची जाणीवही अधिक उग्र होऊन दुःख होऊ लागते. सुखाची स्पष्ट कल्पना नव्हती तोपर्यंत

दु.खही जाणवत नव्हते; पण सुखाची कल्पना आल्याबरोबर दु ख जाणवूं लागलें. अशा स्थितीत आम्ही करावे तरी काय ? ऐहिक सुखाचा जेवढा अश आपण येथे भोगावा तितक्याच अशाने दुसरीकडे दु ख उत्पन्न होते, हा चिरंतन कायदा आहे तरुणपणामुळें ज्यास जगाचा अनुभव कमी व ज्यानी टके टोणपे फारसे खाल्ले नाहीत त्यास कदाचित् हे खरे वाटणार नाही; पण ज्यानी या जगात चार पावसाळे अधिक काढले आहेत व बरीच धडपड केली आहे, त्यांस या कायद्याचे अस्तित्व ताबडतोब पटेल. माया म्हणतात ती हीच. ही परिस्थिति अनत कालापासून अशीच चालत आली आहे. रात्र असो की दिवस असो, तिच्यात फरक म्हणून पडत नाही, व या कोड्याचा उलगडा करण्याचा यत्नही व्यर्थ आहे. याचा उलगडा कधीं व्हावयाचाच नाही. असे का असावे ? याचा उलगडा करणे अशक्य का असावे ? या प्रश्नाचे उत्तर हेच की, न्याय्यदृष्ट्या हा प्रश्नच सभवत नाही. वस्तुत 'का' आणि 'कसे' हे प्रश्नच चुकीचे आहेत. जेथे प्रश्नच नाही तेथे उत्तर तरी कोठून असणार ? वस्तुस्थिति अशी आहे आणि तिच्यात बदल करण्याचे सामर्थ्य आपणास नाहीं एवढे मात्र खरे. या वस्तुस्थितीचे यथातथ्य चित्र आपल्या मन पटावर रंगविणेही आपणास अशक्य आहे. तिचे नुसते आकलन करणेही कठीण आहे. अशा स्थितीत ती सुधारण्याचे उपाय तरी काय योजावे ?

विश्व म्हणजे अमुक असे जें काहीं आपल्या अनुभवास येते ती माया. विश्व अमुक रीतीनें चालते असे सागणें हीच मायेची व्याख्या. अशा गोष्टी ऐकून पुष्कळ लोक घाबरून जातात. वस्तुस्थिति अशी आहे असें ऐकण्यापुरतेसुद्धां धैर्य पुष्कळाजवळ नसते. पण असा भेकडपणा आपल्या उपयोगीं पडणार नाही. आपण धैर्य धरले पाहिजे. आपण डोळे मिटले म्हणून आपला बडगा चुकतो असे नाहीं; वस्तुस्थिति लपविल्यानें दुःखनिवारणाचा उपाय सांपडावयाचा नाहीं. शिकारी कुत्र्यानीं सशाचा पाठलाग केला म्हणजे तो आपलें तोड जमिनींत खुपसतो. कुत्रे त्याला दिसेनासे झाल्यामुळें कुत्र्यासही आपण दिसत नाहीं अशा भ्रमानें तो स्वत.स सुरक्षित समजत असतो त्याचप्रमाणे वस्तुस्थिति चित्ताआड करून आपण आपल्या चित्ताला उल्लसित करीत असतो. आपली ही कृति त्या

सशाच्या कृतीसारखीच आहे, तीमुळे आपण खरोखर निर्भय होत नाही या मतावर आक्षेप घेणारेही पुष्कळ आढळतात, पण ऐहिक सुखाचा बराच अश ज्याच्या पदरात पडला आहे असेच लोक या आक्षेपकात असतात हे ध्यानात ठेवण्यासारखें आहे. या तुमच्या देशात ( इग्लडात ) नैराश्यवादी होणें हे मोठे बिकट काम आहे हे जग कसे सुरळीत चालत असून त्याचे पाऊल दिवसेदिवस कसे पुढे पडत आहे याचे सरभरित वर्णन प्रत्येकजण मजपाशी करीत असतो. पण ज्या जगाचे वर्णन तो करितो ते त्याचे जग असते. जगांतील अनेक वस्तुस्थितींचे पर्यालोचन करून तो बोलत नसतो. जगाच्या जेवढ्या भागात तो वावरत असतो, तेवढ्याचेच ते वर्णन असते. ख्रिस्ती धर्म हाच सर्व धर्मात श्रेष्ठ असला पाहिजे हे फार जुने मत आहे. कारण ख्रिस्ती राष्ट्रेच आज भरभराटीत आहेत यामुळे तोच धर्म श्रेष्ठ आहे अशी त्याची समजूत झालेली आहे पण या भरभराटीमुळे दुसरीकडे अधोगति उत्पन्न झालेली नाही काय ? दुसऱ्याच्या अध पतनाच्या पायावरच या भरभराटीची उभारणी झालेली नाही काय ? सोम्या नागवला आणि गोम्या उजवला. दुसऱ्या कोणाच्या तरी तोडचा घास काढावा तेव्हा तो आपल्या तोडी पडतो बिनख्रिस्ती राष्ट्रावर चरून ख्रिस्ती राष्ट्रे पुष्ट झाली आहेत. आता अशी कल्पना करा कीं उद्याच सारे जग ख्रिस्ती झाले, अशा स्थितीत साप्रतची ख्रिस्ती राष्ट्रे रोडावणार नाहीत काय ? कारण त्यास चरावयास कुरणच उरणार नाही. ख्रिस्ती धर्मामुळे भरभराट होते हा सिद्धात मुळातच चुकीचा आहे हे आता निराळे सागणे नकोच. जिवत प्राणी वनस्पती खाऊन जगतात. चतुष्पादाना खाऊन माणसे चरितार्थ चालवितात आणि बलिष्ठ माणसे दुर्बळावर आपले स्वामित्व गाजवून सुखी होत असतात. साऱ्या जगात हाच प्रकार चालू आहे आणि याचेच नाव माया.

असा प्रकार का घडावा याचे काहीं उत्तर तुम्हास देता येते काय ? अनेकांच्या तोडून अनेक प्रकारचीं उत्तरें रोज आपल्या कानीं येत असतात. अखेरीस सर्वत्र समतेचें व न्यायाचे साम्राज्य होईल असेही कोणी म्हणतात. अखेरीस सारें चांगलेंच होणार आहे असेही क्षणभर गृहीत धरलें तरी ते साधण्याचे मार्ग असे दुष्टपणाचे का असावे ? चागल्या व सरळ मार्गाने चागले कां करता येऊ नये ? आम्हा साप्रतच्या मनुष्याचे भावी वशज पुढे

कदाचित् सुखी होतील, पण आज आम्ही इतक्या दु खात का राहावे ? या प्रश्नाला काही उत्तर देता येत नाही याला उत्तरच नाहीं. याचें नाव माया.

आता काहीं अर्वाचीन पडिताच्या आणखीही एका मताचा विचार करणे आपणास अवश्य आहे. मानवी समाज उत्क्रमणावस्थेत असता त्यातील वाईट प्रकार नाहीसे होत जाणे हा उत्क्रातिशास्त्राचा नियमच आहे व तद्-नुसार सर्व वाइटाचा अखेरीस लय होऊन अखेरीस निर्भेळ चागले मात्र शिल्लक उरेल असे हे पडित म्हणतात. हे मत कानाला मोठें मधुर लागते आणि ज्याचे ऐहिक स्वस्तिक्षेम सुखाने चालले आहे त्याच्या दिमाखाला ते शोभण्यासारखेंही आहे यात शका नाहीं उत्क्रातीच्या सोज्ज्वल नावा-खालीं जें जाते, लक्षावधि लोकास आज भरडून काढीत आहे त्याच्या तळी-खाली सापडण्याचा प्रसग ज्याच्यावर येऊन बेतला नसेल व पोटाची खळगी भरण्यासाठी ज्यास रोज लढाया कराव्या लागत नसतील ते लोक या मताला खास मान तुकावतील हे मत अशा लोकानीं जवळ बाळगले म्हणजे जगा-तील दुष्ट प्रकारानी आपली झोपमोड करून घेण्याचे कारण त्यास नाही. हजारो गोरगरिबे या उत्क्रातीच्या चक्राखाली चुरडली गेली तरी त्याची त्यास काय पर्वा आहे ? लक्षावधि दुर्दैव्यानी प्राण सोडले म्हणून त्यास वाईट वाटण्याचे कारणच नाही, कारण त्याच्या उत्क्रातिशास्त्राप्रमाणे असे व्हावयाचेच. असो, याचेही म्हणणे कबूल करून ते विवेचक बुद्धीच्या कसो-टीस लावले तर अथपासून इतिपर्यंत ते हिणकस आहे असें दिसून येईल. चागले आणि वाईट असे जे दोन प्रकार जगात आढळून येतात, ते दोन्ही सत्यरूप आहेत असे हे लोक प्रथम गृहीत धरीत असतात हे ध्यानात ठेवण्या-सारखें आहे. चागल्याचे प्रमाण दिवसेदिवस वाढत आहे व वाइटाचे कमी होत आहे असेही ते गृहीत धरीत असतात. ही दोन्ही प्रतिपादने चुकीची आहेत. वाईटाचे प्रमाण दिवसेंदिवस कमी होत आहे हें खरें मानले तर अखेरीस केव्हातरी निर्भेळ चागलें शिल्लक उरेल, हे मत बोलण्यास फार सोपें आहे, पण वाईट कमी होत आहे ही गोष्ट पुराव्यानें सिद्ध होत आहे काय ? उदाहरणार्थ –एखादा मनुष्य अरण्यात रहात आहे. त्याला कोणत्याही प्रका-रचे मानसिक शिक्षण मिळालेले नाही लिहिण्यावाचण्याचें नावही त्याच्या काना-वरून गेलेलें नाही अशा मनुष्याला एखादी जबर जखम झाली तरी ती लवकर

बरी होते आणि आमच्या सुसंस्कृताला एखाद्या ओरखड्यानेंही मरणाची पाळी येते. हजारों वस्तू यंत्रे अल्प किमतींत निर्माण करतात, आणि अशा रीतीने उत्क्रांतीला व सुधारणेला ती मदत करीत असतात, पण या यांत्रिक युगात एका मनुष्याला लक्ष्मीपुत्र बनविण्याकरिता लक्षावधि लोकास आपले प्राण वेचावे लागतात याची वाट काय ? हजारो-लाखों लोक एका बाजूनें अन्नान्न दशेस येत असतात आणि तिकडे एकच मनुष्य संपत्तीत लोळत असतो. लक्षावधि गुलामांच्या पदवीस जात असतात आणि एकच त्याचे धनीपण बळकावू पाहतो. ही विषमता आज जिकडे तिकडे चालू आहे जो देहाने मनुष्य आणि मनाने पशु असतो त्याचे सारे जीवित त्याच्या इंद्रियात एकवटलेलें असते. त्याला पुरेसें खाण्यास न मिळाले अथवा त्याच्या शरिराला कोठे इजा झाली तर ताबडतोब त्याची मिजास बिघडते त्याचा आनंद आणि त्याचे दु:ख हीं दोन्ही त्याच्या इंद्रियाच्या स्वाधीन असतात इंद्रियाचा संतोष तोच त्याचा आनंद आणि इंद्रियाचे दु ख तेच त्याचे दु ख. अशा मनुष्याची उत्क्रांति होऊ लागली व त्याचे सुखाचे क्षेत्र विस्तृत होऊ लागले म्हणजे त्याबरोबरच दुःखाचे क्षेत्रही त्याच प्रमाणावर वाढत जाते अरण्यवासी मनुष्याला परोत्कर्षासहिष्णुता अथवा मत्सर याचे वारेही नसते कोर्टांत जाऊन फिर्यादी लावणे त्याला ठाऊक नसते कर म्हणजे काय व ते का द्यावे याची माहिती त्याला नसते. समाजाकडून कोणत्याही प्रसंगी त्रास होतो याची जाणीव त्याला नसते लोकाच्या उणिवा पाहण्यासाठी डोळ्यात तेल घालून बसणाऱ्या व लोकास सदोदित छळणाऱ्या समाजरचनेची माहिती त्याला नसते. इतर कोणाही जिवंत प्राण्याला मनुष्यप्राणी आपल्या क्रूरतेने कशी लाज आणितो, हें त्याला कळत नसते आपल्या फुकट्या बडेजावीने व निर्माल्यवत् ज्ञानाने मनुष्यप्राणी हजारों लोकास कसे सळो का पळो करून सोडतो, हे त्यास ठाऊक नसते.

आपल्या इंद्रियाच्या जाळ्यातून जो जो आपण अधिक बाहेर निघतों, तो तों सुखोपभोगाची आपली पात्रता वाढत जाते, पण त्याच वेळी आपली दुःखाची जाणीवही वाढते. आपले ज्ञानतंतु अधिक सूक्ष्म झाले म्हणजे त्यांची कार्यक्षमता वाढून ते थोड्याशा सुखदु:खानेंही हेलकावे खातात. एखाद्या अडाणी मनुष्याला कोणी चार शिव्या दिल्या तर त्याची फारशी

किंमत त्याला वाटत नाहीं, पण तेच त्याला एखादा चाबकाचा फटकारा अधिक जाणवतो. प्रत्येक समाजात अशीं किती तरी माणसे असतात मानसिक दु·खापेक्षा शारीरिक दु ख त्यांना अधिक जाणवते. पण त्याच समाजातील ज्या माणसाला मानसिक शिक्षण मिळालेलें असते व जो ' सभ्य ' या नावाला पात्र झालेला असतो त्याला एखादा वांकडा शब्दही सहन होत नाहीं सूक्ष्म आनदाचे ग्रहण करण्याचे त्याचे सामर्थ्य जसें वाढलेले असते, त्याचप्रमाणें सूक्ष्म दु ख जाणण्याचे सामर्थ्यही वाढलेले असतें सुदर कवित्वाचा परिणाम एखाद्या अडाण्याच्या चित्तावर मुळींच होणार नाही उलटपक्षी सभ्य गृहस्थाचे मन एखाद्या सुदर कल्पनेने आनदात पोहू लागेल. दोघाच्या ज्ञानततूच्या कार्यक्षमतेत जो फरक असतो, तोच या भिन्नावस्थेचे कारण होय. त्याचप्रमाणें अडाण्याला शाब्दिक मार फारसा न जाणता सभ्याला एखादा शब्दही जिव्हारी झोंबतो यामुळे सभ्याचे आनदाचे क्षेत्र जसे विस्तृत त्याचप्रमाणें त्याचे दुःखाचे क्षेत्रही विस्तृत असते. यावरून उत्क्रातिवाद्याच्या मतात फारसे तथ्य नाहीं असे दिसून येईल सुख वाटत असून दु ख कमी होत आहे हे त्याचे मत कसे फोल आहे हे यावरून ध्यानी येईल. सुख जाणण्याचे आपले सामर्थ्य जो जो वाढत जाते, तों तो त्याच प्रमाणाने दु खही अधिक जाणवू लागते. कित्येक वेळा तर मला असेंही वाटते की, सुख जाणण्याचे सामर्थ्य आपण एकपट वाढविले तर दुःख जाणण्याचे आपले सामर्थ्य दसपट अधिक वाढते जों जों आपली अधिक सुधारणा होत आहे, तो तो सुखाचे आणि दु खाचे असे दोन्ही मार्ग अधिक निर्माण होत आहेत. हीच माया.

जग निर्माण कसे झालें अथवा का झाले इत्यादि प्रश्नाची उत्तरें देण्याकरिता मायावादाची उत्पत्ति झालेली नाहीं. माया ही उपपत्ति नसून जगाचे खरें स्वरूप तुम्हास सागणे हे मायेचे कार्य आहे. गोष्टी जशा प्रत्यक्ष घडतात तशाच त्या ती तुम्हास सागते. आपल्या साऱ्या जीवनक्रमाचा पायाच परस्परविरोधी गोष्टींनीं तयार झालेला आहे, असे माया तुम्हास सागते. ज्या ठिकाणीं काही चागलें म्हणून तुम्हास आढळते, तेथे वाईटही अवश्यमेव असून वाईट देखाव्याच्या पोटीं काहीं चागलेही अवश्य असलें पाहिजे असें माया सागते. अशा प्रकारच्या प्रचड परस्परविरोधी स्थितीत आपणास

आपलें सारे आयुष्य काढावयाचें आहे असे मायेचे सागणें आहे ज्या ठिकाणी जीवित आहे तेथे मृत्यूही अवश्य आहेच. जो हसतो त्याला कधी तरी रडण्याचा प्रसग अवश्य येतोच, आणि रडणाराला सुखाचा कालही अवश्य येतो. जग रहाटगाडग्यासारखे असून भरलेले लोटे रिकामे होत असतात व रिकामे झालेले पुन्हा भरत असतात असे माया सागते. ही स्थिति सुधारण्यास कोणताही उपाय नाही ज्या ठिकाणी दु खाचे वारेंही न लागतां निर्भेळ सुखाची प्राप्ति आपणास होईल आणि ज्या ठिकाणीं आपण सदोदित आनदी आनद करीत राहू, असे ठिकाण कोठे तरी सापडेल अशा कल्पनेने आपण आपल्या मनास कितीही रिझविण्याचा यत्न केला, तरी असे होणें त्रिकालातही शक्य नाही. ही गोष्ट स्वभावत च अशक्य आहे. कारण ज्या गोष्टीमुळें जगाला अस्तित्व प्राप्त झाले, त्या गोष्टी सदोदित तशाच राहावयाच्या. तोडावर हास्य निर्माण करणारी शक्ति जेथे आहे, तेथेच अश्रु निर्माण करणारी शक्तिही लपून बसलेली आहे सुखसवेदना उत्पन्न करणाऱ्या शक्तीबरोबरच दु ख उत्पन्न करणारी शक्तिही दडून राहिलेली आहे.

वेदान्त हा आशावादी नाही अथवा निराशावादीही नाही हे येथवर केलेल्या विवेचावरून ध्यानी येईल. आशावाद आणि निराशावाद या दोहोची तराजू समतोल राखून वस्तुस्थिति सागण्याचे कार्य वेदात करतो सत् आणि असत् या दोहोंनी हे जग भरले आहे, हे म्हणणे वेदान्ताला मान्य आहे. त्याचप्रमाणे सुख वाढविल्यास दु खही वाढते, हे म्हणणेही वेदाताला कबूल आहे. जग ज्याप्रमाणें निर्भेळ चागले होणार नाही, त्याचप्रमाणे ते निर्भेळ वाईटही होणार नाही, कारण ही कल्पनाच असभाव्य कोटीतली आहे माया-वादाने जे मोठे रहस्य स्पष्ट करून दाखविले, ते हेच कीं चागले आणि वाईट दोन परस्परभिन्नस्वभावी वस्तूना अस्तित्व नाही. अमुक हे चागलें आणि तमुक हे वाईट अशी स्पष्ट रेषा मारून या दोन वस्तूचे प्रात विलग करतां येत नाहींत. अमुक निर्भेळ चागली असा शिक्का कोणत्याही वस्तूवर आपणास मारता येणार नाही, त्याप्रमाणें वाईटालाही हा न्याय लागू आहे. जो देखावा आज तुम्हाला चागला असा वाटतो, तोच उद्या तुमच्या दृष्टीला वाईटही दिसू लागेल. जी गोष्ट एकाच्या ठिकाणी दुःख उत्पन्न करीत असते तीच गोष्ट त्याच क्षणीं दुसऱ्या एखाद्याच्या ठिकाणी सुख उत्पन्न करते. ज्या आगीनें

मूल भाजून तळमळत असते तीच आग एखाद्या क्षुधितासाठी पाकनिष्पत्ति करते. जे ज्ञानततू सुखसवेदना वाहून नेत असतात, तेच दु खतरंगही पोंह-चवितात. याकरिता दु खमुक्त व्हावयाचे असेल तर सुखमुक्तही झालें पाहिजे दु॰ख यावयास नको असेल, तर सुख उत्पन्न करण्याचा नादही सोडला पाहिजे. यावाचून अन्य मार्ग नाही. मृत्यु नको असेल तर जीवितही सोडलें पाहिजे मृत्यूवाचून जीवित आणि दु खावाचून सुख या वस्तूना अस्तित्व असणें शक्य नाही. या जोडीपैकीं केवळ एकाच्याच अस्तित्वाची प्राप्ति होणें शक्य नाही कारण एकाच वस्तूची ही भिन्नरूपे आहेत. यामुळें या जोडीपैकी एक वस्तु नाहींशी झाली की दुसरीही अवश्य तिच्यामागे जाईल अमुक एक वस्तु आज चागली अशी आपणास वाटली तरी सदोदित ती तशीच वाटेल याचा तरी भरवसा कोठे आहे ? आजचे चागले आपणास उद्याच वाईट दिसू लागते आपण आपला गेलेला चरित्रक्रम पुन्हा चाळून पाहिला, तर या गोष्टीचे चागले प्रत्यतर येते निरनिराळ्या काळी किती निरनिराळ्या प्रकारचीं ध्येये आपल्या मनात वास करीत होती याचा विचार करा. दोन घोड्याच्या गाडीत ऐटीने बसून जावयास मिळाले तर सर्व सुखाचा गड्डा हातीं आला असेही काही वेळ माझ्या मनात येई. दुसऱ्या एखाद्या वेळी बायको असावी, मुले असावी आणि पैशा अडक्याची चगळ असावी म्हणजे सुखसर्वस्व लाभेल असेही वाटे. आता या साऱ्या वस्तू मला तुच्छ आणि पोरकट वाटतात व असे तुच्छ विचार माझ्या मनात आले तरी कसे याचेच मला हसू येते. आज जी साध्ये आपल्या मनात पक्कें घर करून बसलीं आहेत व ज्यामुळें आपणास आपला अहकार–स्वतत्र अस्तित्व–विसरण्याची आपणास भीति वाटते ती आपली ध्येये तुच्छ वाटण्याचा काळही अवश्य-मेव येईल असें वेदान्ताचे सागणें आहे. आपल्या या शरिराचा नाश केव्हाही होऊ नये अशी इच्छा आपणापैकी प्रत्येकास आज आहे. हे आपलें शरीर अनतकाळ सुरक्षित राहिले तर आपण फार सुखी होऊ असे आपणास वाटते. पण एक काळ असा खचित येईल कीं त्यावेळीं आपणांस या आपल्या कल्पनेचेंच हसू येईल. वेदान्तानें सागितलेली ही स्थिति खरी असेल तर आपण पर-स्परविरोधाच्या प्रचड भोवऱ्यांत सांपडलों आहों असेंच म्हटले पाहिजे. आपण धड जिवत नाहीं आणि धड मेलेलेही नाही, धड सुखी नाहीं आणि

धड दु खीही नाही यापैकी कोणत्याही एकाच स्वरूपाचे आपले अस्तित्व नसून या वस्तूच्या मिश्रणात आपण आहो. अशा स्थितींत त्या वेदान्ताचा, त्या साऱ्या तत्त्वज्ञानाचा आणि त्या धर्माचा आम्हास उपयोग तरी काय ? सत्कार्य करावे असे सारे धर्म सागतात नीतिशास्त्राची आज्ञाही अशीच आहे, पण अशा स्थितीत सत्कार्य करून तरी अती उपयोग काय, असा प्रश्न आपल्या मनात आल्यावाचून राहत नाही काही चागले करावयास गेले तर त्याबरोबर वाईटही आपोआप घडणार, सुख वाढवावयास लागले की दु खही वाढणारच, त्याअर्थी सत्कार्याचा तरी उपयोग काय, असा प्रश्न लोक तुम्हास विचारणार नाहीत काय ? या प्रश्नाला उत्तर इतकेच की आपणा स्वत ला सुखी करण्यास यावाचून दुसरा मार्गच ज्या अर्थी नाही, त्या अर्थी आहे तो मार्ग स्वीकारण्यावाचून आपणास गत्यतर नाही जगातील दु ख कमी करण्यास सदोदित झटणें यावाचून स्वत स सुखी करण्यास दुसरा उपाय नाही, हे आपणापैकी प्रत्येकास केव्हाना केव्हा पटल्यावाचून राहत नाही कोणाला ही गोष्ट तारुण्यकाळात कळते तर एखाद्याला ती वृद्धावस्थेत पटते इतकेच ज्याला ही गोष्ट लवकर कळत नाही अशा मदबुद्धीच्या माणसाला ती शिकविण्याकरिता जबर किमत द्यावी लागते, आणि ज्याला ती लवकर समजते, त्याला ती द्यावी लागत नाही या जगात काही विशिष्ट कार्यभाग करण्यासाठीच आपण अवतरलो आहो तो आटपल्यावाचून या परस्परविरोधाच्या भोवऱ्यातून आपली सुटका होणार नाही चागले आणि वाईट अशी दोन प्रकारची शक्तीची रूपे या जगात वावरत असून त्याजमुळेंच जगाला अस्तित्व आहे आपल्या स्वप्नातून आपण जागे होईपर्यंत व हे एरडाचे गुन्हाळ बद करीपर्यंत या जगाचे अस्तित्व ही दोन रूपे राखून ठेवतील, हा धडा शिकणे आपणास भाग आहे, पण तो शिकेपर्यंत किती काळ निघून जाईल हें कोणीं सागावे ! अनत तत्त्वच विश्वरूपाने अवतरले आहे, असा मूळ सिद्धात घेऊन त्यावर दर्शने रचण्याचा उपक्रम जर्मनीत झाला आहे इग्लडातही असा यत्न सुरू आहे अनतत्व विश्वरूपाने व्यक्त होण्यासाठी धडपडत असून कधी काळी तरी ते पूर्णत्वाने व्यक्त होईल असा या तत्त्ववाद्याच्या मताचा आशय आहे केवळ शब्दवादात हे म्हणणें गोड दिसते, पण याला तर्कशास्त्राचा आधार काय असा प्रश्न दुसरे तत्त्ववेत्ते

अवश्य विचारतील केवलरूप अथवा अनतत्व मर्यादित झालें म्हणजेच विश्वरूपाने व्यक्त होते आपली इद्रिये खचित अमर्याद नाहींत ती अमर्याद होऊ शकत नाहीत, त्या अर्थी त्याच्या द्वारें येणाऱ्या सवेदनाही मर्यादित असल्याच पाहिजेत मनोद्वारा अथवा बुद्धिद्वारा अनताचें आकलन करणे शक्यच नाही मर्यादित वस्तु अमर्यादाचे सपूर्ण आकलन कसे करू शकेल ? याकरिता केवलरूप सपूर्णत्वानें व्यक्त होईल हे म्हणणें अगदी अशक्य कोटीतलें आहे

केवलरूप अथवा अनतत्व साकार रूपानें व्यक्त होण्याची खटपट करीत आहे असें वेदान्ताचेही मत आहे, पण अखेरीस या गोष्टीची अशक्यता त्याला पटून ते आपल्या मूळच्या म्हणजे अव्यक्ताच्या स्थितीस परत जाईल असें वेदान्त सागतो आपल्या मूलरूपास परत जाण्याची क्रिया म्हणजेच सन्यास, आणि सन्यासवृत्तीचा प्रारभ म्हणजे धार्मिक जीवनाचा प्रारभ होय अलीकडच्या मनूत सन्यासाचे नुसते नावही तोंडावाटे काढण्याची सोय नाही जी भूमि मरून नाहीशी झाल्यास पाच हजार वर्षांचा काळ लोटून गेला, त्या भूमीतून सन्यासाचा उपदेश करण्यासाठीं हा आला आहे असे मजबद्दल अमेरिकन लोक बोलत इग्रज तत्त्वज्ञही मजबद्दल कदाचित् असेच म्हणत असेल. पण कोणीं काहींही म्हटलें तरी सत्य ते सत्यच. तुम्हास धार्मिक जीवन हवे असेल तर सन्यासावाचून दुसरा मार्ग नाही सन्यासी होऊन ऐहिक वस्तूचा त्याग केल्याशिवाय धर्माचा मार्ग दिसणें शक्य नाहीं. ख्रिस्ताचे म्हणणें हेच आहे. 'माझ्यासाठी जो आपलें जीवित गमावील त्यास नवजीवनाचा लाभ होईल,' या वचनाचा अर्थही हाच पूर्णत्व प्राप्त करून घेण्यास सन्यासावाचून–त्यागावाचून–दुसरा मार्ग नाही असें येशू ख्रिस्ताने वारंवार बजावून सागितले. जगाच्या कटाळवाण्या स्वप्नातून आपले मन जागृत होण्याचा काळ केव्हाना केव्हां येणारच. मुलाला खेळाची आवड कितीही असली तरी केव्हातरी त्याला त्याचा कटाळा येऊन ते धावत आपल्या आईकडे जातें. खेळाचा कटाळा येऊन आईची आठवण झाली कीं तिच्या भेटीवाचून दुसऱ्या कोणत्याही उपायांनीं त्याचे सात्वन होत नाही. त्याचे मन आईच्या भेटीसाठीं तळमळू लागतें. आपलें मन असेच कटाळले म्हणजे त्यागाचे महत्त्व त्याला कळू लागते. 'अग्नीवर तेल ओतल्यानें तो

शांत न होता जसा अधिकच भडकतो त्याचप्रमाणे इंद्रियाची शांति इंद्रिय-भोग भोगून न होता भोगतृष्णा अधिकच बळावते' या वचनाची सत्यता अशा स्थितीत आपणांस पटते तुमचा भोग इंद्रियगत असो कीं बुद्धिगत असो, त्याची अखेर वाट हीच मनुष्याच्या मनात जितक्या प्रकारच्या भोगकल्पना म्हणून असतील त्या सार्‍यास हा एकच न्याय लागू आहे इंद्रियांचें कोड पुरवून त्यांस आपण शांत करू ही गोष्ट त्रिकालातही शक्य नाहीं. या भोगांना खरें अस्तित्वच नाही ते केवळ मायिक आहेत मायेच्या जाळ्यात आपले हातपाय पक्के जखडले गेले असल्यामुळें तिचे पाश तुटत नाहीत, आणि त्याचप्रमाणे भोगाचे पाशही तुटत नाहीत अनत काळ या जाळ्यात आपण धावत राहिलो तरी त्याला अत नाही असेंच अखेरीस आपल्या प्रत्ययास येईल. माया चक्राकार परिभ्रमण करीत आहे वर्तुलाला जसा कोठेंच अंत नाहीं, त्याचप्रमाणें मायेलाही तो नाही. या जाळ्यात राहून थोडेसे सुख मिळविण्याची धडपड केल्याबरोबर हजारों दु खें आपणास मिठी मारतात असे मात्र आपल्या प्रत्ययास येते ' **सुख पाहतां जवापाडें। दु ख पर्वता एवढें ॥** ' या अनुभविक वचनाचा प्रत्यय आपणास नेहमी येतो. ससारचक्राची ही वस्तुस्थिति लक्षात आल्याबरोबर भीतीने मन किती गोंधळून जाते पहा! या ऐहिक जीवनाचा जो जों अधिक विचार करावा तो तों मायावादाची सत्यता माझ्या चित्तास अधिकाधिक पटू लागते. हे सर्व विश्व केवळ मायारूप आहे हाच या कोड्याचा उलगडा होय, असा माझ्या बुद्धीचा निश्चय होऊ लागतो या जगात दु:खाचा केवढा मोठा सांठा भरून राहिला आहे याचा विचार करा. जगांतील निरनिराळ्या देशात आपण प्रवास केला तर स्वदु:खनिरसनार्थ निरनिराळे देश नाना यत्न करीत आहेत असे आपणास आढळून येईल. एकाच प्रकारच्या दु.खाच्या निवारणासाठीं वेगवेगळ्या राष्ट्रानी वेगवेगळे यत्न आजपर्यंत केले आहेत, पण त्या सार्‍यांची फलश्रुति एकच. दु ख पहिल्या दिवसाइतकेच कायम आहे. या यत्नांत कोणाही देशास यश आलेलें नाहीं. जगांतील समवायी दु.खाचा साठा पहिल्या इतकाच आहे. एखाद्या देशात त्यांत कोठें थोडा खाडा पडला तर दुसऱ्या एखाद्या देशावर तेवढ्याच प्रमाणाचा लोंढा उसळतो. एखाद्या देशात थोडा काळ दु:खसागराला ओहटी लागली तर दुसरीकडे भरती सुरू असते अशा रीतीने हे जगच्चक्र अनत

काळ चालू आहे. आपल्या समाजांत वैवाहिक पावित्र्य अधिक राहावें म्हणून हिंदूनीं बालविवाह सुरू केले पण यामुळें अखेरीस ते अधोगतीस गेले. आता बालविवाहामुळे हिंदुलोकात पावित्र्य अधिक राहिले आहे हेंही निर्विवाद आहे. स्त्रीपुरुषाचा विवाह लवकर करून दिला म्हणजे ती लवकरच कमजोर होतात; मग त्यांच्या ठिकाणीं मदनाचे वारें जोरात वाहिले नाही तर त्यात नवल काय ? उलट पक्षी तुम्हा इग्रजाबद्दल विचार करता तुमची स्थितीही मोठीशी हेवा वाटण्यासारखी नाही असेंच दिसून येते तुमची स्थिति तरी अधिक स्पृहणीय कोठे आहे ? वैवाहिक पावित्र्यावरच राष्ट्राचे जीवित अवलबून असते. जी जी राष्ट्रे आज काळाच्या पोटात गडप झालीं आहेत त्यांच्यात या पावित्र्याचा अभाव झाला होता असे इतिहास आपणास स्पष्टस्पणे सागत आहे. राष्ट्रात या पावित्र्यास उतरती कळा लागली कीं तीबरोबरच राष्ट्रही खचू लागते. राष्ट्रात व्यभिचार वाढू लागला की त्याचे दिवस भरू लागले असें समजावें. अशा प्रकारच्या परस्पर विरोधी स्थितीत आमच्या दुःखाचे परिमार्जन करण्यास मार्ग तरी काय काढावा ? आईबापानी वधुवरें ठरवावी अशी पद्धत प्रचारांत आली तर चालू स्थितीतील दुरवस्थेस बराच आळा बसेल. हिंदुस्थानातील स्त्रिया या बाबतीत अधिक व्यवहारी आहेत. हिंदु स्त्रिया कोमलभावनावश नसून प्रत्यक्ष व्यवहाराकडे अधिक लक्ष्य पुरविणाऱ्या आहेत. त्याच्या आयुष्यक्रमात कवितेपेक्षा प्रत्यक्ष सृष्टीचाच अधिक सबध असतो. यामुळें कल्पनावश होऊन मनानें कोठे तरी भराऱ्या मारीत बसणें त्याच्या चित्तास रुचेनासे होते. ससाराच्या चक्रात भावनाचा नायनाट होऊन कठोर व्यवहार मात्र शिल्लक उरतो. वधुवरानी स्वमतानेच परस्पराची निवड केली तर अशा प्रकारचे विवाह अती सुखदायक होतात असे दिसत नाहीं. वैवाहिक सुखाच्या बाबतींत सामान्यत हिंदु स्त्रियाच फार सुखी आहेत नवराबायकोत भयकर तेढ आली अशीं उदाहरणे अगदीं क्वचित् घडून येतात. अमेरिकेंत वैवाहिक बाबतींत स्त्रीपुरुषास पूर्ण स्वातत्र्य असता तेथे वैवाहिक दुःखाची व्याप्ति फारच मोठी आहे दु खी कुटुबाची सख्या अमेरिकेइतकी दुसऱ्या कोठेही नसेल. एकदरींत जिकडे पाहावें तिकडे दुःखच आढळून येतें. कोणत्याहि देशात जा; तेथे कसल्या ना कसल्या प्रकारचें दुःख आहेच. यावरून काय शिकावयाचें ? हेच कीं सुखासाठीं अनेक प्रकारांनी धडपड

करूनही अती फारशा सुखाची प्राप्ति झालेली नाहीं. एका बाजूनें सुखात थोडीशी भर पडली तर दुसऱ्या बाजूने भला मोठा खाडा पडतो हाच धडा यावरून आपण शिकला पाहिजे

मग आम्ही सत्कार्य म्हणून काहीच करू नये असे तुमचे म्हणणें आहे काय, असा प्रश्न केला तर त्यावर उत्तर हेच की सत्कार्य करण्यास तुम्ही अवश्य झटा किंबहुना पूर्वीपेक्षाही अधिक उल्हासाने त्याच्या मागे लागा सुख वाढविण्याचें अथवा दु ख कमी करण्याचे साधन आपल्या हाती नाही हे कळून आल्याचा उपयोग इतकाच की हे ज्ञान चित्तात असले म्हणजे तेथे आततायित्व शिरणार नाही हिंदु आपल्यासारखा नाही म्हणून आज एक इंग्रज उठतो आणि त्याला शिव्याशाप देत सुटतो. उलट पक्षी हिंदु इंग्रजाला शिव्या देतो. आपण सारे एकाच माळेचे मणी आहों ही वस्तुस्थिति सर्वांच्या गळीं उतरली तर जगातील परस्परद्वेष आणि आततायित्व ही नाहीशीं होतील. परकीयाच्या चालीरीतीविषयीही आपल्या चित्तात आदर उत्पन्न होईल. आततायित्वाचें प्रमाण कमी झालें म्हणजे खऱ्या सत्कार्याची व्याप्तिही वाढेल आततायी लोकाच्या हातून खरे काम फारसें होत नाही. त्याचा माथेफिरूपणा त्याच्या सामर्थ्याचा पाऊण हिस्सा अगोदरच खाऊन टाकतो. यामुळे कार्यासाठीं फारसे सामर्थ्य त्याजपाशी शिल्लक उरत नाहीं. थंड डोक्याच्या आणि व्यवहार जाणणाऱ्या माणसाच्या हातूनच खरें कार्य अधिक होत असते जगाच्या स्वरूपाची जी वस्तुस्थिति येथवर सागितली ती पक्की मनात बिंबली म्हणजे माथेफिरूपणा कमी होईल, आणि माथे-फिरूपणा कमी झाला म्हणजे कार्याला लागणारें सामर्थ्य वाढेल. जग असेच चालावयाचे ही खूण चित्तात पक्की बाणली म्हणजे भलताच उतावळे-पणा आपल्या हातून होणार नाही. कोठे दु ख पाहिले कीं आज आपण गडबडून जातों, आपला समतोलपणा बिघडतो आणि आपण कोठें तरी छायेच्या मागें धावत सुटतों. आपण जिच्यामागें धावतों ती प्रत्यक्ष वस्तु आहे की तिची छाया आहे हा विचार येण्याइतकीही स्थिरता आपल्या ठिकाणी उरत नाही. जगाच्या सुखदु ःखात अधिकउणें करण्याचें सामर्थ्य आपणास नाही हे ज्ञान झाले म्हणजे आपले चित्त स्थिर होईल. उदाहरणार्थ असें पहा की जगातील साप्रतची सारी मनुष्ये सत्पुरुषाच्या अवस्थेस येई-

पर्यंत उत्क्रातीने पशूची माणसे बनत असतील ती सध्याच्या माणसाप्रमाणें अर्थातच वागणार कारण त्यानाही साप्रतच्या मनुष्याचे सारे अनुभव यावयास पाहिजेत हीच गोष्ट वनस्पतिसृष्टीसही लागू आहे यामुळे जगाचें स्वरूप अनत कालापासून एकसारखेच राहिले आहे या ठिकाणीं एक वस्तुस्थिति मात्र लक्षात ठेवण्यासारखी आहे ससारनदीचा हा प्रचड ओघ समुद्राकडे वाहात असून या ओघातील प्रत्येक थेब योग्य काळी समुद्रास मिळाल्यावाचून राहणार नाही समारचक्रात सापडलेले प्राणी अनत प्रकारची दु खे भोगीत असले अथवा सुखात असले आणि त्याच्या चेहऱ्यावर कधीं दु ख दिसत असले अथवा कधी हास्याची लकेर उमटत असली तरी ही एक गोष्ट निश्चित आहे की हे सारे प्राणी आपल्या अखेरच्या साध्याकडे धाव घेत आहेत यापैकी कोणी लवकर पोंचतील तर दुसरे कोणी उशिरा पोचतील, पण सर्व त्या एकाच साध्याकडे धांव घेत आहेत यात सशय नाही. माणसाप्रमाणेंच चतुष्पादप्राणी, वनस्पती आणि जेथें जेथे म्हणून सजीवतेचा यत्किंचित अश दिसतो अशा प्रत्येक वस्तु त्या पूर्ण आणि अनत समुद्राकडे धाव घेत असून अखेरीस ती त्याला जाऊन मिळेल. प्रत्येक वस्तु अखेरीस पूर्णावस्था पावून स्वतत्र होईल

वेदातमत आशावादी अथवा निराशावादी नाहीं ही गोष्ट मी पुन· पुनः आपणास बजावून सागतो ससाराबद्दल निष्कारण रडकथा गाऊन तुमचीं मनें उद्विग्न करावीं हा वेदाताचा उद्देश नाहीं अथवा संसार हेंच साध्य म्हणून त्याद्दबल तुमच्या चित्तात उत्साह उत्पन्न करावा हेंही त्याचें कार्य नाहीं. सारें जग निवळ दु.खाने भरले आहे असे वेदात म्हणत नाहीं अथवा जग म्हणजे सुखाचे आगर असेही तो सांगत नाहीं. चागलें आणि वाईट या दोहोमध्ये वेदांताने समतोल तराजू धरली आहे. आपल्या दृष्टीने दिसणाऱ्या चागल्या अगर वाइट वस्तूची किंमत वास्तविक सारखीच आहे असें तो सांगत आहे वाइटाची किंमत चागल्याहून कमी नाहीं अथवा चांगल्याची किंमत वाईटाहून कमी नाही असें वेदाताचें म्हणणें आहे. चांगलें आणि वाईट ही परस्परांशीं पक्की जखडलेलीं असून परस्परांशीं त्यांचें सहोदरत्वाचे नातें आहे. हीं दोन्ही परस्परापासून वेगळीं करतां येणार नाहीत. जगाचें खरें स्वरूप असें आहे. ही गोष्ट पक्की लक्षात ठेवून

कोणत्याही कार्यांत तुम्हीं उतावीळपणा करू नये. आतां येथे अनेक प्रकारचे प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे. आम्ही कर्म तरी का करावे? प्रत्येक चांगल्या म्हणून केलेल्या कर्मांच्या पोटीही जर वाईट फळ अवश्य निपजणार तर आम्हीं करावें तरी काय? यापेक्षां कोणताही निश्चय न करता संशयवादी होऊन बसणें अधिक बरें नव्हे काय? जगाच्या स्वरूपाचा कोणताही एक निश्चय ठाम करता येत नाही ही गोष्ट अर्वाचीन सशयवाद्यासही मान्य नाही. मायेचे स्वरूप अनिर्वचनीय आहे असे आमचे जुने मत आहे. हेंच मत दुसऱ्या भाषेने अर्वाचीन सशयवादी आम्हास सांगतात. आणि यावरून ते असा उपदेश करतात की ज्या अर्थी जगाच्या अथवा परमेश्वराच्या स्वरूपाचा निश्चय होत नाही त्याअर्थी याबद्दल डोक्यास अधिक न शिणवितां जगात मिळेल तितकी चैन भोगून घ्यावी जीविताचा पूर्ण उपभोग घ्यावा असा त्याचा उपदेश आहे या ठिकाणीं ते जी एक मोठी भयकर आणि अक्षम्य चूक करीत आहेत तीच चूक भयकर आहे, इतकेच नव्हे तर तर्कशास्त्रालाही ती असमत आहे ती चूक अशी—जीवित या शब्दाचा अर्थ काय? जीवित म्हणते कर्मेंद्रियाच्या द्वाराने जेवढें अनुभवास येते तेवढें जीवित म्हणावयाचे काय? इद्रियाच्या अनुभवास येणारे तेवढेच जीवित असें म्हटले तर पशूशी आम्ही बरोबरी केल्यासारखे होईल. केवळ इद्रियतृप्तीच्या बाबतींत पशू आणि आम्ही मनुष्ये यात फारसा फरक नाही केवळ इद्रियतृप्तींतच सुख मानून राहणारा प्राणी मजसमोर बसलेल्या मडळींत कोणी असेल असे मला वाटत नाही यावरून आपले जीवित याहूनही काही तरी अधिक स्वरूपाचें असले पाहिजे हे उघड आहे. आमच्या चित्तात उठणाऱ्या भावना, आमचे विचार आणि आमच्या आकाक्षा ही सारी आमच्या जीविताचाच भाग आहे त्याचप्रमाणे पूर्णत्वाकडे जाण्याची जी धडपड आमच्यांत सुरू आहे, तीही आमच्या जीविताचाच एक भाग नाही काय? किंबहुना आमच्या जीविताचा अत्यत महत्त्वाचा भाग म्हटला तर तोच होय. आता आपल्या जीविताचा पूर्ण उपभोग घेतला पाहिजे असा सशयवाद्याचा उपदेश आहे आपल्या अखेरच्या साध्याच्या शोधात एकसारखें राहणें हेंच आमचे खरे जीवित होय. आमच्या जीविताचा सारा अर्क याच गोष्टींत साठविलेला आहे. आपली सारी धडपड या एकाच साध्याच्या

सिद्धीसाठी आहे. हें साध्य आपल्या डोळयापुढून गेले तर जीवित आपणास नकोसे होईल. त्याची इतकी आवश्यकता ज्याअर्थी आपणास आहे त्याअर्थी सशयवादी होऊन आपला निभाव लागणार नाही. सशयवादाचा अगिकार केल्यास जीवित कटाळवाणे होईल. त्याचप्रमाणे जग जसें दिसतें तसेच तें आहे ही कल्पनाही मान्य करून आपलें चालावयाचे नाही आपले अखेरचें साध्य काय आहे हें सशयवाद्यानीं दृष्टिआड केले आहे. त्या साध्याशिवाय बाकीचे जीवित मान्य करून तेवढेच जीवित असे त्याचे म्हणणें आहे. आपले अखेरचे साध्य काय आहे याचा उमज ज्या अर्थी आपणास पडत नाही त्या अर्थी त्याचा शोधच सोडून देणें बरे असे ते आम्हास सागतात याचेच नाव माया समोर जितके दिसते ती सारी माया ही प्रकृति आणि हें विश्व ही मायारूपच आहेत जगातील सर्व धर्माचा यत्न ही मायेची हद्द ओलाडण्याचाच आहे या हेतूनें केलेल्या निरनिराळया प्रकारच्या धडपडी-तून निरनिराळे धर्म उत्पन्न झाले आहेत निरनिराळया धर्मानी या एकाच साध्यासाठी निरनिराळे मार्ग निरनिराळया प्रकारानी सागितले आहेत. अगदी बाल्यावस्थेत असलेल्या धर्मापासून तों अत्यत प्रौढदशेस पोचलेल्या धर्मापर्यंत सर्वाचे साध्य हे एकच आहे कोणी आपले मार्ग दतकथाच्या रूपानें सागितले आहेत, कोणी पुराणादि ग्रथातून परमेश्वरविषयक गोष्टीनीं ते कथन केले आहेत, कोणी सतचरित्राच्या रूपाने ते सागितले आहेत तर दुसऱ्या कोणी शुद्ध तत्त्वाच्या दृष्टीने त्याचा उपदेश केला आहे. मार्ग कितीही आणि कोणत्याही प्रकारे सागितलेले असले तरी त्या सर्वांचे अतिम साध्य मायेच्या हद्दीच्या बाहेर जाणे हेंच होय. मायेने घातलेली बधनें तोडणें हा एकच उद्देश त्या सर्वांपुढें आहे. थोडक्यात इतकेच सांगा-वयाचे कीं पूर्ण स्वतत्र होण्यासाठीच सर्वांची धडपड आहे जाणूनबुजून असो अथवा अजाणपणें असो; प्रत्येक मनुष्याला आपली बद्ध स्थिति जाण-वल्यावाचून राहत नाही माझ्यांत काही तरी उणीव आहे. मजभोंवती काहीं तरी बधनें आहेत ही जाणीव प्रत्येकाच्या हृदयात आहे. मनुष्यानें प्रथम दृष्टि उघडली आणि आजूबाजूला पाहिलें तेव्हांच या परतत्रतेची जाणीव त्याला झाली. या विश्वांत मी जखडला गेलो आहें असें तेव्हाच त्याला कळून आले. त्याचप्रमाणें या देहापलीकडे कोठे तरी जाऊ पहाणारें

तत्त्व माझ्या ठिकाणी आहे असेंही त्याला दिसून आलें. तसेंच देहापलीकडे जाण्याची इच्छा करणाऱ्या या तत्त्वाचे हातपाय सृष्टीनें जखडून टाकले आहेत असेंही त्याला दिसून आले. ज्या धर्मांत पूर्वजपूजेचा प्रचार आहे तेथेंही ही मुक्तीची कल्पना मुळात असल्याचे आढळून येते. निरनिराळया देवाची पूजा करणाऱ्या मनुष्यास त्या देवाच्या ठिकाणी स्वत हून अधिक स्वातत्र्य दिसत असतें. देवघराचा दरवाजा बद केला तरी भितींतूनही देव बाहेर येईल असें त्याला वाटत असते. भिंती माझ्या देवाला अटकाव करू शकत नाहींत अशी त्याची पूर्ण भावना असते. हीच कल्पना वाढत वाढत अत्यत विशाल झाली म्हणजे विश्वव्यापी व्यक्त परमेश्वराचें स्वरूप तिला येते हें स्वरूप मायातीत आहे, या विश्वाच्या हद्दीच्या बाहेरचे आहे हा या विशाल भावनेचा मुख्य मुद्दा आहे. या भावनेचा तो केवळ प्राणच होय. हिदुस्थानातील निबिड अरण्यात वृद्ध ऋषिमडळ बसून या गोष्टीची चर्चा करीत असल्याचा देखावा जणू काय मूर्तिमत माझ्यापुढे उभा राहिला आहे. त्या ठिकाणीं अशी चर्चा चालत असता एक तरुण उभा राहून मुक्त कठाने असे सागत आहे की हा मार्ग मला सापडला आहे ज्या तत्त्वाला जाणले असता अमृतत्व मिळेल असे तत्व मला सापडलें आहे.

मायेची व्याप्ति सर्वत्र आहे. तिच्यातून मुक्त असें एकही ठिकाण आपल्या दृष्टिसमोर नाही इतकी तिची व्याप्ति भयकर आहे पण या भयकर जाळ्यातूनच आपला मार्ग आपणास काढला पाहिजे. सारे जग चागले झाल्यावर आपण आनदानें राहू अशा इच्छेने स्वस्थ बसून राहाणारा मनुष्य आणि गगा वाहून गेल्यावर कोरड्या पायानी पलीकडे जाऊ पाहणारा मनुष्य हे सारख्याच किंमतीचे आहेत मायेबरोबर चालून आपल्या साध्यास आपण कधींही पोंचणार नाहीं. मायेच्या ओघाच्या विरुद्ध दिशेने आपणास जावयाचे आहे. मायेबरोबर वहात जाऊन आपले कार्य होणार नाही हा एक मुद्दा विशेष लक्ष्यात ठेवण्यासारखा आहे. सृष्टिकार्याला हातभार लावण्यासाठी मनुष्याचा जन्म नसून सृष्टीवर विजय मिळविण्यासाठीं आहे. वास्तविक सृष्टीचे आम्ही धनी असता आज तिनेच आपणास बांधले आहे. पण खरा प्रकार असा आहे कीं तिने आपणांस बाधले नसून आपणच आपणास बाधून घेतले आहे. हे घर कोणी बांधले आहे ? ते सृष्टीने बांधलेलें

नाही सृष्टी म्हणते कीं अरण्यात जाऊन रहा. मनुष्य प्राणी म्हणतो की सृष्टीशीं भाडून माझ्या सोईस पटेल असे घर मी बाधीन आणि त्यात राहीन आणि तसेच त्यानें केलें आहे. मनुष्यजातीचा सारा इतिहास पाहता विश्वाचे कायदे आणि तो याजमध्ये उभा दावा आहे असे दिसून येईल आणि ते कायदे मोडण्यांत आजपर्यंत तिनें विजय मिळविला आहे. ही बाह्य सृष्टीची गोष्ट झाली, अत सृष्टीकडे पाहताही हाच प्रकार आढळून येतो. मनुष्यांतील पाशवी वृत्ती आणि दैवी वृत्ती यांजमध्येंही आरंभापासून युद्ध चालू असून त्यांतही पाशवी वृत्तीचा पराजय होत आहे. तमोगुणावर सत्वगुण विजय मिळवीत आहे. एकदरीनें अत.सृष्टीत आणि बाह्य सृष्टीत तिजवर तो विजय मिळवीत आहे. या मायेपलीकडे एक तत्त्व असून तेथे पोंचलें असता आपण मायेच्या जाळयातून मोकळे होऊ हें वेदांतानें तुम्हास दाखवून दिलें आहे. कोणत्या ना कोणत्या रूपानें सर्व धर्मांत हेच तत्त्व ग्रथित झाले आहे या साऱ्या सृष्टीचा व मायेचा नियता जो परमेश्वर त्याजपर्यंत जाणें हें सर्व धर्मास मान्य आहे. आता येथे फरक इतकाच कीं इतर धर्माचें हें अखेरचें साध्य असता वेदात मताचा मात्र तो केवळ प्रारंभ आहे. जो परमेश्वर विश्वबाह्य आहे असें इतर धर्म सांगतात तोच परमेश्वर मी स्वत आहें असें वेदाताचे म्हणणें आहे 'मी बद्ध आहे' हा केवळ भ्रम असून वास्तविक 'मी मुक्त आहें, मायातीत परमेश्वर आहें' असा अनुभव वेदात्याला येतो

## माया आणि ईश्वरविषयक कल्पनेचा विकास



अद्वैत सिद्धांताची सर्व उभारणी ज्या पायावर केली आहे तो पाया मायावाद हा होय हा मायावाद बीजरूपानें सहिताग्रथात आढळतो. किंबहुना जीं उच्चतत्त्वे उपनिषद् ग्रथांत विस्तारपूर्वक सागितलीं आहेत तीं सारीं तत्त्वें कोणत्या ना कोणत्या रूपानें सहितांत आढळतात. मायावाद म्हणजे काय याची सामान्य कल्पना तुम्हापैकीं बहुतेक साऱ्यास आतांपर्यंत झाली असेलच. माया म्हणजे दृष्टीभ्रम. पण भ्रम अथवा दृग्भ्रम इत्यादि शब्दांनीं माया या शब्दाचा अर्थ स्पष्ट होत नाही. माया म्हणजे भ्रम हा

अर्थ चुकीचा आहे माया ही नुसती उपपत्ति नाहीं विश्व जसें प्रत्यक्ष आहे तसें त्याचें स्वरूप मायेनें सांगितलें आहे ती नुसती कल्पना अथवा उपपत्ति नसून विश्वरूपाचें ते प्रत्यक्ष दर्शन आहे. मायावादाचे विवेचन आपणास पाहावयाचें असेल तर बीजरूपानें या वादाची जेथे उत्पत्ति झाली त्या संहिता ग्रथात काय सांगितलें आहे हे आपण पाहिलें पाहिजे. देव या शब्दाचा अर्थ काय आहे हें आपण पूर्वी एकवार पाहिलेंच आहे देव म्हणजे बलवान प्राणी याहून दुसरा अधिक अर्थ देव या शब्दाला नाही ग्रीक, हिब्रू अथवा इराणी धर्मग्रथ वाचताना देवाची म्हणून जी कित्येक कृत्ये त्यांत नमूद केलेली आढळतात ती आपणास अगदीच किळसवाणी वाटतात. पण या कृत्याकडे अवलोकन करतांना आपण एकुणिसाव्या शतकातले आहोंत व ते देव हजारों वर्षांच्या मागले आहेत हा मुद्दा आपल्या दृष्टिआड होत असतो. त्याचप्रमाणें या देवांचे पूजन जे करीत होते त्या लोकांना या कृत्यात त्याज्य अथवा गर्हणीय असे काहीच वाटलें नाहीं अथवा त्या कृत्यांची भीतीही त्यांस वाटली नाहीं हेही आपण विसरतों त्या वेळच्या लोकाच्या दृष्टीनें त्या कृत्यात विशेष असे काहीच नव्हते. आपल्या साऱ्या आयुष्यक्रमात हा एक मोठा धडा आपण शिकण्यासारखा आहे हेही येथे आपणास सांगून ठेवणे इष्ट आहे परकीयाच्या कृत्यावर टीका करताना त्याचा बरा वाईटपणा आपण आपल्या कल्पनांप्रमाणें ठरवीत असतों, पण असें करणें योग्य नाहीं हें आपण लक्षात ठेविले पाहिजे. प्रत्येकाच्या कृत्यांचे बरे वाईटपण त्याच्या स्वत.च्या कल्पनावरून ठरविले पाहिजे. अशा ठिकणी दुसऱ्या कोणाचा तराजू उपयोगी पडणार नाही. आजूबाजूच्या लोकाशी वागत असता आपण नित्य हीच चूक करीत असतों. आणि आपल्या आयुष्यात अनेकवार जे तंट्याचे प्रसंग येतात त्यापैकी बहुतेकांच्या मुळाशी हें एकच कारण आहे असें माझें मत आहे. लोकाच्या कृत्याचा बरेवाईटपणा आपण आपल्या दृष्टीनें ठरवीत असतों. आपल्या स्वत.च्या हेतूवरून लोकाच्या हेतूची पारख आपण करीत असतों. आपल्या ध्येयावरून लोकाची ध्येये आपण ठरवीत असतों. एखाद्या विशिष्ट प्रसंगी एखादी गोष्ट मी करतो आणि दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं दुसरा एखादा मनुष्य तीच गोष्ट करू लागला म्हणजे त्याचा हेतूही माझ्याप्रमाणेंच असावा अशी माझी कल्पना होते. तथापि एखाद्या कृतीचा परिणाम तोच

असला तरी ती कृती घडून येण्यास लागणारी कारणें वेगवेगळीं असू शकतील हें माझ्या स्वप्नीही येत नाही. ते विशिष्ट कृत्य करीत असता ज्या हेतूने मी प्रेरित झालों होतों त्याहून त्या दुसऱ्या गृहस्थाचा हेतु अगदीं भिन्न असण्याचाही सभव आहे. त्याचप्रमाणें प्राचीन धर्मविषयक कल्पनाबद्दल विचार करीत असता आपण त्या काळाशी एकरूप होऊन त्या काळाची विचारसरणी व त्या काळाचा आयुष्यक्रम इतक्या गोष्टी लक्षात घेऊन त्याचा विचार केला पाहिजे.

जुन्या करारांत जिहोवाच्या ज्या क्रूर कृत्यांचें वर्णन केले आहे, तीं पुष्कळ लोकास अत्यत भयप्रद वाटतात. असे कां व्हावें ? परमेश्वरविषयक म्हणून जो काहीं कल्पनासमूह वर्तमानकाळी मान्य झाला आहे तोच कल्पनासमूह जिहोवासही मान्य होता असे गृहीत धरण्याचा अधिकार आपणास काय आहे ? आपले भावी वशज कदाचित् आपल्या ईश्वरविषयक कल्पनाची थट्टा करतील आणि त्याबरोबरच प्राचीन काळच्या कल्पनासही हसतील हें आपण लक्ष्यांत ठेविले पाहिजे. अशा रीतीनें कालचक्राबरोबर या कल्पनात भेद होत जात असताही या सर्वांच्या पोटीं एकतानतेचा एक सुवर्ण ततु आहे हे आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. हा सुवर्ण ततु कोणता हे शोधून काढणें हें वेदाताचे कार्य आहे. **'मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव'** ( भग. ७ श्लोक ) असें भगवान् श्रीकृष्णानीं म्हटले आहे हा सुवर्ण ततु आपणच आहो असे ते सागतात. या सुवर्ण ततूत ओवलेले वेगवेगळे मणी कितीही विसदृश असले व आपल्या आजच्या दृष्टीनें यातील कांही कांहीं मणी कितीही किळसवाणे वाटत असले तरी ते एकाच सुवर्ण ततूच्या सूत्राने बद्ध झाले आहेत असे सिद्ध करणे हें वेदाताचें कार्य आहे. ज्या काळीं या कल्पना अस्तित्वात आल्या त्या काळाला त्या अगदी योग्यच होत्या. आपल्या चालू काळाला आपल्या कल्पना जशा आपणास योग्य वाटतात त्याचप्रमाणें त्या काळच्या लोकांस त्या कल्पना तितक्याच योग्य वाटत होत्या. त्या काळीं त्यात त्याना कोणताही हिडीसपणा दिसत नव्हता. त्या काळांतून आणि त्या वातावरणांतून उचलून त्याना आपण बाहेर आणिलें व आपल्या चालू परिस्थितीच्या चौकटींत त्यांस आपण बसविले म्हणजे त्या हिडीस व भेसूर दिसू लाग-

तात नव्या वातावरणांत त्याची योजना आपण केली म्हणजे जुनें वातावरण मरून गेलेलें असते हें आपण विसरतो आणि यामुळे आपली दृष्टीच अनधिकारी होते. आतां पूर्वीचें वातावरण साफ बदलले आहे पूर्वीचे यहुदी लोक जाऊन त्यांच्या जागी सांप्रतचे तीव्र दृष्टीचे आणि चलाख असे यहुदी निर्माण झाले आहेत. प्राचीन काळच्या आर्य लोकाच्या जागी बुद्धिमान् हिंदु लोक आता अवतीर्ण झाले आहेत त्याचप्रमाणे पूर्वीचा जिहोवा आणि पूर्वीचे देव नाहीसे होऊन त्या जागी नवे देव व नवा जिहोवा उत्पन्न झाला आहे. पूजनांत झालेली उत्क्राति मात्र आपण लक्षात घेतो आणि पूज्यांत झालेला विकास आपण विसरतों पूजकाची जशी वाढ झाली आहे त्याचप्रमाणें पूज्यांचीही झालेली आहे हें आपण ध्यानात धरीत नाही, ही आपली मोठी चूक होय ज्याप्रमाणें भक्तानी आपली योग्यता वाढविली आहे, त्याचप्रमाणे त्याच्या देवानीही ती वाढविली आहे. भक्ताबरोबर देवाचाही विकास झाला आहे. याचा अर्थ असा कीं पूर्वीच्या लोकाहून ज्याप्रमाणे आपल्या कल्पना आज अधिक विकास पावलेल्या आहेत, त्याप्रमाणे या कल्पनानीं निर्माण केलेले देवही पूर्वीहून आज अधिक विकास पावलेले आहेत ईश्वर विकास पावू शकतो हें म्हणणें तुम्हास थोडेसें चमत्कारिक वाटेल परमेश्वर बदलण्यास पात्र नाहीं यामुळें त्यात कमी अधिकपणा होऊ शकत नाही पण याच तत्त्वदृष्टीनें विचार करावयाचा म्हटले तर मनुष्यही विकास पावू शकत नाही असेच म्हटले पाहिजे. मनुष्यात मनुष्यत्व म्हणून जें काही आहे ते सर्वदा एकरूपच आहे तथापि मनुष्याच्या मनातील ईश्वरविषयक कल्पना एकसारख्या बदलत असून एकसारख्या त्या विकासही पावत आहेत आपल्या जडदृष्टीला दिसणाऱ्या जड मानवी देहाच्या पाठीमागे जें सत्यस्वरूप आहे ते केव्हाच बदलत नाहीं, याबद्दलचा विचार आपण पुढें केव्हांतरी करू. हें स्वरूप सदा पवित्र आणि सदा पूर्ण कसे आहे हे आपण पुढे केव्हांतरी पाहू. मनुष्याचे खरें स्वरूप चिरस्थायी असताही ज्याप्रमाणें कल्पनारूपाने त्याच्या स्वरूपात भेद होत असतो आणि तें बदलत असतें, त्याचप्रमाणें कल्पनांतर्गत ईश्वरस्वरूपही बदलत जाते ज्याअर्थी आपल्या कल्पनेंतूनच त्याची उत्पत्ति झाली आहे त्याअर्थी कल्पना बदलतील त्याप्रमाणें तोही बदलेल यांत नवल काय ? या आपल्या कल्पना-

मय दृश्य अथवा मूर्त परमेश्वरस्वरूपामागें सत्यरूप असून तें कधींही बदलत नाही. त्यात कधींही भेद होत नसून ते सदा शुद्ध आहे. पण मूळचें रूप सदा शुद्ध असतांही त्याचें दृश्य अथवा स्पष्ट रूप सदोदित बदलत असतें. या बदलण्याच्या क्रियेंत मूळचें खरें रूप अधिकाधिक प्रमाणावर व्यक्त होत जातें ज्या वेळी मूळचें सत्य रूप अधिकाधिक स्पष्ट होते त्या वेळीं आपल्या कल्पनात उत्क्राति होत असते, आणि त्या विकास पावत असतात, आणि ज्या वेळी हें रूप अधिकाधिक गूढ आणि अधुक होत जातें त्या वेळीं आपल्या कल्पना अपक्रांत होत असतात अशा रीतीनें आपला विकास होत असतां देवतांचाही विकास होत असतो. ज्या प्रमाणाने आपली उत्क्रांति अथवा अपक्रांति होते त्याचप्रमाणानें देवताचीही उत्क्राति अथवा अपक्रांति होते.

मायावाद म्हणजे काय याचा विचार आपण आता करू. विश्वात चोहोंकडे जो परस्परविरोध आढळून येतो तो का या प्रश्नाचा विचार जगातील सर्व धर्मांनीं आपापल्यापरी केला आहे. जगांत इतका वाईटपणा कां भरला आहे याचीं उत्तरें त्यानी आपापल्या परी देण्याचा यत्न केला आहे. जे धर्म अद्यापि अगदीं बाल्यावस्थेंत आहेत त्यात मात्र हा प्रश्न उपस्थित केलेला नाहीं. बाल्यावस्थेतील मनुष्याला जगांतील परस्परविरोधी स्थितीचा भास फारसा होतच नाहीं. यामुळें हा प्रश्न जेथे उद्भवत नाहीं तेथे त्याचें उत्तरही नसावें हें युक्तच आहे बाल्यावस्थेंतील समाजात फारसा मतविरोध नाहीं त्यामुळें त्यात फारसे प्रश्न उद्भवत नाहींत अथवा त्याची चर्चाही होत नाहीं. यामुळें अमुक चागलें अथवा अमुक वाईट असा निर्णय करण्याच्या भानगडींत कोणी पडत नाही. केवळ स्वतःच्या दृष्टीनें जें चागलें अथवा वाईट त्याला दिसेल त्याप्रमाणें त्यानें वागावे. कोणत्याही वस्तूचा बरेवाईटपणा बाल्यावस्थेतील समाजात चर्चेनें ठरविला जात नसून त्याविषयीं प्रत्येक व्यक्ति आपापले मत बनवीत असते. बाल्यावस्थेतील मनुष्य हा भावनामय प्राणी असतो अमुक एक गोष्ट करावी असें एकवार त्याच्या मनानें घेतलें म्हणजे आपल्या मनगटाच्या जोरावर ती तो करतो. ती बरी आहे कीं वाईट आहे याचा विचार तो करीत नाही अथवा आपल्या मनासही तो आवरीत नाहीं. अशा लोकाच्या देवता केवळ भावनामय होत्या हें योग्यच

होय. भावनामय भक्ताची देवताही भावनामय असावयाची इंद्र आला व त्यानें असुरांचा नि पात केला अशा प्रकारची वर्णनें ही भावनामय देवतांची वर्णनें होत जिहोवा एखाद्या व्यक्तीवर प्रेम करितो व दुसऱ्या एका व्यक्तीवर तो कोप करतो. त्याच्या प्रेमाला ज्याप्रमाणे कारण लागत नाही त्याप्रमाणें त्याच्या रागालाहि ते लागत नाही जिहोवा कोणत्या गोष्टीनें खुष होतो अथवा कोणत्या गोष्टीने रागाला येतो, हा प्रश्न त्याच्या भक्तानी कधी उपस्थितच केला नाही तो जे काही करील ते चागलेच आपल्या दृष्टीने आतां अगदीं घाणेरडी अशी दिसणारी अनेक दुष्कृत्ये देवानी केली साप्रतच्या दृष्टीनें नीतिविघातक अशीं दुष्कृत्ये इद्राने केली असल्याचे वर्णन आढळून येते, पण इद्राच्या भक्ताना चागले आणि वाईट असा भेद दिसत नसल्यामुळें या दृष्टीने इद्राच्या कृत्याचा विचार त्यानी कधीच केला नाही

नीतिविषयक कल्पनाचा विकास जसजसा होत गेला तसतसा मतविरोधही वाढत गेला मनुष्याच्या ठिकाणी एका नव्या इद्रियाचा उदय झाला. या इद्रियाला निरनिराळया भाषात निरनिराळी नावे आहेत. कोणी त्याला परमेश्वराची आज्ञा असें म्हणतात, दुसरे कोणी पूर्वकर्मानुसार बुद्धि असेंही नांव देतात त्याला नाव वाटेल ते द्या. त्याचे कार्य इतकेंच की, मनुष्यातील विकार दाबून टाकावयाचे अमुक गोष्ट कर असा विकार चित्तात उठल्याबरोबर ही बुद्धि जागृत होऊन 'करू नको' असे म्हणते मनात आलेल्या कोणत्याही विकाराला इद्रियद्वारें प्रत्यक्षत्वास आणून त्याला खुशाल वावरू द्यावें अशी धडपड मानवी मनांत नित्य सुरू असते. त्याच्या चित्तातील एक कल्पनासमूह अशा रीतीनें वागण्यास त्याला प्रोत्साहन देत असतो. आणि त्याच कल्पनासमूहामागे एक कदाचित् अस्पष्ट आणि दुर्बल असा ध्वनि 'इद्रियाबाहेर जाऊ नको' अशी आज्ञा करीत असतो या दोन कल्पनासमूहांस संस्कृतात प्रवृत्ति आणि निवृत्ति अशी दोन सुदर नांवें दिली आहेत. प्रवृत्ति म्हणजे इद्रियद्वारा बाहेर येणें आणि निवृत्ति म्हणजे आत जाणें. 'आपलीं बहुतेक कृत्ये प्रवृत्तीच्या हुकमाने होत असतात. निवृत्ति जेथे सुरू होते तेथेच धर्माचा मार्ग सुरू होतो. 'अमुक करू नको' हा धर्माचा आरंभ होय. हा दैवी भावनाचा उदय होय. 'करू नको' ही आज्ञा जेथें उमटत नाहीं तेथें धर्माला प्रारंभ झालेला नाहीं असें समजावे. 'करू नको' या भावनेचा उदय झाल्याबरोबर मानवी मनातील कल्पना बिस्तार पावू लागल्या.

मानवी मनात प्रेमाचें थोडेंसें बीजारोपण झालें. हें प्रमाण अगदीं थोडें होते आणि आतां तरी ते विशेष वाढलें आहे असें नाही. तथापि त्याचा थोडासा ओलावा मानवी अत करणाला प्राप्त झाला आहे. मानवी वशांतील लहान लहान जातीत अथवा त्या जातींतील काहीं थोड्याशा व्यक्तींतच प्रथम हा उदय झाला होता. यापुढें त्या जातींपुरत्या अथवा शाखापुरत्या ज्या विशिष्ट देवता आढळतात त्या अशतः तरी प्रेममय देवता आहेत त्या देवताच्या ठिकाणी आपल्या भक्तांबद्दल प्रेम असून त्याचे सरक्षण करताना त्या आढळतात कित्येक वेळी त्या जातीतील प्रमुख स्वत स त्या देवताचे वशज म्हणवितानाही आढळतात. आपण चन्द्रवशी अथवा सूर्यवशी आहोंत असे म्हणविणारे लोक अद्यापि आहेत सूर्यवशातील विख्यात राजाची चरित्रें संस्कृत ग्रथात नमूद केलेली आहेत. त्यांच्या कुलात चद्र आणि सूर्य याची उपासना प्रारभी रूढ होती आणि पुढे त्यातील वशज आपणास सूर्यवशी अथवा चन्द्रवशी म्हणवू लागले अशा रीतीने मानवी मनाचा विकास होत जाण्याबरोबर त्या ठिकाणीं प्रेमाच्या आणि परस्परसाह्याच्या भावना उद्भवू लागल्या तेथे परस्परबधुभावाचे नाते उत्पन्न झाले आणि त्याबरोबरच इतर कर्तव्येंही उत्पन्न झाली अशा रीतीने त्या समाजाला थोडेसे सघटित रूप येऊ लागले. समाजघटना सुरू होताच 'दे वाण घे वाण' अर्थातच सुरू झाली लोकांकडून थोडासा उपसर्ग सोसल्याशिवाय अथवा त्याबद्दल त्याला क्षमा केल्याशिवाय समाजबधन कसे टिकू शकेल ? असा प्रश्न त्याच्या चित्तात आपोआपच उपस्थित झाला. आपल्या भावनांस मोकळें फिरू दिले तर समाजबधन टिकणार नाही असे आढळून येताच भावनावर दाब ठेविला पाहिजे अशी भावना आपोआपच उत्पन्न झाली. अशा रीतीनें सयम या भावनेचा उदय झाला. सयमाच्या मूळ पायावरच सर्व समाजघटना उभारलेली आहे. ज्याला सयम नाहीं अशा मनुष्याचें जीवित किती दुःखमय व कष्टाचें असते याचा अनुभव सामान्य व्यवहारातही आपणांस नित्य येतोच.

अशा प्रकारच्या धर्मकल्पनांच्या उदयाबरोबर मानवी मन अधिक उदात्त होत गेले व तेथे उच्चतर नीतिकल्पनाचाही उदय झाला. त्याबरोबर प्राचीन काळच्या देवतांचाही लोप होत गेला. सदोदित युद्ध करणाऱ्या,

मदिरापानानें धुद होणाऱ्या आणि गोमांस भक्षण करणाऱ्या प्राचीन काळच्या देवता या अधिक विकास पावलेल्या मानवी मनास पटेनाशा झाल्या. इंद्र कधीं कधी इतके मदिरापान करीत असे की अखेरीस जमिनीवर पडून तो अद्वातद्वा बरळत सुटे, अशा प्रकारच्या देवतास रजा मिळाली. विवेचक बुद्धीचा उदय मानवी मनात जसजसा होत गेला, तसा तसा कार्यकारण-भावाचा झगडाही तेथे सुरू झाला. एखादी गोष्ट घडली तर ती तशी का घडली याची चौकशी मानवी मन करू लागले अशा चौकशीत या देवतांस आपली बाजू व्यवस्थित रीतीनें पुढे माडता आली नाही, यामुळें काही देवतांस पूर्ण रजा मिळाली आणि दुसऱ्या कित्येकाच्या स्वरूपात बदल झाला देवदेवताबद्दल जणू काण पूर्ण चौकशी होऊन कमी दर्जाच्या देवतास रजा देण्यात आली आणि तारतम्य बुद्धीस पटणाऱ्या देवतास स्थान मिळाले. या शिल्लक उरलेल्या देवताना, देवता म्हणजे क्षुद्र देव हें नाव जाऊन त्या-जागीं देवाधिदेव अशी संज्ञा प्राप्त झाली. देव म्हणजे नुसता लोकोत्तर शक्तिमान प्राणी एवढ्याच कल्पनेने विकास पावलेल्या या मानवी मनाचे समाधान होईनासें झाले नुसत्या शक्तीपेक्षा त्याच्या आगी अधिक नीतिही असली पाहिजे असें त्याच्या भक्तास वाटू लागले या कालातील देवता मनुष्यावर प्रेम करणाऱ्या असून आपल्या भक्ताना त्या कल्याणकारक होत्या. या कालीही अनेक देवताची कल्पना शिल्लक राहिली होती. या देवता प्राचीन काळच्या देवताहून अधिक नीतिमान आणि शक्तिमानही होत्या देव हा साऱ्या विश्वात अत्यत शक्तिमान आणि अत्यत नीतिमान आहे अशी कल्पना या काली रूढ झाली.

अशा रीतीनें देवता व भक्त यांजमध्ये तडजोड झाली खरी पण तीही अक्षय टिकाऊ नव्हती प्रत्येक गोष्टीचा कार्यकारण भाव समजावा ही कल्पना मानवी मनात जसजशी अधिक विकास पावू लागली तसतशा या ज्ञानाच्या मार्गांतील अडचणीही वाढू लागल्या. परमेश्वरविषयक कल्पनेंतील गुण गणित श्रेढीनें वाढत असतां मनुष्याच्या मनांतील सशय भूमितिश्रेढीनें वाढत गेले. जिहोवाच्या वेळीं मनुष्याच्या मनात नसलेले सशय विश्वव्यापी परमेश्वराच्या वेळीं मनुष्याच्या मनात उत्पन्न झाले. आणि हा प्रश्न आज-तागाईत तसाच राहिला. सर्व शक्तिमान् आणि विश्वावर प्रेम करणाऱ्या

परमेश्वराच्या अमदानीत भयंकर कृत्यास वावरण्यास मुभा कशी मिळते हा प्रश्न आजमितीसही तसाच भिजत पडलेला आहे 'सुख पाहतां जवापाडे आणि दुःख पर्वताएवढें' अशी स्थिति का असावी? चांगल्याहून वाईट अधिक प्रमाणात का असावें इत्यादि प्रश्न पूर्वीप्रमाणेंच आजही न सुटतां जिवंत राहिले आहेत. अशा प्रकारचे प्रश्न आपण कितीही मनाआड केले तरी त्याचे अस्तित्व नाहीसे होत नाही जग किळसवाण्या रूपाचे आहे ही गोष्ट विसरूनही विसरत नाही इंद्रियांचे भोग भोगावे ही इच्छा आमच्या मनात पूर्वीइतकीच आजही जाज्ज्वल्य आहे आणि अद्यापिही ती पूर्वीइतकीच अतृप्त राहिली आहे. आमच्या मनातील या भावना अद्यापि पूर्वी इतक्याच ताज्या आहेत. प्रसंगी एखादी लाट उठते आणि आमची इच्छा नसतांही आम्हांस पुढे घेऊन जाते पण इतक्यात आणखी एखादा तडाखा आमच्या मस्तकावर येऊन आदळतो. कित्येक वेळा इंद्रियातीत अशा प्रकारच्या कल्पनांचा उदय आमच्या चित्तात होतो, पण त्यांना मूर्तस्वरूप देण्याचा उद्योग आमच्या हातून होत नाही उलटपक्षीं आमच्याभोंवती उठणाऱ्या इतर भावनांच्या लाटा आम्हास खाली दडपून टाकतात आणि कित्येक वेळा त्यांच्या जबर दडपणाखालीं आमचा चुराडा उडून जातो. अशा प्रकारच्या अनंत अडचणी माझ्याभोंवती आहेत हे खरें पण त्यांना भिऊन माझें उच्च साध्य मी सोडून दिलें व जगाच्या प्रवाहाबरोबर मी वाहू लागलों तर माझें आणि पशूचे जीवित ही एकाच किंमतीचीं होतील आणि अशा रीतीनें आपल्या उच्च पायरीवरून घसरून मी पशूच्या कोटीस जाईन. अशारीतीने एका बाजूस आड आणि दुसऱ्या बाजूस विहीर असे मला झालें आहे. उच्च साध्याकडे जाण्याचा यत्न करावा तर आजूबाजूची परिस्थिति मगरासारखी पायाला झोंबून मला खाली ओढते आणि जगाच्या प्रवाहाबरोबर वाहू लागावे तर मी पशूच्या कोटीस जातों. एवंच सुख दोन्ही बाजूस दिसत नाही. जगात ज्या स्थितींत जन्म झाला त्या स्थितींत कसेबसे आयुष्याचे दिवस मोजीत बसावे एवढीच ज्यांची इच्छा असेल त्यांच्या नशीबीं दुःख लिहिलेलेंच आहे पण सत्य वस्तूच्या प्राप्तीसाठीं झगडण्याची आणि आपणास उच्चतम अवस्था प्राप्त करून घेण्याची ज्यांची इच्छा आहे त्यांना तर दुःख हजारपटीने अधिक गाजते. वस्तुस्थिति

अशा प्रकारची आहे. आणि ती अशी का असावी याचा उलगडा कोणी केलेला नाही हा उलगडा होणे शक्य नाही, तथापि हें असे का या प्रश्नाचें उत्तर जरी वेदाताने दिलेले नाही, तरी या परिस्थितीतून बाहेर पडण्याचा मार्ग त्याने दाखविला आहे. मी सागितलेल्या गोष्टी ऐकून तुमच्या हृदयात भीतीने कदाचित् धडकी बसेल, पण माझे म्हणणे ऐकून घेऊन ते ध्यानात धरून आणि त्याजबद्दल विवेक करून ते पूर्णपणे तुम्हीं आपलेसे करून टाकले, तर ते ज्ञान तुमच्या पचनीं पडून तुम्हास अधिक वरच्या पदवीस घेऊन जाईल त्याच्या प्रकाशात सत्य वस्तूची ओळख करून घेण्याची पात्रता तुमच्या आगी येईल आणि त्याचा प्रत्यक्ष आचार करण्यास लागणारें धैर्यही तुम्हास प्राप्त होईल.

हे जग म्हणजे परस्परविरोधी वस्तूनी भरलेला नरक होय, ही गोष्ट अगदी खरी आहे या म्हणण्यात असत्याचा अशही नाही. विश्वाबद्दल आपणास फारसे ज्ञान नाही हे जसे खरे आहे, त्याच प्रमाणे ते अगदीच नाहीं असेंही म्हणता येत नाहीं ही समोर दिसणारी माखळी कसल्या प्रकारची वस्तु आहे याचा बोध मला झालेला नाही तोवर तिला वास्तविक अस्तित्व आहे असे मला म्हणता येणार नाही कारण, तिचे दृश्य अस्तित्व हा कदाचित् माझ्या मेदूच्या भ्रमाचा परिणामहि असू शकेल. तिचे दिसणे हे कदाचित् माझ्या मेदूचे स्वप्नही असू शकेल. मी आता तुम्हाशी बोलत आहे हाही कदाचित् स्वप्नभ्रम असू शकेल हा भ्रम नाहीच नाहीं असे कोणी सिद्ध करू शकत नाही फार काय, मला मेदू आहे ही कल्पनासुद्धा कदाचित् भ्रममूलक असेल. माझा स्वत चा मेदूतरी मीं कोठे पाहिला आहे? स्वत चा मेंदू आपणापैकी कोणीही पाहिला नसता तो आहे असें आपण गृहीत धरीत असतों अशाच रीतीने आपले सारे आयुष्य गृहीत कृत्यानी भरलेले आहे. 'मला देह आहे' हेही मी पूर्वीच गृहीत केलेलें आहे. अशा रीतीने या गृहीत कृत्याच्या अस्तित्वाचा पुरावा मला देता आला नाही, तरी तीं नाहीतच असेंही मला म्हणतां येत नाही. खरे आहे असे सिद्ध करतां येत नाही आणि खोटे आहे असे म्हणण्याची छाती नाही. अशा रीतीने आपण सारे या विलक्षण सधिप्रकाशात उभे आहो. एका बाजूला ज्ञानाचा प्रकाश आणि दुसऱ्या बाजूला अज्ञानाचा गडद अधार; एकीकडे पूर्ण सत्य

आणि दुसरीकडे मूर्तिमत असत्य या दोहोंच्या सरहद्दीवर आपण उभे आहो, पण एकाची हद्द सपते कोठें आणि दुसऱ्याची लागते कोठें हें कोणासही सांगता येत नाही आपण सारे स्वप्नात भटकत आहो. आपण धड जागे नाही आणि धड निद्रावशही नाही प्रकाश आणि अधार यानी मिश्र झालेल्या अर्धवट स्थितीत आपण सारा जन्म वावरत असतो हें नशीब आपणा सर्वांच्याच मागे लागले आहे इद्रियद्वारा मिळणाऱ्या ज्ञानाच्या नशीबी हेच लिहिलें आहे आमची शास्त्रे कितीही वाढलीं आणि कितीही नवी नवीं तत्त्वदर्शने आम्ही जन्मास घातली, तरी आमच्या साऱ्या ज्ञानाची इतिश्री इतकीच. विश्वाचे रूप असे आहे

ज्याला आपण वस्तु, मन, चैतन्य अथवा दुसरें कांही नांव देतो ती वस्तु खरोखर अस्तित्वांत आहे की नाही हे आपणांस सागता येत नाही. तसेंच या वस्तू अस्तित्वात नाहीत, असेही निश्चयाने म्हणता येत नाहीं. या वस्तू एकरूप आहेत की परस्परापासून भिन्नरूप आहेत, हेही आपणास सांगतां येत नाही. असा हा अर्धवट उजेड आणि अर्धवट अधार, अर्धवट स्पष्टपणा आणि अर्धवट अस्पष्टपणा, अर्धवट भिन्नता आणि अर्धवट एकरूपता याचा सयोग अखड चालू आहे विश्वाच्या आरभापासून आजपर्यंत ही अशीच अनिश्चित स्थिति एकसारखी चालूच आहे एका बाजूनें ती सत्यरूप आहे असे दिसते, तर दुसऱ्या पक्षी तिचे सत्यत्व नाहीसें झाल्यासारखें दिसते. स्पष्ट जाग्रदवस्थेत जणूकाय झोंप लागली आहे अशी ही स्थिति आहे. हा मताचा प्रश्न नाही अथवा उपपत्तीचाही नाहीं. जी वस्तुस्थिति आहे तीच सागितली आहे आणि तिलाच वेदांत्यानी माया हें नांव दिले आहे अशा रीतीने खरें नाहीं आणि खोटेही नाही असे जें अनिर्वचनीय रूप ती माया. या मायेत आपला जन्म होतो, जिवतपणीचे आपले सारे व्यापार याच मायेंत चालतात, आपले विचारही तिच्याच हद्दीत वावरत असतात आणि आपणांस स्पप्नें पडतात तींसुद्धां या मायेच्याच राज्यात आमचे सारे तत्त्वविचार तिच्यांतच असून दैवी संपत्तीने युक्त म्हणविणारे आम्हीही तिच्या हद्दीतच आहों. आमचा आसुरीपणा अथवा आमची दैवी वृत्ति या दोहींचेही वास्तव्य मायेंतच आहे. तुम्ही आपली कल्पनाशक्ति कितीही उच्च केली आणि तिच्या जोरावर कितीही उच्च भराऱ्या मारल्या,

आपली विचारशक्ति अनत आहे असे तुम्ही कितीही भासविले तरी या मायेच्या हद्दीपलीकडे तुम्ही जाऊ शकत नाही आपली विचारशक्ति तिची हद्द ओलांडील ही गोष्ट अगदीच अशक्य आहे आणि ज्ञान ? ज्ञान म्हणून आपण जें काही समजतों त्याचा वास्तविक अर्थ इतकाच की हे जग जसे दिसते तसे घेऊन त्यातील वस्तुजाताची सगती लावून त्याचें स्वरूप निश्चित करण्याचा यत्न करणे आपले मानवी ज्ञान यापलीकडे नाहीं नाम आणि रूप या सज्ञेने माया ओळखली जाते ज्याला काही रूप आहे आणि ज्याला पाहिल्याबरोबर तुमच्या मनांत कल्पना उत्पन्न होते, ते सर्व मायेच्या हद्दीच्या आंतलेच असून देश, काल आणि परिस्थिति याच्या कायद्यांनीं तें बद्ध आहे. या कायद्यानीं बद्ध असलेली प्रत्येक वस्तु मायेच्या हद्दींतली आहे

प्राचीनकाळी परमेश्वरविषयक कल्पना कशा प्रकारच्या होत्या आणि पुढें त्यांचे काय झाले या प्रश्नाकडे पुन्हा एकवार वळू अनेक देवताच्या कल्पनेची उत्क्रांति होत होत तिच्या जागीं सर्व शक्तिमान् आणि प्रेममय अशा परमेश्वराची योजना झाली याचा विचार आपण मागें केलाच आहे, तथापि परमेश्वरस्वरूपाच्या कल्पनेनेही मानवी मनाचे समाधान झाले नाहीं हा परमन्यायी आणि करुणामय परमेश्वर आहे तरी कोठे, असा प्रश्न तत्त्वजिज्ञासूच्या मनात उत्पन्न झाला लक्षावधि माणसे आणि इतर प्राणी मरत आहेत ही गोष्ट या करुणामयाला दिसत नाहीं काय ? **'जीवो जीवस्य जीवनम्'** हा सृष्टिक्रम अबाधित चालू असल्यामुळे एकाने मरून दुसऱ्यास जागा द्यावी, एकाच्या सुखाकरता दुसऱ्यानें दु ख भोगावे अथवा प्राण द्यावा असा प्रकार चालू असल्याचें या न्यायी परमेश्वराच्या नजरेस येत नाही काय ? हवेंत कोट्यवधि सूक्ष्म जतू वावरत असतात, आपल्या एका श्वासाबरोबर हजारोची आहुती पडते. अशा रीतीने लक्षावधि प्राण्याचा संहार करून अहोरात्र आपण जगत असतों आपल्या जीविताचा प्रत्येक क्षण, आपला प्रत्येक श्वासोच्छ्वास म्हणजे लक्षावधि प्राण्याचा संहार होय. लक्षावधि प्राण्यांना मारावे तेव्हां आपण क्षणभर जगावे. आपल्या मुखीं जाणारा प्रत्येक घांस दुसऱ्या एखाद्या क्षुधिताच्या तोंडून आपण ओढलेला असतो. अशा रीतीने तुम्हांस जगविण्यासाठी दुसऱ्या लक्षावधीनीं का मरावें ? यावर पुरातन

काळचे एक भोंदूपणाचे उत्तर आहे. तुम्हास जगविण्यासाठी लक्षावधि मरणारे जतु क्षुद्र कोटीतले असल्यामुळें त्याची किंमत हिशोबात धरण्याजोगी नाहीं असे हे उत्तर आहे त्याची किंमत वास्तविक काय आहे हे तोलण्याचा काटा आपणाजवळ नाही, तथापि ते क्षुद्र आहेत असेही गृहीत धरले तरी वास्तविक मुगीहून मनुष्याची किमत अधिक की मुगीची मनुष्याहून अधिक हें कोणी सागावे ? याचे निश्चयात्मक उत्तर कोणी देऊ शकेल काय ?

आतां हे जतु मनुष्याहून कमी योग्यतेचे आहेत की अधिक योग्यतेचे आहेत हा प्रश्न बाजूस ठेवला तरी येथे आणखी एक प्रश्न असा उद्भवतो कीं, मनुष्ये जिवत राहावी यासाठी ह्यानी का मरावे ? ते हलक्या दर्जाचे आहेत असे म्हटले तर वास्तविक जगण्याचा त्याना अधिक हक्क आहे, आणि असें का नसावे ? त्याचे सारें जीवित इद्रियगत असल्यामुळें इद्रियद्वारा होणाऱ्या सुखाच्या अथवा दु खाच्या सवेदना तुम्हा सर्वांपेक्षा त्याना हजारपटीने अधिक जाणवतात आपले भक्ष्य कुत्रा अथवा लाडगा जितक्या प्रतीच्या आसक्तीच्या सुखाने खातो तशी आसक्ति आपणा मनुष्याच्या ठिकाणी आढळून येते काय ? आपले भक्ष्य खात असता ते आपल्या सुखाचे जसे स्पष्ट प्रदर्शन करतात, तसे आपण मनुष्ये कधी करतो काय ? नाही, आपण तसे करीत नाही. कारण, आपल्या चैतन्याचे सारे सामर्थ्य इद्रियाच्या ठिकाणी येऊन बसलेले नाही ते चैतन्य बुद्धिगत अथवा अत.करणगत आहे. मनुष्याहून खालच्या प्रतीच्या प्राण्याची गोष्ट याहून वेगळी आहे. त्याचा सारा आत्मा त्याच्या इद्रियाच्या ठिकाणीं गोळा होऊन बसलेला असतो. यामुळें इद्रियजन्य सुखासाठी ते जणू काय वेडे होऊन जातात. ज्या गोष्टींपासून आपणास मोठे सुख होईल असे आपल्या स्वप्नीही येत नाहीं, असल्या गोष्टीनीं ते आनदाने बेहोष होतात आता सुखसवेदनाप्रमाणेच दुःखसवेदना जाणण्याचीही शक्ति ह्याजमध्यें अधिक असल्यामुळे सुखाप्रमाणेंच दु खही त्याना भयकर जाणवते. सुख आणि दु ख याच्या सवेदनाचे परिमाण एकसारखेंच असते. सुखसवेदना जाणण्याची त्यांची शक्ति मनुष्याच्या शक्तीहून ज्या अर्थी इतकी अधिक तीव्र आहे, त्याअर्थी दु ख जाणण्याची शक्तिही मनुष्याच्या शक्तीहून अधिक तीव्र नसली तरी तितकी तीव्र तरी असली पाहिजे. यावरून मृत्यूच्या जितक्या वेदना मनुष्यास

होत असतील अथवा जितके दु ख त्यास भासत असेल त्याहून हजारों पटीनें अधिक दु:ख खालच्या प्राण्याना अवश्य होत असलें पाहिजे. असें असतांही त्याच्या दु:खाचा यत्किंचित विचार न करता आम्ही त्यांचा वध खुशाल करीत असतो. याचे नाव माया. ज्या परमेश्वराने या विश्वांतली प्रत्येक वस्तु निर्माण केली असे आपण म्हणतों, तो आम्हा मनुष्यांप्रमाणेंच व्यक्तिविशिष्ट प्राणी असेल, तर या स्थितीचे समाधान म्हणून जीं उत्तरें देण्यांत येतात ती पुरीशी नाहीत त्यानी समाधान होण्यासारखें नाहीं. वाइटातूनही चांगले उद्भवते अशी एक उपपत्ति काही पडित सागतात ठीक आहे. हजारो चागल्या गोष्टी आल्या तर त्यास आमची हरकत नाहीं पण त्यांनी वाइटातूनच का निर्माण व्हावे ? हे तुमचे तत्त्व योग्य आहे असे म्हणावयाचे असेल, तर त्यालाच अनुसरून माझ्या पचेंद्रियाच्या सुखाकरिता दुसऱ्याचे गळे मी का कापू नये ? याकरिता तुमची ही उपपत्ति लागू पडते असे दिसत नाही. चागल्याने वाइटातून निर्माण का व्हावे हा आमचा प्रश्न आहे. या प्रश्नाचे उत्तर आजपर्यंत कोणी दिले नाही आणि पुढेही कोणी देऊ शकणार नाही या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही ही गोष्ट हिंदु तत्त्ववेत्त्यास कबूल करणे भाग पडले

धर्मविचार करण्यासाठी जितकी दर्शने आजपर्यंत उत्पन्न झाली, त्या सर्वांत वेदातदर्शन अत्यत धीट आणि अत्यत स्पष्ट असें आहे अखेरीस पोहचेपर्यंत वाटेत कुठेंही त्यानें मुक्काम केलेला नाही त्याला मुक्काम करण्यास कोणी भागही पाडले नाही. पाश्चात्य देशात धर्माच्या नावानें जे प्रकार घडले, तसले प्रकार हिंदुस्थानात कोणाच्या स्वप्नींही आले नाहींत. सत्यान्वेषणासाठी कोणी खटपट करतांना दिसला की कर त्याचा छळ आणि दे त्याला होळीत टाकून ! असला प्रकार युरोपाप्रमाणे हिंदुस्थानांत घडला नाही. धर्माचे स्वातत्र्य आमच्या देशाप्रमाणें दुसऱ्या कोठेंही आढळत नाहीं. लोकाच्या भोळसटपणामुळे बधन म्हणून जें कांहीं दिसतें, ते वास्तविक धार्मिक नसून सामाजिक स्वरूपाचे आहे. पाश्चात्य देशांत समाज अगदीं स्वतत्र आहे. उलट पक्षी हिंदुस्थानांत तो अत्यत नियमबद्ध आहे. पण धर्ममतासबधीं पाहता हिंदु लोकास पूर्ण स्वातत्र्य आहे. इग्लडात एखाद्या मनुष्यानें वाटेल तसा पेहेराव केला अथवा वाटेल ते भक्षण

केलें तरी त्याला कोणी विचारणार नाही पण तो रविवारच्या प्रार्थनेला गेला नाही, की एखादी सोंवळी आजीबाई त्याचे वाभाडे काढल्यावाचून राहणार नाहीं. धार्मिक बाबतीत सामान्य समाजाचे जें काही आचरण असेल, त्याच्याशी त्याने विरोध करता कामा नये सत्य काय आहे याचा विचार त्याला करावयाचा असेल, तर तो त्याने खुशाल करावा, पण आपले आचरण मात्र त्याने समाजाप्रमाणेच ठेवले पाहिजे हिंदुस्थानात एखाद्या मनुष्याने एखाद्या परजातीयाबरोबर अन्नव्यवहार केला, तर सारा समाज त्यावर कोसळून पडून त्याला अगदी भरडून टाकतो आपल्या बापदाद्याहून थोडासा वेगळा पोषाख त्याने केला की समाज त्याला अगदी सळो की पळो करून सोडतो. आगगाडी नवीच सुरू झाली तेव्हा ती पाहण्याकरितां एक मनुष्य आपल्या गावाहून बराच लांब गेला ही गोष्ट त्याच्या गावकऱ्यास समजताच त्यानीं त्याला वाळीत टाकल्याचे मला समजले. आता वास्तविक असा प्रकार घडला कीं नाही हे मला सांगता येत नाही. कदाचित् तसे घडलेही नसेल, तथापि यावरून हिंदुसमाजाची दिशा काय आहे हें समजते. पण धर्माच्या बाबीत आमच्यात शुद्ध निरीश्वरवादी खपतात, जडवादी चालतात, बौद्धाबद्दलही कोणी आक्षेप घेत नाहीत आणि नाना प्रकारचे उपासनाप्रकार इतके आहेत की त्यांची मोजदादही नाही यांतील काही उपासनाप्रकार तर एखाद्याला खरोखरीच चकित करतील; तथापि इतके विविध धर्म एकमेकाशेजारी गुण्यागोविंदाने नांदत आहेत. वाटेल त्या मनुष्याने उठावे आणि हवें ते मत प्रतिपादन करून आपणास अनुयायी मिळवावे. खुद्द देवळाच्या दाराशी एखादा जडवादी येऊन वाटेल ते बोलत सुटला तरी खुद्द त्या देवळाचे ब्राह्मणही त्याला हरकत करीत नाहीत. ब्राह्मणाचें हें धर्मादार्य स्तुतीला पात्र नाहीं असे कोण म्हणेल ?

बुद्ध पुष्कळ वृद्ध होऊन निर्वाणाप्रत गेला. एका विख्यात अमेरिकन शास्त्रज्ञाला बुद्धचरिताची मोठी गोडी लागली होती. बुद्धाला क्रुसावर खिळून कोणी मारलें नाहीं, याचेच त्याला मोठे वाईट वाटे. जणू काय कोणी तरी खून केल्यावाचून मनुष्याला मोठेपण येतच नाही. ही कल्पनासुद्धा अगदी वेडेपणाची आहे. असल्या प्रकारच्या कल्पनांस हिंदुस्थानात कधी थारा मिळाला नाहीं. देवदेवता खोट्या आणि सर्व विश्वाचा शास्ता परमेश्वरही

खोटा असें म्हणत बुद्ध साऱ्या हिंदुस्थानभर फिरत होता. असे असतांही त्याला दुखापत करण्याची सुद्धा कोणाला इच्छा झाली नाही. बुद्ध पचाऐशी वर्षें वाचला आणि या अवधीत निम्या हिंदुस्थानात त्याने आपल्या मताचा प्रसार केला

याशिवाय शुद्ध जडवादी चार्वाकानुयायीही हिंदुस्थानात पुष्कळ होऊन गेले. मनुष्य मरून त्याचा देह भस्मीभूत झाला की त्याला पुनरागमन नाहीं याकरिता वाटतील ती कर्में करून जगात यथेष्ट चैन भोगावी असे या पथाचे मत आहे. या एकोणिसाव्या शतकांत या मताचा नुसता उच्चार करण्यासही कोणी धजत नाही. असे असताही चार्वाकानुयायी आपल्या मताचा प्रसार करीत साऱ्या देशभर खुशाल हिडत. देवळादेवळानी जाऊन आणि गावोगाव फिरून सारे धर्म मूर्खपणाचे आहेत असे हे उघड बोलून दाखवीत वेद ही मूर्खांची बडबड असून धर्म म्हणजे भिक्षुकांचें बड आहे आणि परमेश्वर अथवा अनत आत्मा याना अस्तित्व नाही असे यांचे मत होते. ते असा प्रश्न करीत की मृत्यूनतर जर आत्मा जिवत राहात असेल तर स्त्रीपुत्रादिकाच्या मोहाने तो पुन्हा परत का येत नाहीं मृत्यूनतर तो जिवत रहात असेल तर त्याला खाणेपिणे आणि कपडेलत्ते याची जरूर भासणारच. पण तसे दिसत नसल्यामुळें आत्मा अमर आहे हे म्हणणेंच खोटे. असल्या प्रकारच्या भयकर चार्वाकवाद्यासही देशभर वावरण्यास पूर्ण मुभा होती.

अशा रीतीने हिदुस्थानात धर्मस्वातत्र्याची ही उच्च कल्पना फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे मनुष्याची वाढ स्वातत्र्यावर अवलबून आहे हे आपण लक्षात ठेविले पाहिजे. जेथे स्वातत्र्य नाही तेथे वाढही नाहीं. स्वत स गुरुस्थानी समजून आणि आपल्या हाती इतराचे क्रियास्वातत्र्य घेऊन त्यांजवर शिष्यत्व लादल्याने आपण त्याना चागले वळण लावून त्याची वाढ करू शकू हें म्हणणे अत्यत मूर्खपणाचे आहे. ते मूर्खपणाचे आहे इतकेच केवळ नव्हे, तर ते दुष्टपणाचेही आहे. नफ्याऐवजी त्यामुळें नुकसान मात्र खचित होईल. या मतामुळेंच जगातील लक्षावधि मानवी प्राण्याची वाढ आजपर्यंत खुटली आहे स्वातत्र्य हा प्रकाश होय. मानवी प्राण्याला हा प्रकाश मिळाल्याशिवाय त्याची वाढ होणें शक्य नाही. स्वातत्र्य असणे हे मनुष्याच्या वाढीला अत्यत आवश्यक आहे.

हिंदुस्थानात धार्मिक बाबीत असेंच स्वातंत्र्य सर्वांस असल्यामुळे धर्मविचाराची वाढ हिंदुस्थानाइतकी दुसऱ्या कोठेही झाली नाही आजमितीसहि अत्यंत उदात्त धर्मविचाराचा जन्म तेथेच होतो अशाच रीतीने सामाजिक स्वातंत्र्य त्याना मिळेल तर अत्यंत सुंदर अशी समाजरचनाही तेथे दृष्टीस पडेल. हिंदुस्थानांत सामाजिक बाबतीत स्वातंत्र्य नसल्यामुळे तेथील समाज खुरटा झाला आहे तुमच्या इकडे धार्मिक स्वातंत्र्य कधीच नव्हते आग आणि तरवार याच्या जोरावर आपली धर्ममते तुम्ही इतरावर खुशाल लादीत होता यामुळे येथे त्याची वाढ न होता तो खुरटा झाला आहे येथे जणू काय दिवसे दिवस तो झिजत चालला आहे हिंदुस्थानात सामाजिक बंधने ढिली करणें जसे अवश्य आहे, त्याचप्रमाणे धार्मिक बंधने ढिली करणे येथें अवश्य आहे. धर्माच्या पायात युरोपात जड शृंखला पडल्या आहेत त्यापासून त्याला मुक्त केले पाहिजे. मनुष्याची वाढ धार्मिक बाबीची असो, नैतिक असो अथवा सामाजिक असो ती या एकाच मुख्य तत्त्वावर अवलंबून आहे ही गोष्ट आपणा सर्वांच्या लक्षात आली तर आपल्या प्रत्येक दिवशींच्या आचाराविचारातही धर्म दिसू लागेल. सर्व शास्त्रे ही धर्माचीं वेगवेगळीं व्यक्तरूपे आहेत, ही गोष्ट वेदांताच्या अध्ययनाने तुमच्या ध्यानी येईल. त्याच प्रमाणे जगात वेगवेगळी दिसणारी रूपेही एकाच मूलतत्त्वाचे आविष्करण आहे, हेही वेदांताच्या अभ्यासाने तुम्हास समजू लागेल.

आज भौतिक शास्त्राची वाढ इतकी झाली असल्याचे कारण त्या बाबीत मनुष्याचे स्वातंत्र्य हेच होय, हें आतां आपल्या ध्यानात आलेंच असेल. सांप्रतच्या शास्त्रज्ञात दोन मुख्य पंथ आहेत. एक पंथ शुद्ध जडवादी असून सब झूठ म्हणणारा आहे, आणि दुसरा पंथ काहीं नवी रचना करण्याची खटपट करणारा आहे प्रत्येक समाजात या दोन्ही पंथाची माणसे आढळतात ही खरोखर मोठ्या नवलाची गोष्ट आहे. एखाद्या समाजात कांही वाईट गोष्ट आहे असें आढळले कीं तिजवर तुटून पडणारे व जणू काय आपण आपल्या शत्रूचा सूड घेत आहो अशा थाटानें वागणारे लोक तेथे तुम्हास दिसतील कित्येक वेळा या लोकाची कृति इतक्या विकोपास जाते की तिला शुद्ध आततायीपणाचे रूप येते. प्रत्येक समाजात असली आततायी माणसें असतात आणि स्त्रियाचा स्वभाव अत्यंत मनस्वी असल्या-

मुळे अशा पथात त्या अधिक प्रमाणाने सापडतात समाजातल्या असल्या आततायी माणसाला थोडे फार अनुयायी नेहमीच मिळतात कोणत्याही वस्तूची नासधूस करणे हे काम नेहमीच फार सोपे असते एखादा वेडा उठला तर क्षणार्धात एखाद्या वस्तूची मोडतोड करून टाकील. पण एकही नवी वस्तू त्याला बनविता येणार नाही असल्या आततायी माणसांच्या हातून कदाचित् थोडेसे चागले कार्य होत असेल, तथापि त्याच्या हातून चागल्यापेक्षा वाईटच अधिक होत असते सामाजिक सस्था एका दिवसात निर्माण होत असतात एखादी सस्था नाहीशी करावयाची म्हटले तर तिचा मूळ पाया शोधून तो प्रथम नाहीसा केला पाहिजे, एखाद्या समाजात एखादा वाईट आचार रूढ आहे असे समजा. आता तो नाहीसा करावा अशी कोणाची इच्छा असेल, तर समजाला नुसत्या शिव्या दिल्याने कोणताच कार्य-भाग होणार नाही. हा आचार कोणत्या कारणाने उत्पन्न झाला हे प्रथम शोधून काढले पाहिजे हे मूळ कारण तुम्ही नाहीसे केले की त्याचे पुढचे कार्यही आपोआप नाहीसें होईल अशा कामी नुसत्या शिव्याचा भडिमार करीत सुटल्यानें काही सुपरिणाम तर होणार नाहीच, पण झाला तर थोडा बहुत दुष्परिणाम हटकून होईल

समाजात रूढ झालेल्या वाईट गोष्टीचे उच्चाटन करावयाचे असेल तर त्याच्या मूळ कारणाचा शोध केला पाहिजे, ही गोष्ट आततायी लोकाशिवाय दुसऱ्याही काही लोकाच्या ध्यानात आली होती या लोकाच्या अतःकर-णात सहानुकपा वसत होती, ते आततायी नव्हते यामुळें ते समाजावर तुटून पडले नाहीत हे समाजाचे नेते म्हणजे साधु आणि सत्पुरुष होत. जगात जितके सत सत्पुरुष होऊन गेले तितक्या साऱ्याचा बाणा एकच होता तो हा की, पूर्वीच्या गोष्टीची मोडतोड करण्याचा उद्योग न करता त्यातील उणीवा त्यानी भरून काढल्या त्याच्या या कृतीचा खरा रोख पुष्कळाच्या ध्यानी न आल्यामुळे ते सवग लोकस्थितीस बळी पडत आहेत असाही आरोप त्याजवर पुष्कळांनी केला लोकाशी त्यानीं जी सहकारिता दाखविली तिचा विपर्यस्त अर्थ करून त्यांच्या शत्रूनी त्याजवर हल्ले केले. जद्यापिही जे सत सत्पुरुष अशा रीतीने कार्य करीत असतात, त्याजवर भित्रेपणाचा आरोप होत असतो. आपणास बरोबर वाटतें ते करण्याचे

मानसिक धैर्य त्याजपाशी नाही असे काही लोक म्हणतात; पण त्याच्या या कृतीचा अर्थ असा नाही. या संतांच्या मनात जे अनंत प्रेम वास करीत आहे, त्याजमध्ये केवढे सामर्थ्य आहे याचा उमज आततायी लोकांस कधींही पडावयाचा नाही. जगांतील सारीं माणसे म्हणजे स्वतःची मुलें लेकरेंच होत असे संतास वाटत असतें. आपल्या मुलांच्या कल्याणाबद्दल बाप जसा दक्ष असतो आणि स्वत त्यासाठीं मोठी झीज सोसतो त्याचप्रमाणें जगाच्या कल्याणाकरिता या संताच्या विभूति आपला देह झिजवीत असतात आपला कोणी कसाही अवमान केला तरी त्याजवर ते क्रोधास येत नाहीत. त्याच्या चित्तांत क्षमेचा वास सदोदित असतो. सहानुकंपेचा जिवंत झरा त्यांच्या हृदयांत असल्यामुळें प्रत्येकावर ते दया करतात. संत म्हणजे प्रत्यक्ष ईश्वरमूर्तीच होत मनुष्याची वाढ कशाप्रकारें होते हे त्यास माहीत असल्यामुळें अगदीं सावकाशपणें पण निश्चयानें ते आपले उपाय योजीत असतात. ऊठ आणि दे समाजाला शिव्या असें ते करीत नाहींत. असल्या कृतीने समाज भडकून मात्र जातो याकरता कोणालाही न दुखवितां समाजाला प्रेमानें कुरवाळून आणि थापटून थोपटून पायरी पायरीने ते त्याला उत्क्रांतीकडे नेतात उपनिषद् ग्रंथ ज्यानी निर्माण केले ते ऋषिजन अशाच प्रकारचे समाजनेते आणि समाजशास्ते होते. परमेश्वराबद्दल ज्या रानटी कल्पना पूर्वी अस्तित्वात होत्या, त्याचा मेळ संस्कृत कालातील नीतितत्त्वाशीं पडावयाचा नाही ही गोष्ट त्याच्या लक्षात आली होती. निरीश्वरवादी लोक कोणत्या तत्त्वाचें कथन करतात हेही त्यांस ठाऊक होते. त्यांच्या तत्त्वदर्शनातही पुष्कळ सत्य भरलें आहे हेही त्यास माहीत होते पण ज्या एका सूत्रानें समाज बद्ध होत्साता संघरूपाने राहिला आहे ते सूत्र तोडून टाकून नवी समाजरचना करण्याचा उद्योग जो कोणी करील त्याला खात्रीने अपयश येईल हेही त्याना ठाऊक होते.

अगदी नवें असे आपणांस काहीं करता येत नाही जुन्या वस्तूत अदलाबदल करावयाची एवढेच कायते आपल्या हातीं असते कोणतीही रचना आमूलाग्र नवी निर्माण करणे हे आपणास शक्यच नाहीं तर पूर्वीच्या घटनेंतील घटित वस्तूची जागा पालटून पूर्वीचे स्वरूप बदलणें इतकेच आपल्या हातीं असते. झाड ज्याप्रमाणें हळूहळू आणि पायरी पायरीने वाढून अखेरीस

फलद्रूप होते, त्याचप्रमाणें सावकाशीने आणि धीराधीरानें सत्य वस्तूकडे आपण चालत गेले पाहिजे. नवे सत्य शोधून काढण्याच्या भरीस आपण पडू नये, तर सत्याच्या मार्गात आड येणाऱ्या ज्या काही उणीवा असतील तेवढयाच भरून काढण्याचा उद्योग आपण करावा. अशाच रीतीने परमेश्वर-विषयक जुन्या कल्पनाचा उच्छेद करण्याच्या भरीस न पडता प्राचीन ऋषि-वर्यांनी सत्याचा अनुभव स्वत त्याच ठिकाणी घेण्याचा यत्न केला, आणि या यत्नाचे दृश्यफल वेदातदर्शन हें होय. पूर्वीच्या अनेक देवदेवताच्या कल्प-नातून आणि एकेश्वराच्या कल्पनेतूनही अधिकाधिक उच्च अवस्थेस जात जात अखेरीस ते केवल रूपापर्यंत पोंचले. 'सर्व खल्विदं ब्रह्म' हे अखेरचे सत्य त्यांस सापडले.

विश्वात दिसून येणाऱ्या विविधतेच्या पोटी जे एक सूत्र गोविले आहे ते ज्याला सापडले असेल, या मृत्यूच्या साम्राज्यात अनत जीविताचा वास आहे हे ज्याच्या अनुभवास आलें असेल आणि या जड व अज्ञानतिमिरमय जगाच्या पोटीं एक प्रकाश आणि एक सपूर्ण ज्ञान असल्याचे ज्याच्या अनु-भवास आले असेल त्यालाच चिरतन शांतीचा लाभ होईल. त्याशिवाय दुसऱ्या कोणालाच तो लाभ त्रिकालातही होणार नाही.

---

## माया आणि मुक्ति



शुभ्र मेघ ज्याप्रमाणे आकाशात येतात, त्याचप्रमाणे शुभ्र यशाने युक्त असा जन्म आम्ही घेतों असे एका कवीने कोठेसे म्हटले आहे तथापि आपणापैकीं पुष्कळाचा जन्म केवळ शुभ्र यशाने युक्त असतो असे नाही. सूर्याला आच्छादन करणारे काळे ढग ज्याप्रमाणें कित्येक वेळा येतात, त्या-प्रमाणें आपणापैकी कित्येकाची जीवितें अभ्रमय असतात. त्यात सर्वत्र यश नसते. याबद्दल कोणासही शका यावयाची नाही. पण आपणापैकी प्रत्येक-जण या जगद्रूपी रणागणावर युद्ध करण्यासाठी अवतरला आहे हें मात्र खरें. रडत, कढत आणि युद्ध करीत या अनत चैतन्यसागरातून बनेल त्या रीतीने आपला मार्ग काढावा यासाठीच आपणापैकीं प्रत्येकजणाने अवतार घेतला आहे. आपण एकसारखे पुढे पुढे जात आहो. आपल्या पाठीमागे

दीर्घ युगाचा काळ लोटला असून आपल्या पुढेंही अनंत विस्तार पसरला आहे. या विस्तारांत आपण एकसारखे पुढे जात आहों. मृत्यु येऊन आपणास या रणांगणांतून घेऊन जाईपर्यंत आपण पुढें चालत असतों रणांगणातून आपण बाहेर पडतों तेव्हा आपण विजयी झालेले असतो, कीं पराभव पावलेले असतो हेंही आपणास माहीत नसतें माया म्हणतात ती हीच. बालपणीं आपल्या हृदयावर आशेचा पगडा असतो. त्या वेळी सारें जग सुवर्णमय दिसत असते. नुकत्याच उघडलेल्या बालनेत्रांना हें जग सुवर्णमय रम्य देखाव्याप्रमाणे दिसत असते. या ठिकाणीं आपण म्हणू ते होईल असे त्याला वाटत असतें. यानंतर हे मूल मोठें होऊन पुढें पाऊल टाकू लागते त्या वेळी आपल्या परिणतीच्या आड पावलोपावली वज्रप्राय भिंती येत आहेत असे त्याला आढळून येते. आपली सारी शक्ति खर्च करून या भिंती पाडून पलीकडे जाण्यासाठीं तो त्याजवर धडका देत असतो तो जों जों पुढे जातो तो तो त्याचें साध्यही पलीकडे जात असते. अखेरीस मृत्यु त्याला या युद्धाच्या बाहेर नेतो. मृत्यूमुळें कदाचित् त्याची सुटकाही होत असेल. हीच माया. एखादा मनुष्य शास्त्रे धुंडाळू लागतो, तेव्हा त्याला अनिवार ज्ञानतृष्णेनें पछाडलेलें असते. या तृष्णेच्या तृप्तींत आपलें सर्वस्व गेले तरी त्याची क्षिति त्याला वाटत नाही. या युद्धांत कितीही वेळां त्याला अपयश आलें तरी पुढची आशा त्याला वाटतच असते तो एकसारखा पुढे पुढें सरत असतो आणि सृष्टीचीं रहस्ये बाहेर काढीत असतो सृष्टीच्या अत्यंत खोल अंतःकरणात बुड्या मारून मारून एक एक रहस्य तो बाहेर आणतो. हें सारें कशाकरिता ? त्याच्या या कृतीचा उद्देश काय ? त्याच्या या कृतीबद्दल आपण सारे त्याची स्तुति कां करतों ? त्याला मोठ्या कीर्तीचा लाभ होतो तो का ? मनुष्य आपल्या बळानें ज्या कांहीं घडामोडी करू शकतो त्याहून केवढाल्या तरी अधिक प्रचंड घडामोडी सृष्टि करीत असते आणि सृष्टि तर बोलून चालून जड आहे. तिच्यात चैतन्य नाहीं. याच जड आणि अचेतन सृष्टीचें अनुकरण करण्यात आपणांस मोठें भूषण कां वाटावें ? वाटेल तेवढ्या अंतरावर वाटेल तेवढ्या प्रचंड शक्तीचे वज्र सृष्टि फेकू शकते. या सृष्टीच्या वृत्तीचा अत्यंत अल्प असा अंश एखाद्या मनुष्यानें साध्य केला, तर आपण त्याची केवढी तरी स्तुति करितो. जणू काय तो देवच अवतरला आहे असें

आपल्या स्तुतीने आपण भासवीत असतो असें का ? जड आणि चैतन्यविहीन अशा सृष्टीचे अनुकरण केल्याबद्दल आपण त्याची स्तुति कां करावी ? गुरुत्वाकर्षणाचे सामर्थ्य एवढे प्रचड आहे की त्याच्या तडाख्याखालीं अत्यत प्रचड पर्वतसुद्धा विष्ठावत् होऊन जातील. पण हे गुरुत्वाकर्षण चैतन्यविहीन आहे. असल्या चैतन्यविहीन वस्तूचे अनुकरण करण्यात भूषण ते काय ? पण हे कसेही असले तरी असें अनुकरण करण्यासाठी आपण सारे धडपडत असतो हे मात्र खरें. हीच माया.

आपली इन्द्रिये आपल्या जीवात्म्याला बाहेर ओढीत असतात. ज्या ठिकाणी सुखाचा बिदूही सापडावयाचा नाही, अशा ठिकाणीच मनुष्य सुख शोधीत असतो त्या ठिकाणी आपणास चैन करता येईल आणि आनदाने नाचता बागडता येईल असे त्याला वाटत असते. अशा रीतीनें भलत्याच ठिकाणीं सुख शोधण्यात आपले प्रयत्न अनाठायी जात आहेत अशी ओरड कित्येक युगे आपल्या कर्णसपुटाशी होत आहे. सुखाचा वास या जगात नाही, हा मत्र आपल्या कर्णरध्रात कित्येक युगे ओतला जात आहे. पण यापासून काही बोध घ्यावा हे आपणास साधतच नाही. ही गोष्ट आपणास अगदीं अशक्य होऊन बसली आहे. केवळ उपदेशाने हे कधींही साध्य होणार नाही. येथे अनुभव हाच खरा गुरु आहे. सृष्टीत सुख शोधण्याची धडपड आपण करतों आणि इतक्यात एखादा धपाटा पाठीवर येऊन आदळतो. एवढे झाले म्हणजे आम्ही शाहाणे होतों काय ? छे छे, एवढ्यानें आमचे डोळे उघडत नाहींत. पतग ज्याप्रमाणे बिनदिक्कतपणे दिव्यावर जाऊन पडतो, त्याप्रमाणे इन्द्रियसुखाच्या डोहांत बेमुर्वतपणें आपण उडी घालतो. त्या ठिकाणी आपणास तृप्ति सापडेल अशी आपणास आशा असते. ही आपली आशा पुन पुन्हां फुकट जाते तथापि पुन पुन्हा नव्या उमेदीने आपण बुड्या मारीतच असतों. अशा रीतीने बुड्या मारता मारता आपलीं इन्द्रिये गलित होतात, आपली सारी फसवणूक होते आणि आपण यमाच्या राजधानीत प्रवेश करतों. हीच माया.

आपल्या बुद्धीचीही गत हीच. विश्वाच्या रहस्यांचें कोडे उलगडावें या हेतूनें प्रेरित होऊन आपली बुद्धि धडपड करू लागते. कांही झाले तरी तिचे प्रश्न सपतच नाहींत. या कोड्याचे उत्तर मिळालेच पाहिजे असे आप-

णांस वाटत असते याचें उत्तर मिळावयाचे नाही असे कोणीं कितीही आ-
र्जवून सागितले तरी त्यावर आमचा भरवसा बसतच नाही कांहीं थोड्याशा
पायऱ्या आपण चढतो न चढतों, तोंच अनादि आणि अनत अशी भिंत
आपल्यापुढे आडवी पडते हिजवरून उडी मारून पलीकडे जाण्याचे सामर्थ्य
आपणास नाही थोडेसे अतर आपण चालतो न चालतो तोंच अनत विस्तार
आपणासमोर दिसू लागतो आणि हा विस्तार तोडून पलीकडे जाण्याचे सामर्थ्य
आपणांस नाही जिकडे पहावे तिकडे कारण आणि कार्य यांच्या मर्यादेनें सर्व
विश्व पक्के जखडले गेले आहे असे आपणास आढळून येते. या कार्यकारणा-
पलीकडे उडी मारण्याचें सामर्थ्य आपणास नाहीं, पण असे असताही आपली
धडपड सुरू आहे आणि पुढेही ती सुरू राहणारच हीच माया

आपल्या प्रत्येक श्वासोच्छ्वासाबरोबर, आपल्या हृदयाच्या प्रत्येक ठोक्या-
बरोबर आणि आपल्या प्रत्येक हालचालीबरोबर आपण स्वतत्र आहों अशी
भावना आपल्या ठिकाणी सचरत असते. आणि त्याच क्षणी आपल्या पारत-
न्त्र्याचा अनुभव आपणास येत असतो. आपले हातपाय बांधून टाकून सृष्टीनें
आपणांस बदे गुलाम करून सोडलें आहे आपला देह, आपलें मन, आपले
विचार आणि आपल्या भावनासुद्धां सृष्टीच्या अकित आहेत. हीच माया.

आपलें मूल अलौकिक कर्तृत्ववान् आहे असे प्रत्येक आईला वाटत असते.
आपला मुलगा जन्मत च विशालबुद्धि आहे आणि आपल्या मुलासारखें
मूल साऱ्या दुनियेत दुसरें नाहीं असा अभिमान न बाळगणारी आई विरळा.
तिचा सारा जीव त्याच्या ठिकाणी गुतलेला असतो. तिचा जीवात्मा म्हणजे
जणू काय ते मूल हे मूल पुढे वाढत जाते, मोठे होऊन ते कदाचित् दारू
पिऊ लागते, प्रसगवशात् पशुवत् आचरण करून आपल्या आईलाही मारू
लागते, पण ही त्याची दुष्ट वागणूक जो जों अधिक वाढते, तो तों त्याच्या
आईला प्रेमाच्या अधिक अधिक उकळ्या फुटतात. ‘ पहा हो, आईचें प्रेम
किती नि.स्वार्थी आहे ’ असें म्हणून जग तिची स्तुति करीत सुटते! पण
मायेच्या बधनांत ती पक्की जखडली गेली असल्यामुळें मुलावर प्रेम केल्या-
वाचून तिला दुसरी गतच नाही, हें बिचाऱ्या जगाला काय ठाऊक ? मुलावर प्रेम
करू नये अशी तिची कितीही इच्छा असली, तरी ती बाजूस राहून सृष्टीच्या
हुकमाखाली मुलावर प्रेम करणें तिला भाग पडते. त्या मुलाचें हें दु सह जू

मानेवरून फेकून द्यावे असें हजारो वेळ तिच्या मनांत येते पण उपयोग काय? प्रकृतीची योजना वेगळीच असते तेव्हां आपल्या या कृतीला निःस्वार्थी प्रेमाचें उज्वल रूप देऊन लोकाच्या डोळ्यांत ती धूळ फेंकीत असते हीच माया

जगात आपली साऱ्याची कथा हीच आहे एके वेळी नारदानी श्रीकृष्णास म्हटले, 'भगवता, एकदां मला तुझी माया दाखव' या गोष्टीला काहीं दिवस लोटून गेल्यानतर भगवान् श्रीकृष्णांनी नारदास आपल्याबरोबर एका ओसाड प्रदेशांत फिरावयास नेले काही योजने चालून गेल्यानतर भगवान् म्हणाले, 'नारदा, मला फार तहान लागली आहे थोडें पाणी मला आणून देशील काय?' पाणी आणण्याकरिता नारदमुनी गेले. थोड्याशा अतरावर एक खेडे त्याना दिसलें पाण्याच्या शोधासाठी ते खेड्यांत गेले असता एक अत्यत सुदर कन्या त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहण्याबरोबर ते मुनिराज इतके मोहित झाले कीं भगवान् पाण्यासाठी तळमळत आहेत ही गोष्टसुद्धां ते विसरून गेले आपण कशाकरिता गावांत शिरलों हे विसरून ते त्या कन्येबरोबर भाषण करू लागले तो सारा दिवस तिच्याच सगतीत त्यांनी घालविला. दुसरा दिवस उजाडला तरीही स्वीकृत कार्याची आठवण त्यांना झाली नाही त्या कन्येबरोबर बोलत राहावें, असा मोह त्याना पडला सभाषणाचे रूपातर हळूहळू प्रेमात झालें त्या कन्येच्या पित्याकडे जाऊन त्यांनी त्याजकडे तिची मागणी केली तिच्या पित्याने मुनिराजांस ती कन्या अर्पण करून त्याचा विवाह लावून दिला. तिच्या सगतीत बारा वर्षांचा काळ लोटला. या अवधीत मुनिराजाना मुलेंबाळेही झालीं. इतक्यांत मुनिराजाचे श्वशुर परलोकवासी झाल्यामुळें त्याची सारी संपत्तिही मुनिराजांस मिळाली. अशा रीतीने बायको, मुलेंबाळें आणि शेतवाडी इत्यादिकासह मुनिराज मोठ्या सुखानें ससार चालवू लागले पुढें अतिवृष्टीनें त्या गांवच्या नदीला महापूर आला सर्व गांव पाण्यात बुडून गेला धडाधड घरें पडू लागलीं. माणसे आणि गुरेंढोरें पाण्याच्या लोंढ्याबरोबर वहात जाऊन बुडून मेली या महापुरांतून नारदमुनि आपला व आपल्या कुटुबाचा जीव जगविण्याकरितां यत्न करू लागले एका हातांत आपल्या पत्नीला धरून दुसऱ्या हातांत आपल्या दोन मुलांस त्यानीं धरले,

आणि तिसऱ्या मुलाला खाद्यावर घेऊन ते नदीपार होण्याचा यत्न करू लागले पाण्यात पाचचार पावले टाकताच एवढा मोठा भयकर लोढा आला की, त्यांच्या खाद्यावरचे मूल त्यात वाहून गेलें हे पाहून नारदानी दु खाची एक मोठी आरोळी मारली आणि त्या मुलाला धरण्याकरता आपला एक हात त्यानी पुढे केला या गोधळात आणखी एक मूल हातचे सुटून तेही वाहू लागले अखेरीस आणखी एका लोढ्यामध्ये तिसरें मूल व पत्नी याचाही त्यास वियोग झाला. नारदमुनी वहात वहात कोठेतरी कडेला लागले. कोरड्या जाग्यावर येऊन शोक करण्यास त्यानी आरभ केला इतक्यात त्याच्या मागून एक मधुर आवाज निघाला. ‘मुनिराज, पाणी कोठे आहे ? पाणी आणण्यासाठी आपण गेल्याला घटकेपेक्षा अधिक वेळ होऊन गेला. मी तुमची वाट पहात येथे बसलो आहे’ नारद म्हणाले, ‘काय, घटकाच झाली ? माझ्या मताप्रमाणे बारा वर्षांहून अधिक काळ लोटला.’ या एका घटकेच्या अवधीत मुनीच्या चित्तातून बारा वर्षें निघून गेलीं होती आणि वास्तविक पाहता त्याना दिसलेला देखावा एका घटकेच्या अवधीत घडून आला होता. हीच माया. मायेची रूपे अनत आहेत. त्यापैकी कोणत्या ना कोणत्या रूपात आपणास ती सदोदित दिसत असते. आपण सारे तिच्याच हद्दीत वावरत आहोत. मायेच्या बाजाराची ही गुतागुत इतकी घोटाळ्याची आहे की तिच्या एखाद्या धाग्याचे टोकसुद्धा आपल्या हाती येत नाहीं. हे सर्व जग मृग-जलवत् आहे असा घोष प्रत्येक देशात चालू आहे ज्या ठिकाणी असा घोष ऐकू येत नाही असें एकही ठिकाण या पृथ्वीवर नाही तथापि याचे सत्यत्व ज्याला पटले आहे असा मनुष्यप्राणी अगदी विरळा. सताचे व तत्त्ववेत्त्याचे हे म्हणणे खरे आहे असे समजणारे पुरुषसुद्धा थोडेच सापडतात याचे कारण हेच की प्रत्यक्ष अनुभवाशिवाय लोकांच्या सागण्यावर आपला विश्वास बसत नाही. तत्त्ववेत्त्यांचा सारा उपदेश म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी असा होत आहे.

काळ प्रत्येक वस्तूच्या मागे हात धुवून लागला आहे. आपल्या ओघाबरोबर प्रत्येक वस्तु तो आपल्या पोटांत घेतो आणि जगात तिचा मागमूसही तो उरू देत नाही राजा असो, रंक असो, कोणी सत्पुष असो अथवा कोणी पापी असो, कोणी सुरूप असो अथवा कोणी कुरूप असो, साऱ्यांनाच तो सरसकट गिळीत असतो. जगातील प्रत्येक वस्तु एकसारखी

पुढे पुढे धाव घेत आहे आणि या साऱ्या गतीचे अंतिम ध्येय एकच विनाश हेच या गतीचे अखेरचे ठिकाण आपले सारे ज्ञान, आपले कलाकौशल्य आणि आपली शास्त्रे ही सारी झपाट्याने विनाशाकडे धाव घेत आहेत हा भरतीचा लोढा थावविणे कोणालाही शक्य नाही एक पळसुद्धा त्याची गति को-णास थाबविता येत नाही नानाप्रकारच्या उपायानी या भयकर अवस्थेचा विसर आपल्या मनास पडावा म्हणून आपण यत्न करीत असतो एखाद्या गावात प्लेगसारखा दुर्धर रोग झाला म्हणजे काही माणसे सडकून दारू पिऊन झिंगतात आणि अशा रीतीने आपल्या मनाला लगडे करून त्या रोगाचा विसर पाडीत असतात अशाच रीतीने इद्रियजन्य सुखाच्या मदिरेचे आकठ पान करून आपल्या मनाला या अनर्थकारक परिस्थितीचा विसर पाडण्याचा यत्न आपण नित्य करीत असतो हीच माया

अशा या परिस्थितीत दोन मार्ग आपणास दिसत असतात ‘होय, तुम्ही म्हणता हे सारे खरे असेल, पण अशा विचाराने डोके शिणविण्यात काय हशील आहे? जीवमान आहे तोवर खाऊन पिऊन मजा करावी तुम्ही म्हणता ते खरे असले तरी त्या विचाराने आपले मन शिणवू नये हाच उत्तम पक्ष मिळतील ती सुखे भोगून घ्यावी, आपल्या हातून काय होईल ते कार्य करावे निराशाजनक परिस्थिति डोळ्या आड करून आशेवर नजर लावून बसावे ’ हा एक मार्ग या म्हणण्यातही काही सत्याश आहे पण यात भीतीचे ठिकाणही मोठे आहे हे लक्षात ठेविले पाहिजे यातील सत्याश इतकाच की, अशा उमेदीने मनुष्य कर्तृत्वशाली होतो आपल्या हातून काहीतरी होईल या आशेमुळेच मनुष्य कर्तृत्ववान् आणि उद्यमशील होत असतो तथापि या मार्गात भीतीचे स्थानही आहे पुष्कळ टक्के टोणपे खाल्ल्यामुळे कदा-चित् पतनाचा प्रसगही यावयाचा ही भीति या मार्गात आहे अशा स्थि-तीत ‘**इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः**’ अशी स्थिति होण्याचा सभव असतो काही लोक असा उपदेश करतात की ‘जग आहे तसेच घेऊन त्यात चालण्या-वाचून आपणास गत्यतर नाही यात प्राप्त होतील ती सुखे भोगावी व दु:खप्रसगी धीर सोडू नये आपल्या पाठीवर जेव्हा काही तडाखे बसतील तेव्हा तो फुलाचा वर्षाव होत आहे असे म्हणावे सृष्टीच्या हुकुमाखाली गुलाम-गिरी करीत असता आपण स्वतत्र आहो अशी ओरड करावी. रात्रदिवस

लोकाच्या डोळ्यात धूळ फेकीत असावे आणि प्रसगी आपल्याही डोळ्यात ती फेंकून घ्यावी कारण, असे केल्यावाचून जगात सुखाचा लाभ होणार नाही. ' या उपदेशाला व्यावहारिक शहाणपण असे भपकेबाज नाव आहे या एकोणिसाव्या शतकात या व्यावहारिक शहाणपणाला जितका मान मिळत आहे, तितका तो त्याला पूर्वी कधीही मिळाला नव्हता याचे कारण हेच की, पूर्वीपेक्षा चालू शतकात मनुष्याची जीवितयात्रा अधिक कष्टमय झाली आहे हल्लीइतकी चढाओढ पूर्वी कधीही नव्हती आज मनुष्ये आपआपसात जितकी लठ्ठालठ्ठी करीत आहेत, तितकी ती पूर्वी कधीही करीत नव्हती अशा स्थितीत त्याच्या चित्ताला विरगुळा म्हणून हे व्यावहारिक शहाणपण पुढे यावे यात नवल नाही या व्यावहारिक शहाणपणाची बोलबाला आज जिकडे तिकडे होत आहे, पण त्याने समाधान मात्र कोणाचेच होत नाही त्याने पूर्वी कोणाचे समाधान झाले नाही, सध्या होत नाही आणि पुढेही कधी व्हावयाचे नाही मढ्यावर गुलाबाची फुले घातली म्हणून आतला भेसुरपणा थोडाच कमी होणार आहे ! ही गोष्ट अगदी अशक्य आहे गुलाबाची फुले कोमेजून नाहीशी झाली म्हणजे आतले प्रेत उघडे पडून अधिकच भयाण दिसू लागेल हीच स्थिति आज आपल्या जीवितयात्रेची झाली आहे जरतारी कपडे पेहेरून हृदयावरील व्रण आपण कितीही झाकून टाकला तरी एक वेळ अशी येईल की, त्यावेळी ते जरतारी कपडे निघून जाऊन आपल्या व्रणाचे भयकर स्वरूप एकदम बाहेर पडेल

अशा स्थितीत आम्हास आशेचे ठिकाण नाहीच काय ? आमचा जन्म मायेत झाला असून आमची वस्ति तिच्यात आहे आणि आम्ही सर्व तिचे गुलाम आहो हे अगदी खरे आहे या स्थितीतून बाहेर पडावयास काहीच मार्ग नाही काय ? या बाबतीत आमच्या नशिबी निराशाच लिहिली आहे काय ? आपण सर्व दु खी कष्टी आहो, हे जग म्हणजे एक भला मोठा तुरुग आहे आणि आमचे मन व बुद्धि हीसुद्धा तुरुगासारखीच आहेत, या गोष्टीची आम्हास ओळख होऊन शतकेच्या शतके लोटून गेली आहेत आम्ही कितीही गप्पा मारीत असलो तरी या स्थितीची जाणीव आमच्या आयुष्यात केव्हाना केव्हा तरी आम्हास अवश्य होतेच वृद्धावस्थेत तर ही परिस्थिति फारच स्पष्टपणे जाणवत असते कारण, मागे गेलेल्या साऱ्या आयु-

ष्याचे अनुभव या वेळी समवायी रूपाने वृद्धाच्या मन श्चक्षूपुढे उभे राहात असतात प्रकृतीचा पुष्कळ वर्षाचा अनुभव असल्यामुळे आपल्या मोहक रूपाने भुलविण्याचे तिचे सामर्थ्य वृद्धाच्या ठिकाणी लगडे पडते यामुळे बाह्य लखलखाटाच्या आत अधार भरला आहे ही गोष्ट तो विसरत नाही अशा स्थितीतून बाहेर पडण्यास कोणता उपाय योजावा? अशा प्रकारची भयकर परिस्थिति प्रत्यक्ष अनुभवीत असता आणि जीवित व मृत्यु या जोडीचा अक्षय्य वास जगात असल्याचे प्रत्यही पाहत असताही एक सूक्ष्म आवाज सर्व देशात आणि सर्व काली ऐकू येत असतो **“दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यते मायामेता तरन्ति ते ॥** (गीता अ० ७, श्लोक १४) **“सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरण व्रज। अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच.** ॥ (गीता अध्याय १८, श्लो ६७) हाच आशादायक ध्वनि आपणास पुढे पुढे घेऊन जात आहे मानवी प्राण्याने कित्येक युगापूर्वी हा ध्वनि ऐकिला आहे व आजही तो ध्वनि तो ऐकत आहे आशेची सर्व ठिकाणे नष्ट झाली आणि चोहोकडे अधार दिसू लागला म्हणजे हा ध्वनि ऐकू येऊ लागतो स्वसामर्थ्याने मी वाटेल ते करीन हा अहभाव मनुष्याच्या मनातून नाहीसा झाला व आपले सारे आयुष्य कवडीमोल झाले आहे असे त्याला वाटू लागले म्हणजे हा ध्वनि त्याला ऐकू येऊ लागतो यालाच धर्म हे नाव आहे

अशा रीतीने एका बाजूस हे सर्व जग केवळ मायारूप आहे असा अनुभव होत असता दुसऱ्या बाजूस या मायेतून बाहेर पडावयास मार्ग आहे असा ध्वनि उमटत असतो उलटपक्षी ‘असल्या विचाराने आपली डोकी फिरवून घेऊ नका व धर्म आणि तत्त्वज्ञान असल्या शुष्क गोष्टीचा विचार करू नका’ असे व्यवहारी लोक आपणास सागतात त्याच्या मते हे जग कितीही वाईट असले तरी त्यातच चैन भोगणे बरे त्याच्या या उपदेशाचा सरळ अर्थ हाच की, दाभिकासारखे वागण्यास काही हरकत नाही जग मायामय आहे असा प्रत्यक्ष अनुभव येत असता ते खरे आहे असे भासवावयाचे म्हणजे बोलून चालून असत्याचरण करणे होय पण व्यावहारिकाच्या दृष्टीने हेच असत्याचरण इष्ट वाटते. फाटेल त्या ठिकाणी ठिगळे लावीत सुटावे असा त्याचा उपदेश आहे अशा रीतीने आपल्या सगळ्या आयुष्याची

एक चित्रविचित्र गोधडी बनविण्यास ते आपणास सागतात एक धड ना भाराभर चिंध्या, याच जीवितक्रमाला ते प्रत्यक्ष व्यवहार म्हणतात अशा प्रकारे चिध्या शिवून गोधडी बनवीत बसणे ज्याना परवडत असेल, त्याच्या ठिकाणी धर्माचा उदय कधीही होणार नाही आपल्या साऱ्या आयुष्याचे मातेरे झाले आहे ही गोष्ट लक्षात येऊन या परिस्थितीचा अत्यत तिटकारा ज्याला आला असेल, हे चिध्या चिवडण्याचे काम ज्याला मनापासून नकोसे झाले असेल आणि या दभापासून ज्याचे मन परावृत्त झाले असेल, त्याच्याच ठिकाणी धर्माचा उदय होईल कारण, धर्ममार्गाचा आरभ अशाच परिस्थितीत होतो. अशा प्रकारे अज्ञानाधकारात सडत पडण्यापेक्षा मृत्यूही आलेला पुरवला असे ज्याला मनापासून वाटू लागले असेल त्यालाच धर्माची प्राप्ति होईल पराभूत होऊन जगण्यापेक्षा धारातीर्थी देहपात होणे ज्याला कल्याणप्रद वाटत असेल, तोच वीर धर्ममार्गावर आरूढ होईल धर्माचा पाया हाच या पाया-वर उभा राहिलेला मनुष्य सत्याच्या मार्गाकडे वाट चालू लागतो तो पर-मेश्वराच्या मार्गाकडे सन्मुख झाला आहे असे समजावे धर्ममार्गावर आरूढ होण्यास दृढ निश्चय प्रथम पाहिजे मी वाटेल त्या युक्तीने सत्य शोधून काढीन असा निश्चय झाला पाहिजे सत्यशोधनाच्या मार्गात देह गमवि-ण्याची पाळी आली तरी एक पाऊलही मी मागे घेणार नाही असा निश्चय पाहिजे जीव गमविण्याचा निश्चय झाल्यावाचून धर्माचा मार्ग दिसावयाचा नाही. कारण, या जीवितात धर्म नाही हें जीवित मायारूप असल्यामुळे ते नसल्यासारखेच आहे प्रत्येक दिवशी, प्रत्येक क्षणी 'त्याची वाफ होऊन जात आहे आज तरतरीत आणि आशावान् दिसणारा तरुण उद्या वृद्ध होतो थड वाऱ्याच्या झुळकेबरोबर ज्याप्रमाणे झाडाचा मोहोर काळा पडून गळून जातो, त्याच प्रमाणे वृद्धावस्थेची झुळुक लागण्याबरोबर साऱ्या आशा आणि साऱ्या चैनी नष्ट होतात अशा रीतीने इहलोक आपणास पारखा होत असतो हे खरे, पण दुसऱ्या बाजूस विजयाचा मनोरम देखावा सुरू होतो दुसऱ्या बाजूस सर्व सकटावर विजय मिळविण्याची साधने उपलब्ध होतात सकटेच काय, पण सारें विश्वही जिकण्याची साधने दुसऱ्या बाजूस उपलब्ध होत असतात या-करिता मृत्यूलाही न भिता सत्याच्या शोधार्थ पुढे सरावयाचे अशी ज्याची तयारी असेल, त्यानाच श्रुतिमाता उच्च घोषानें सागते "हा मार्ग अत्यत

बिकट आहे धार दिलेल्या सुरीसारखा तो तीक्ष्ण आहे तथापि निराश होऊ नका **' उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत । ' "**

जगात अनेक धर्ममार्ग उत्पन्न झाले असले आणि त्याची बाह्यरूपे कितीही निरनिराळी दिसत असली, तरी त्या सर्वाच्या पोटी एक सामान्य तत्त्व आहे. धर्माचे कार्य मायेतून बाहेर पडून मुक्ति मिळविण्याचे आहे, असा उपदेश सर्व धर्मांनी केला आहे धर्म आणि व्यवहार याची परस्पर सागड घालण्याकरिता इतक्या धर्ममार्गाचा अवतार झाला नसून केवळ आपले साध्य कसे साधावें हे सागण्याकरिताच ते अवतीर्ण झाले आहेत ससार करावा आणि धर्महीं साधावा असा त्याचा उपदेश नाही जगातील निरनिराळ्या धर्मांनी जी साध्ये पुढे ठेविली आहेत, त्या सर्वात समरसता उत्पन्न करून त्या सर्वाच्या पोटी मुख्य साध्य एकच कसे आहे हे स्पष्ट करून दाखविणे हे वेदाताचे कार्य आहे ज्याला आपण शुद्ध धर्मभोळेपणा म्हणतो असा मार्ग आणि ज्यात शुद्ध तत्त्वज्ञान भरले आहे असा मार्ग, या दोघाचेही अतिम साध्य एकच आहे कारण, या मायेतून बाहेर पडण्याचा मार्ग ते दोघेही दाखवीत आहेत, आणि हा मार्ग मुक्त पुरुषाच्या द्वारेच प्राप्त होण्यासारखा आहे जो स्वत बद्ध नाही अशाच्या मदतीवाचून मुक्तिमार्ग दाखविणारा दुसरा कोणीही भेटावयाचा नाही असा मार्गदर्शक कोण असावा, तो व्यक्तिविषयक परमेश्वर असावा की मनुष्यासारखाच प्राणी असावा अथवा तो स्त्री असावा की पुरुष असावा, अशा प्रकारचे कितीही प्रश्न उपस्थित झाले तरी मुख्य साध्याबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे निरनिराळ्या मार्गात कित्येक वेळा इतका विरोध असतो की, त्याची एकवाक्यता होणे अगदी अशक्य असते तथापि अशा स्थितीतही या सर्व मार्गाच्या पोटी एकच सुवर्णततु असून तो हळूहळू आपल्या नजरेस येत असतो सर्वांचे अखेरचे साध्य मुक्ति हेच आहे

या जगात वावरत असता आपणावर कित्येक वेळा ज्याप्रमाणें सुखाचे, त्याचप्रमाणे दु खाचेही प्रसग येत असतात. अनेक वेळा अनेक प्रकारच्या अडचणी आपला मार्ग निरोधित असतात, तथापि अशा स्थितींतही आपण आपल्या मुक्तीच्या साध्याकडे एकसारखे पुढे जात असतो ही खरोखर मोठ्या नवलाची गोष्ट आहे " या विश्वाचे स्वरूप काय, हे निर्माण कशातून

होते? आणि याचा लय कशात होतो?" या प्रश्नाची उत्तरे "याचा जन्म केवलावस्थेतून होत असून कैवल्यातच त्याचा वास आहे आणि त्यातच त्याचा लय होतो अशी आहेत आपले अखेरचे साध्य मुक्ति हे आहे, या कल्पनेचा त्याग करणे तुम्हास शक्यच नाही तिचा त्याग तुम्ही केला तर कोणतेही कर्म तुमच्या हातून घडणार नाही, एवढेच नव्हे तर जीवित धारण करणेही तुम्हास अशक्य होईल. तुम्ही माझे गुलाम आहा, असे प्रत्येक क्षणी प्रकृति आपणास बजावीत असते तुम्ही मुक्त नाही असे प्रत्येक क्षणी ती आपणास निक्षून सागत असते, आणि याच क्षणी आपण मुक्त आहो असा ध्वनीही आपल्या चित्तात प्रत्येक क्षणी उमटत असतो पावलोपावली आपल्या मस्तकावर प्रहार करून आपला बद्धपणा माया आपणास जाणवीत असते आणि त्याच क्षणी असा तडाखा खात असता आपण मुक्त आहो असा ध्वनि आपल्या चित्तात उमटत असतो तू मुक्त आहेस असा एक अतस्थ ध्वनि आपल्यापैकी प्रत्येकाच्या अत करणात उमटत असतो, पण आपले हे स्वातत्र्य व्यक्त दशेस आणण्याचा उद्योग आपण सुरू केला की पर्वतप्राय अडचणी आपल्या मार्गात उभ्या राहातात याचे उल्लघन करणे अशक्य आहे असे आपणास वाटू लागते तथापि अशा वेळीही 'मी मुक्त आहे, मुक्त आहे' असा आपल्या अत करणातील ध्वनि चालू असतोच जगातील निरनिराळ्या साऱ्या धर्माचा अभ्यास तुम्ही केला तर त्या सर्वात हीच कल्पना ग्रथित झाली असल्याचे तुम्हास दिसून येईल धर्मातच काय पण व्यवहारात आणि मानवी समाजातही हेच तत्त्व गोवले गेले आहे असे तुम्हास आढळून येईल आपण मुक्त आहो हे सिद्ध करण्याकरिताच मनुष्य अनेक कर्मे करीत असतो आपली मुक्तावस्था व्यक्त दशेस आणण्याची जी खटपट तीच कर्म. हा हेतू चित्तात नसेल तर कोणतीच कर्मे आपल्या हातून घडणार नाहीत "**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज**" हा ध्वनि आपणापैकी प्रत्येकाच्या कानावरून गेलेला आहे एखाद्याला या गोष्टीची जाणीव नसली तरी तो ध्वनि त्याने ऐकलेला आहे हा ध्वनि निरनिराळ्या भाषानी अवतीर्ण झाला असेल अथवा तो सागण्याच्या तऱ्हा अनेक झाल्या असतील, तथापि तो ध्वनि कोणत्या ना कोणत्या रूपाने सर्वांच्या कर्णपथावरून गेलेला आहे यात मात्र शका नाही हा ध्वनि उत्पन्न झाला म्हणूनच या जगात आपल

जन्म झाला आणि त्याच्या अस्तित्वामुळेंच आपली प्रत्येक क्रिया चालू राहिली आहे त्या ध्वनीच्या दिशेनेच आपण सारे मुक्तीकडे धाव घेत आहो ही गोष्ट एखाद्याच्या लक्षात आली असली अथवा नसली तरी प्रत्येक जण मुक्तीकडेच धाव घेत आहे गावात कोठे वाजत्री वाजली की मुले त्या अनुरोधाने जशी धाव घेतात, त्याचप्रमाणे आपणही जाणून अथवा न जाणता या मगल ध्वनीच्या अनुरोधाने धाव घेत आहो

केवळ मनुष्यप्राणीच नव्हे तर अत्यत क्षुद्र अशा कीटकापासून तो अत्युच्च दर्जापर्यंतचे सर्व प्राणी या ध्वनीच्या अनुरोधाने धाव घेत आहेत. कित्येक वेळा या प्राण्याचा एखादा घोळका हातात हात घालून धावताना आढळतो, तर दुसऱ्या कित्येक वेळा हे प्राणी एकमेकास ढकलून देऊन आपला मार्ग सुधारीत असल्याचे आढळून येते या गडबडीतूनच चढाओढीचा जन्म होतो या गडबडीतूनच आनद जन्म पावतो, त्याचप्रमाणे जीवित आणि मृत्यु हीमुद्धा याच गडबडीतून उद्भवली आहेत हे सारे विश्व म्हणजे अतिम साध्याला पोचण्याकरिता जी ही अखड धावपळ सुरू आहे तिचे व्यक्तरूपच होय आणि प्रकृतीचे व्यक्तरूपही तेच

या गोष्टीची चागली समजूत पटली म्हणजे जगाचा देखावा तात्काळ बदलू लागतो आपल्या हृदयात चालू असणाऱ्या या मद ध्वनीचे ज्ञान आपणास झाले म्हणजे जगाचे स्वरूप अगदी निराळे दिसू लागते जग म्हणजे मायेची भयकर समरभूमि असे जे आपणास प्रथम वाटत होते, ते त्याचे स्वरूप नाहीसे होऊन तेच जग सुदर दिसू लागते प्रकृतीला शाप देण्याची आपली प्रवृत्ति नाहीशी होते जगाचा भयकरपणा नाहीसा होतो जग म्हणजे व्यर्थ श्रम करण्याची जागा असा जो आपला समज पूर्वी होता तो नाहीसा होऊन येथे महत्कार्य आपणास करता येण्यासारखे आहे असे आपणास कळून येते या पुढे शोक करीत बसण्याचे कारण आपणास उरत नाही आपल्या हृदयातील ध्वनीचा अर्थ समजू लागण्याबरोबर जगात एवढी धडपड आणि चढाओढ का याचा खुलासा होतो त्याचप्रमाणे जगातील अडचणी, तेथील दुष्टपणा आणि तेथील आनदाची ठिकाणे याचा भावार्थही आपल्या लक्षात येतो हा जगाचा स्वभावच आहे असे आपणास दिसू लागते अशा प्रकारचा विरोध जगात नसेल, तर त्या ध्वनीकडे आपली प्रगतीही होणार नाही आपण जाणत

असलों अथवा नसलो तरी त्या ध्वनीपर्यंत जाऊन पोहोचणे हेच आपले अखेरचे साध्य आहे आपल्या जन्माचा हेतू तोच सर्व मनुष्य प्राणी किंबहुना सारी सृष्टि मुक्त होण्याकरिताच धडपडत आहे सूर्याचा प्रवासही त्याच दिशेने चालू असून त्याभोवती फिरणारी पृथ्वीही मुक्तीकडेच धाव घेत आहे आणि त्याचप्रमाणे पृथ्वीभोवती फिरणारा चद्रही मुक्तीसाठीच चक्राकार परिभ्रमण करीत आहे सर्व तारागण याच कारणासाठी वाट चालत असून वाराही त्याच हेतूने वाहत आहे. विश्वातील यच्चयावत् वस्तु या एकाच साध्याकडे धाव घेत आहेत सत्पुरुष याच ध्वनीच्या रोखाने आपला मार्ग आक्रमण करीत आहे तसे करण्यावाचून त्याला गत्यतरच नाही याकरिता त्याचे हे कृत्य म्हणजे अभूतपूर्व पुण्यकर्म आहे असे समजण्याचे कारण नाही कारण, त्या दिशेने गेल्यावाचून त्याला गत्यतरच नाही. त्याचप्रमाणे आपणास पापी असा दिसणारा पुरुषही त्याच मार्गाने चालत आहे उदारबुद्धि पुरुष जसा त्या मार्गाने सरळ जात आहे, त्याच प्रमाणे एखादा अत्यत कृपणही तोच मार्ग आक्रमण करीत आहे सदोदित कर्मात निमग्न असलेला मनुष्य जसा या मार्गात ओढला जातो, त्याच प्रमाणे अत्यत आळशी मनुष्यही याच मार्गाने चालत असतो हे दोघेही अवश होत्साते त्या मार्गाने जात असतात तसे करण्यावाचून त्याना गत्यतरच नाही. अशा रीतीने हा मार्ग चालणाऱ्या लोकापैकी एखाद्याला वारवार ठेचा लागतात आणि तो पडतो व अशा मनुष्याला आपण वाईट, पापी इत्यादि नावे देतो ज्या मनुष्याला अशा प्रकारचे पतनाचे प्रसग कमी येतात त्याला आपण सत्पुरुष म्हणतो चागले आणि वाईट या दोन परस्परभिन्न वस्तु नाहीत त्याच्या गुणधर्मात मोठा विरोध आहे असे नाही ही दोन एकाच वस्तूची रूपे आहेत याच्यात जो काही फरक आहे तो गुणधर्माचा नसून परिमाणाचा आहे

सर्व विश्व या एकाच कल्पनेनें चालत आहे हा आपला सिद्धात धर्माला लावला तर तेथेही हाच प्रकार आढळून येतो. अत्यत बाल्यावस्थेतील धर्म घेतला तर त्यातही हेच तत्त्व गोवलेले आढळेल या धर्मातील पितृपूजेचा प्रकार अथवा रुधिरप्रिय देवताच्या पूजनाचा प्रकार पाहिला तर त्याच्या पोटात हेंच तत्त्व गोवलेले आढळते पितृपूजा अथवा देवतापूजा यात मुख्य कल्पना

कोणती ? यात मुख्य अथवा मध्यवर्ती कल्पना हीच की यातील पूज्य पितर अथवा देवता हे सृष्टिबधनाच्या बाहेरचे प्राणी आहेत असा पूजकाचा समज असतो. त्याना सृष्टिबधन नाही, ते मोकळे आहेत, स्वतत्र आहेत याच कल्पनेने पूजक त्याची पूजा करीत असतो भिंतीतून पलीकडे निघून जाण्याचे सामर्थ्य पूजकाला नसते त्याचप्रमाणे आकाशातही तो उड्डाण करू शकत नाही, पण ज्या देवताची पूजा तो करीत असतो त्याना या गोष्टी करता येतात अशी त्याची पूर्ण भावना असते त्याला स्वत ला ज्या बधनानी सृष्टि जखडून टाकीत असते त्या बधनाची मात्रा आपल्या देवतावर चालत नाही अशी त्याची भावना असते. तत्त्वदृष्ट्या या भावनेचा अर्थ हाच की स्वत च्या दृष्टीनें स्वतत्र, मुक्त अशा प्राण्याची पूजा तो करीत असतो ही बाल्यावस्थेतील धर्माची गोष्ट झाली याहून अधिक उच्च असे पूजनप्रकार पाहिले तरी तेथेही मूळ कल्पना हीच सृष्टीबद्दलची आपली कल्पना जो जो विस्तार पावते, तो तो जीवात्म्याबद्दलची कल्पनाही त्या प्रमाणाने विस्तार पावत जाते आणि अखेरीस या सर्व मायेचा नियता कोणी तरी असावा येथपर्यंत ती जाऊन पोहचते

या ठिकाणी वेदाताला आरभ होतो तथापि एवढ्यानेंही वेदाताचे समाधान होत नाही दृश्य मायेच्या पलीकडे मायातीत असा परमेश्वर असून तो मायेच्या हद्दीत नाही आणि तो आपणा सर्वास स्वत कडे ओढीत असून आपण सारे त्याजकडे धाव घेत आहो, या साऱ्या कल्पना चागल्या आहेत हे खरे, पण वेदाताचे समाधान तेवढ्याने होत नाही या कल्पनेतही स्पष्टता नसून तीत अधकाराची छटा आहे असे वेदात म्हणतो आपल्या बुद्धीला या कल्पनेत काही वैषम्य दिसून येत नसले तरी ती स्पष्ट नसून बोबडी आहे असे वेदाताचे म्हणणे आहे परमेश्वर हा या सृष्टीच्या बाहेर दूरवर कोठेतरी राहाणारा प्राणी आहे असा जो ध्वनि या कल्पनेत निघतो, तो वेदाताला पसत नसून परमेश्वराचा वास त्याहून अधिक जवळ आहे असे त्याचें मत आहे परमेश्वराची स्थापना सृष्टीच्या बाहेर न करता तिच्या हद्दीच्या आतच ती केली, तरी त्या कल्पनेला काही हीनता अथवा उणेपणा येत नाही असे वेदाताचे म्हणणे आहे परमेश्वर स्वर्गात राहात नसून तो सृष्टीतच आहे फार काय पण सृष्टीच परमेश्वर आहे, इतकेच म्हणून वेदाती

थांबत नाहीं; तर त्याही पुढें जाऊन तो असें म्हणतो कीं, या देहाच्या देवळांत परमेश्वर राहातो. तो देहरूपच होतो; तो आत्मरूप होतो; आणि अशा रीतीनें जीवात्मा व परमात्मा यांचें ऐक्य होतें. या ठिकाणीं वेदांताचें सारें म्हणणें संपून तो मैान धरून राहातो. येथून पुढें तो निःशब्द होतो. अनेक ऋषिवर्यांनीं ज्याला साऱ्या सृष्टीभर धुंडाळलें, तो आपल्या हृदयांतच आहे. तुमच्या कानीं आलेला ध्वनि तुम्ही बरोबर ऐकला पण त्याची दिशा तुम्ही चुकलां. ' मी स्वतंत्र आहें ' ही भावना बरोबर होती, पण ती साध्य करण्याकरितां तुम्हीं बाह्य जगांत भटकूं लागलां. तुमची चूक झाली ती हीच. आतां बाह्य जगांत भटकण्याचें सोडून देऊन तुम्हीं अंतर्मुख व्हा म्हणजे तो परमात्मा हा सारा वेळ तुमच्याच ठिकाणीं होता असें तुम्हांस आढळून येईल. एवढेंच नव्हे तर तो परमात्मा म्हणजे तुम्हीच ही खूण तुम्हांस पटेल. सर्वकाळ आपण स्वतंत्रच असून मायेनें आपणांस केव्हांच बद्ध केलें नव्हतें असें तुम्हांस दिसून येईल. तुम्हांला बांधण्याला तिला शक्तीच नाहीं. स्वप्नांत ज्याप्रमाणें एखादा मनुष्य उगीच घाबरून ओरडत सुटतो, त्याचप्रमाणें आपण फुकट ओरडत होतों, असें आपणास दिसून येईल. या भीतीपासून मुक्त होणें हेंच आपलें अखेरचें साध्य होय. केवळ बुद्धिदृष्ट्या ही गोष्ट जाणणें हें आपलें साध्य नसून तें स्वयमेव होऊन जाणें हें आपलें साध्य आहे. हें जेव्हां सिद्ध होईल तेव्हांच आपल्या साऱ्या अडचणी नाहींशा होतील, तेव्हांच हृदयांतील सारे विकार विराम पावतील, तेव्हांच वक्र दिसणारें जग सरळ दिसूं लागेल, तेव्हांच अनेकतेनें भासणारें जग एकरूप दिसेल आणि जी माया आज आपणास भयंकर वाटत आहे तीच सुंदर दिसूं लागेल; ती आज आपणास तुरुंगासारखी वाटत आहे पण तीच अशा स्थितींत क्रीडांगणासारखी दिसेल. आज भयप्रद दिसणाऱ्या गोष्टी अशा स्थितींत सुंदर दिसूं लागून त्यांच्या पाठीमागेंही त्या एका सत्यरूप परमात्म्याचेंच वास्तव्य आहे असा अनुभव आपणास येईल.

---

## ६

# केवलरूप आणि व्यक्तदशा.

अद्वैतवाद पूर्णपणे लक्षात येण्याच्या मार्गात एक मोठी अडचण आहे या-संबधी एकच महत्वाचा प्रश्न पुन पुन उपस्थित होत असतो, आणि हा प्रश्न सदोदित असाच उपस्थित होणारा आहे अनत तत्त्व अथवा केवल तत्त्व मर्यादित कसे झाले असा तो प्रश्न आहे आता हा प्रश्न चर्चेक-रिता घेऊन एका आकृतीच्या द्वारे त्याचे मी स्पष्टीकरण करतो

| (अ) केवलतत्त्व |
|---|
| (क) काल, देश, निमित्त |
| (ब) विश्व |

या ठिकाणी (अ) या अक्षराने केवलरूप दाखविले असून (ब) या अक्षराने विश्व दाखविले आहे केवलरूप विश्वरूपाला आलेले आहे 'विश्व' या शब्दात केवळ जडसृष्टीच येते असे नसून मानससृष्टि, चैतन्यसृष्टि, स्वर्गादि भुवने आणि वस्तुत सर्व निर्मित पदार्थांचा अतर्भाव त्यात होतो मन हे एक प्रकारचे स्वरूप असून शरीर दुसऱ्या प्रकारचे रूप आहे अशाच रीतीने ही निरनिराळी स्वरूपे मिळून हे सर्व विश्व तयार झाले आहे केवलरूप (अ) विश्वरू-पाला (ब) प्राप्त झाले ते काल, देश आणि निमित्त (क) याच्या उपा-धीमुळे झाले आहे अद्वैतवादातील प्रमुख सिद्धात हा आहे काल, देश आणि निमित्त ही जणू काय काचेसारखी असून त्या काचेतून आपण केवल-रूप पाहिले म्हणजे ते विश्वरूपाने दिसते यावरून केवलरूपात काल, देश आणि निमित्त याना जागा नाही ही गोष्ट आपल्या लक्षात आली असेलच केवलरूपात कोणत्याही प्रकारचा बदल होत नसल्यामुळे देश-काल-निमि-त्ताची कल्पना तेथे स्पर्शही करू शकणार नाही हे उघड आहे ज्या ठिकाणी शुद्ध एकरूपच आहे, त्या ठिकाणी गतीही नाही आणि कारणालाही अवकाश नाही. ज्याला आपण निमित्त असे म्हणतो त्याचे अस्तित्व केवलरूपात नसून विश्वरूपात मात्र आहे, ही गोष्ट आपण आपल्या चित्तावर उत्तम प्रकारे

ठसवून ठेविली पाहिजे केवलतत्त्वाचे रूपातर विश्वरूपात झाल्यानतर देशकालादि उपाधि सुरू होतात शॉपेनहॉर याने वेदात मताचे जे उद्घाटन केले आहे त्यात त्याने एक चूक केलेली आहे विश्वाचे आद्य जनकत्व सर्वतोपरी इच्छेकडे आहे असे जे त्याने दर्शविले आहे ती त्याची चूक आहे केवलरूप म्हणजे इच्छा नव्हे, कारण, इच्छा हे रूप दृश्य असून त्यात बदलही होतो केवलरूपात अशा प्रकारचा बदल होत नसून त्यात दृश्यत्वही नाही केवलरूपात गतीचाही सभव नाही. हे रूप सोडून आपण विश्वरूपाकडे आलो म्हणजे देशकालादि उपाधी निर्माण होतात ते स्वरूप सोडून आपण खालच्या पायरीला आल्यानतर बाह्य गती व अतर्गती म्हणजे विचार ही उत्पन्न होतात विश्वरूपरेषेच्या वरच्या बाजूला इच्छा उत्पन्न होणे शक्य नाही यामुळे ती विश्वाचे कारण होऊ शकणार नाही आपण केवळ आपल्या देहापुरताच विचार केला, तरीसुद्धा आपल्या प्रत्येक हालचालीचे कारण आपली इच्छा आहे असे दिसून येत नाही ही खुर्ची मी हाताने पलीकडे लोटली या गतीचे कारण माझी इच्छा आहे असे म्हणता येईल कारण मी इच्छा केल्यावर ती गतीच्या रूपाने माझ्या हातात अवतरून तिने खुर्ची पलीकडे ढकलली, पण ज्या शक्तीने ही खुर्ची सरकविली तीच शक्ति माझ्या हृदयाला आणि फुफ्फुसाना गति देत आहे, पण ही गोष्ट माझ्या इच्छेच्या द्वारे घडत आहे असे दिसून येत नाही या दोन्ही कार्याला लागणारी शक्ति एकरूपच आहे ही गोष्ट कबूल केली म्हणजे ती शक्ति बुद्धिरूपात अवतरते तेव्हाच इच्छारूप धारण करते हे आपल्या लक्षात येईल बुद्धिरूपात येण्यापूर्वी तिला इच्छा हे नाव देणे चुकीचे आहे इच्छा जाणिवेनतर उत्पन्न होते याकरिता मूलशक्ति जाणिवेत आल्यानतर तिचे रूपातर इच्छेत होते या बाबीत शॉपेनहॉर याच्या विचारसरणीत बरीच गडबड उडाली आहे एखादा धोंडा खाली पडतो आणि तो तसा का पडतो असा प्रश्न आपण उपस्थित करतो या ठिकाणी आपण एक गोष्ट आगाऊच गृहीत केलेली असते ती ही की, कारणावाचून कार्य घडत नाही हा सिद्धात आपण आगाऊ गृहित केला असल्यामुळें धोंडा पडण्याच्या कार्याचे कारण काय, असा प्रश्न साहजिकच उपस्थित होतो या ठिकाणी एक गोष्ट तुम्हास विशेषेंकरून लक्षात ठेवण्यासारखी सागावयाची आहे. ती ही की, कोणतेही

कार्य घडले की त्याला कारण असलेच पाहिजे असा सिद्धात आपण आगाऊच गृहित करून ठेवलेला असतो कोणतीही कार्यरूप गोष्ट घडली की तिच्या पाठीमागे अदृश्य रूपाने कोणती तरी कारणरूप गोष्ट घडली असली पाहिजे असे आपण गृहीत केलेले असते अशा प्रकारचा जो कार्य-कारण-भाव आपल्या चित्तात आगाऊच आहे त्यालाच आपण निमित्त असे नाव दिले आहे विश्वातील प्रत्येक वस्तु स्वत कार्यरूप असून दुसऱ्या एखाद्या वस्तूचे कारणरूप ती होत असते, असा आपल्या निमित्त या शब्दाचा अर्थ आहे एखाद्या वस्तूच्या जन्मानतर ज्या दुसऱ्या वस्तु निर्माण होतात, त्याचे ती कारण असते व तसेच स्वत च्या पूर्वीच्या वस्तूचे ती कार्य असते. यालाच आपण निमित्ताचा कायदा अथवा नियम असे नाव देतो, आणि आपल्या सर्व विचारमालिकेच्या मुळाशी हा कायदा आपण गृहित केलेला असतो या विश्वातील प्रत्येक अणुरेणू दुसऱ्या प्रत्येक अणुरेणूशी कोणत्या तरी सबधाने निगडित झालेला आहे, असा आपला समज आहे ही कल्पना मुळात कशी उद्भवली, याजबद्दल मोठे कडाक्याचे वादविवाद पूर्वी होऊन गेले आहेत ही कल्पना मनुष्याच्या देहाबरोबरच अत स्फूर्तीने निर्माण झाली असे म्हणणारे कित्येक तत्त्ववादी यूरोपात होऊन गेले अनुभवाच्या ज्ञानाने ही कल्पना मनुष्याच्या मनात उद्भवली, असे मानणारेही कित्येक पडित होऊन गेले, तथापि या प्रश्नाचे समर्पक उत्तर अद्यापि कोणीही दिलेले नाही आणि तो अझून प्रश्नाच्या स्थितीतच आहे. वेदाताचे म्हणणे या बाबीत काय आहे हे आपण पुढे पाहू सध्या मुख्य लक्षात ठेवण्याचा मुद्दा एवढाच की, जेव्हा जेव्हा ‘ का ’ असा प्रश्न आपण उपस्थित करीत असतो, तेव्हा तेव्हा आपणासमोर दिसत असलेल्या वस्तूच्या पूर्वी दुसऱ्या काही वस्तू अस्तित्वात होत्या व यानतरही काही अस्तित्वात येणार आहेत, ही कल्पना आपल्या चित्तात पक्की होऊन बसलेली असते आता या प्रश्नातच आपणातील आणखीही एका वृत्तीचा अतर्भाव होत असतो या साऱ्या विश्वात स्वतत्र असे काही नाही, ही ती कल्पना अथवा वृत्ति होय प्रत्येक वस्तूवर तिच्या बाहेरच्या वस्तूचा आघात होत असतो व प्रत्येक वस्तु आपल्यापरी बाह्य वस्तूवर आघात करीत असते, आणि अशा रीतीने प्रत्येक वस्तूचा सबध इतर वस्तूशी पक्का जखडलेला आहे, असा आपला समज आहे. अशा

रीतीने विश्वात सर्व वस्तु परस्पराशी निगडित झालेल्या असणे हा कायदाच आहे, असे आपण अगोदरच गृहित धरून ठेवलेले असते " केवलरूप कशापासून निर्माण झाले " असा प्रश्न आपण विचारतो, तेव्हा आपण केवढी मोठी चूक करीत असतो! केवलरूपही दुसऱ्या काही वस्तूनी बद्ध झालेले असून दुसऱ्या काही वस्तूवर त्याचे अस्तित्व अवलबून आहे असे गृहित करावे लागेल असे आपण गृहित करू, तेव्हाच हा प्रश्न उपस्थित होईल, आणि असे गृहित करणे म्हणजे केवलरूपाला त्याच्या वरच्या पायरीपासून विश्वरूपाच्या खालच्या पायरीवर ढकलणे होय केवलरूपात काल, देश आणि निमित्त या उपाधी लागूच शकत नाहीत ते त्याच्या पलीकडचे रूप आहे केवलरूप म्हणजे एकरूप आहे तेथे दुसरे, ही कल्पनाच उद्भवत नाही जे केवल स्वयमेव, पूर्णरूप आहे, त्याला कारण असणे शक्य नाही जे पूर्ण स्वतत्ररूप आहे, ते कोणाचेही कार्य असू शकणार नाही जें कार्यरूप आहे ते स्वतत्र नाही, आणि जे स्वतत्र आहे ते कार्यरूप नाही जर ते कार्यरूप असेल, तर ते स्वतत्र नसून बुद्धरूप असले पाहिजे जेथे परस्परावलबित्व आले, तेथे स्वातत्र्य असणे शक्य नाही यावरून अनतत्व मर्यादित कसे झाले, हा प्रश्नच अशक्य कोटीतील आहे, हे आपल्या लक्षात येईलच कारण असा प्रश्न उत्पन्नच होऊ शकत नाही तर्कशास्त्रातल्या या सूक्ष्म कोट्या सोडून देऊन आपण सामान्य मनोभूमिकेवर उभे राहिलो व त्या दृष्टीने त्या प्रश्नाचा विचार केला तरीही शेवट तोच या प्रश्नाला एखादे उत्तर सापडले अशी कल्पना आपण केली तर त्या केवलाचे अथवा अनतत्त्वाचे केवलरूप शिल्लक राहिले काय? अमक्यापासून ते उत्पन्न झाले असे म्हटले की त्याच्या ठिकाणी अवलबित्व आलेच, आणि त्याला अवलबित्व आल्याबरोबर त्याचे केवलत्व नाहीसे झाले आपल्या सामान्य दृष्टीने ज्ञान या शब्दाचा अर्थ तरी काय? याचा अर्थ इतकाच की, जे आपल्या मनाच्या मर्यादेत आले ते. ज्या वस्तू आपल्या मनाने मर्यादित होतात, त्याचे ज्ञान आपणास झाले असे आपण मानतो आपल्या मनाच्या कक्षेबाहेर जे काही आहे ते ज्ञान नव्हे, असे आपण म्हणतो आता केवलरूपाचे ज्ञान आपणास झाले, असे म्हटल्याबरोबर आपल्या मनाने ते मर्यादित झाले असे होईल, आणि मनाच्या मर्यादेंत येताक्षणीच त्याचे केवलरूप नष्ट होईल अशा स्थितीत त्याचे अनतत्व

जाऊन मनाच्या रेषेची मर्यादा त्याजभोवती पडते मनाच्या कक्षेत जें जे काही येऊ शकते, ते मर्यादित होते, हे उघड आहे याकरिता केवलरूप समजले ही भाषाच विरोधात्मक आहे. केवलत्व आणि समजणे या दोन वस्तू परस्परविरोधी असल्यामुळे त्याचा एकत्र उच्चारही होऊ शकत नाही याकरिताच या प्रश्नाचे उत्तर कोणीही दिलेले नाही कारण त्याला उत्तर मिळाल्याबरोबर केवलरूपाचे केवलपण नष्ट होणार ज्या परमेश्वराचे स्वरूप तुमच्या मनाच्या मर्यादेत येऊ शकले त्याचे परमेश्वरत्व त्या क्षणीच नष्ट झाले आपल्या मनाने मर्यादित होण्याबरोबर त्याचे ईश्वरत्व नष्ट होऊन तो आपणापैकीच एक होतो परमेश्वरस्वरूप कधीही जाणता येणार नाही ते ज्ञानाच्या कक्षेच्या बाहेरचे असल्यामुळे ते नित्य अज्ञेयच राहणार तथापि याबद्दलचे अद्वैतमत विशेष लक्षात ठेवण्यासारखे आहे परमेश्वर ज्ञेयरूपाहून अधिक उच्चप्रतीच्या रूपाचा आहे असे अद्वैत सिद्धांताचे मत आहे आपणास जी मोठी शिकावयाची गोष्ट ती हीच परमेश्वर अज्ञेय आहे असे संशयवादीही म्हणतात, पण त्याचा अखेरचा मुक्कामही येथेच होतो याहून अधिक ते काही सांगत नाहीत याकरिता त्याचे मत तुमच्या उपयोगी पडणार नाही त्याचे मत मनात बाळगून तुमचे चालावयाचे नाही आपणासमोर ही खुर्ची दिसते, हिचे ज्ञान आपणास होते ही ज्ञेय वस्तु आहे, पण इथर अथवा आकाश यांच्या पलीकडे काय आहे, तेथे मनुष्याची वस्ति आहे किंवा नाही वगैरे गोष्टी आपणास कळत नाहीत, आणि कदाचित् त्या कळावयाच्याही नाहीत, पण ईश्वराबद्दलचे अज्ञेयत्व अशा कोटीतले नाही आपल्या ज्ञानाच्या कक्षेत ज्या ज्या वस्तु येऊ शकतात, त्या साऱ्याच्या पलीकडचा तो आहे त्याचे स्वरूप त्या साऱ्याहून अधिक उच्च आहे परमेश्वर अज्ञेय आहे या शब्दाचा खरा अर्थ असा आहे परमेश्वर जाणिवेत येऊ शकत नाही, कारण तो जाणिवेच्या पलीकडचा आहे त्याचे स्वरूप जाणिवेहून अधिक विस्तृत आहे ही खुर्ची आपल्या जाणिवेत येऊ शकते, पण परमेश्वराचे स्वरूप इतके विस्तृत आहे की आपल्या जाणिवेत येण्याइतके त्याचे आकुंचन केव्हाही होऊ शकत नाही तथापि त्याच्यावाचून या खुर्चीचे ज्ञानही आपणास होऊ शकणार नाही तो आहे म्हणून या खुर्चीचे ज्ञान आपणास होऊ शकते त्याच्या अभावी खुर्चीसुद्धा अज्ञेय होईल.

सर्व ज्ञानाचा साक्षी परमेश्वर आहे आपणास कशाचेही ज्ञान करून घ्याव-याचे असो, त्याच्या साक्षित्वावाचून आणि त्याच्या मध्यस्थीवाचून ही गोष्ट घडणे शक्य नाही आमच्या स्वत च्या साराचे सार तो आहे माझ्या ठिकाणी माझ्या अस्त्विाबद्दल जी जाणीव आहे, त्या जाणीवेचे जे सार ते त्याचे स्वरूप होय ? माझ्यातली ही जाणीव, हे 'मी' नाहीसे झाले तर कशाचेच ज्ञान मला व्हावयाचे नाही ब्रह्माचे स्वरूप हेंच प्रत्येक वस्तूचे ज्ञान होण्यास ब्रह्माचा आश्रय आणि त्याचे साक्षित्व याची जरूरी आहे याकरिता ही खुर्ची आहे इतकेच ज्ञान जरी तुम्हास करून घ्यावयाचे असलें, तरी तेसुद्धा परमेश्वराच्या अधिष्ठानावाचून आणि त्याच्या साक्षित्वावाचून करून घेता येणार नाही यावरून या खुर्चीपेक्षाही परमेश्वर आपणा सन्निध किती आहे हे आपल्या लक्षात आले असेलच तथापि त्याचे स्वरूप इतके उच्च आहे की, ते आपणास कधीही जाणता येणार नाही जाणीव आणि नेणीव या दोहोच्याहीपेक्षा ते अनतपटीने उच्च असे स्वरूप आहे तुमचे ते आत्मरूप होय जर परमेश्वर या विश्वास भरून उरताना तर एक निमिषही आपण जगलो असतो काय ? एक श्वासोच्छ्वासही आपणास करता आला नसता. कारण त्याच्या आश्रयाने आणि मध्यस्थीनेच आपण श्वासो-च्छ्वास करतो त्याच्या आश्रयावर आणि मध्यस्थीवरच आपले जीवित अव-लबून आहे याचा अर्थ असा नव्हे की कोठेतरी बाजूला उभा राहून माझ्या रक्ताचे अभिसरण तो करतो याचा अर्थ इतकाच की, तो माझ्या आत्म्याचे आत्मरूप आहे माझ्या आत्म्याचे जें सारसर्वस्व ते तो आहे मी परमेश्वराला जाणले असे म्हणणे तुम्हास त्रिकालातही शक्य नाही कारण असे शब्द उच्चारणें म्हणजे त्याची पदवी कमी करणे होय जी वस्तु आपणाहून भिन्न असते, तिचेच ज्ञान आपणास होते तुम्हाला स्वत ला तुमच्या स्वत च्या बाहेर जाता येणे शक्य नाही याकरिता परमेश्वराचे ज्ञान होणेही शक्य नाही ज्ञान म्हणजे प्रत्यक्षत्वास अथवा स्पष्टत्वास येणे स्वत च्या मनो-भावनेने एखाद्या वस्तूचे ज्ञान जेव्हा तुम्ही मनातल्या मनात करून घेता, तेव्हा-सुद्धा त्या वस्तूचे प्रत्यक्ष चित्र स्वतःच्या मन पटावर तुम्ही रंगवीत असता. अशा रीतीने स्वत पासून ती वस्तु प्रथम वेगळी करून नतर तिचे ज्ञान तुम्ही करून घेता. अशा रीतीने ज्या ज्या वस्तूचा विचार तुमच्या मनात येतो, ती

ती वस्तु दृश्य रूपात तुम्ही स्वत समोर माडता मी जितक्या काही वस्तु पाहिल्या आहेत अथवा जितक्या मला ज्ञात झालेल्या आहेत त्या साऱ्या स्मृतिरूपाने माझ्या चित्तात वास करून राहिलेल्या आहेत या साऱ्या वस्तूची चित्रे बीजरूपाने माझ्या मनात मी साठवून ठेविलेली असतात त्याच्यापैकी एखाद्या वस्तूचा विचार माझ्या मनात येण्याबरोबर माझ्या जाणिवेचे पहिले कार्य हे होते की, त्या वस्तूचे चित्र तावडतोब उद्भवून मजसमोर स्पष्ट उभे राहते ईश्वराबद्दल हे करता येणे शक्यच नाही कारण, आपल्या अतरात्म्याचे सारसर्वस्व तो आहे आपणापासून त्याचे चित्र आपणास वेगळें करता येणार नाही '**तत्त्वमसि**' हा जो वेदाताचा सिद्धात आहे त्याचा अर्थ हाच '**अह ब्रह्मास्मि**' या सिद्धाताचा अर्थही हाच दुसऱ्या कोणत्याही भाषेने परमेश्वरस्वरूपाचे वर्णन करता येणे शक्य नाही त्याला पिता म्हणणे अथवा बधु म्हणणे अथवा आपला सखा म्हणणे ही भाषा सर्वथैव चुकीची आहे कारण अशा रीतीने त्याचे चित्र आपणापासून वेगळे करणे असा ध्वनी या भाषेत उमटतो आणि त्याचे चित्र अशा रीतीने वेगळे करता येणे शक्य नाही हे आपण नुकतेच पाहिले आहे परमेश्वर प्रत्येक वस्तूचे चिरतन अधिष्ठान आहे परमेश्वर प्रत्येक वस्तूचा चिरतन ज्ञाता आहे तो ज्ञेय नसून ज्ञाता आहे या खुर्चीचा ज्ञाता मी आहे, मी ही खुर्ची पाहू शकतो, अशाच रीतीने परमेश्वर माझ्या जीवात्म्याचा चिरतन ज्ञाता आहे अशा स्थितीत त्याला तुम्ही वेगळे कसे करणार ? त्याला स्पष्टत्वास कसे आणणार ? प्रत्येक वस्तूचे जे सत्यत्व तेच परमेश्वराचे स्वरूप याकरिता मला तुम्हाला जे पुन पुन्हा बजावून सागावयाचे आहे ते हेच की, परमेश्वर जाणिवेच्या आणि नेणिवेच्याही बाहेरचा आहे तो ज्ञेय नाही अथवा अज्ञेयही नाही पण तो त्या दोहोच्या पलीकडचा आहे आपणाशी तो एकरूप आहे आणि जी वस्तु आपणाशी एकरूप झाली ती ज्ञेय अथवा अज्ञेय अशा प्रकारच्या कोणत्याही भाषेने बोलता येण्याजोगी नाही. तुम्हा स्वत ला स्वत पासून वेगळे करता येणे शक्य नाही मी अमुक म्हणून तुमच्या अतरात्म्याचे चित्र मन पटावर तुम्हास रगविता येणे शक्य नाही कारण, ते स्वरूप तुम्ही स्वत च आहात ते रूप अज्ञेय आहे असेही म्हणता येत नाही, कारण माझेच ज्ञान मला जितके आहे तितके दुसऱ्या

कोणत्या वस्तूचे असू शकेल काय ? माझ्या स्वत चे ज्ञान मला नाही असा एक क्षण तरी माझ्या आयुष्यात असतो काय ? वस्तुत आपल्या साऱ्या ज्ञानाचा मध्यवर्ती बिंदू स्वत चे ज्ञान हाच आहे याच दृष्टीने परमेश्वर ज्ञेय नाही अथवा अज्ञेयही नाही असे आम्ही म्हणतो कारण या दोहोच्याही पलीकडचा तो आहे आपले सत्यरूप तो आहे

केवलरूप कशापासून उत्पन्न झाले हा प्रश्न स्वभावत कसा अशक्य आहे व त्यात विरोध मुळातच कसा आहे हे आपल्या लक्षात आले असेलच त्याचप्रमाणे परमेश्वराला आपणापासून विभक्त करता येत नाही हेही आपणास समजले असेल आपला वास परमेश्वरातच आहे आणि परमेश्वर आपणात आहे आपण अतर्बाह्य त्याच्या स्वरूपात बुडून गेलो आहो ही गोष्ट आपल्या लक्षात आली असली अथवा नसली तरी ती सर्वथैव सत्य आहे आणि अशी वस्तुस्थिति असल्यामुळेच परमेश्वराला स्वत -पासून आपणास वेगळे करता येत नाही आपण कोणतेही कर्म केले तरी ते त्याच्या मध्यस्थीनेच होत असते आता काल, देश आणि निमित्त म्हणजे काय या प्रश्नाचा विचार करू अद्वैत म्हणजे जेथे दुजेपणाला जागा नाही ते जेथे दोन हा शब्दच लागू शकत नाही ते अद्वैत म्हणजे ‘**एकमेवाद्वितीयम्**’ असे असताही देश, काल आणि निमित्त या उपाधीच्या द्वारा हेच अद्वितीय अथवा केवलरूप अनेकश व्यक्त झाले असल्याचे आपण पाहात आहो हा आपला प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळे केवलरूप आणि माया असे द्वैत कायमचे असावे असे वरवर दिसते माया म्हणजे काल, देश आणि निमित्त या उपाधीचे समवायीरूप केवलरूप आणि माया या दोहोनाही कायमचे अस्तित्व असावे असे खात्रीपूर्वक वाटण्याचा फार सभव आहे याला अद्वैत सिद्धाती असे उत्तर देतात की असे द्वैत असणे शक्य नाही दोन सत्यरूप वस्तू म्हटल्या म्हणजे त्या दोन्हीही परस्परावर अवलबून नसणाऱ्या अशा वस्तू असल्या पाहिजेत त्या दोन्हीही पूर्ण स्वतत्र असल्या पाहिजेत. त्या जर परस्परावलबी असतील तर त्या दोहोचेही अस्तित्व सत्यरूप होऊ शकणार नाही काल ही पूर्णपणे परावलबी कल्पना आहे आपल्या मनोभूमिकेत बदल होण्याबरोबर या कल्पनेत बदल होत असतो केवळ क्षणभर स्वस्थ पडले तर तेवढ्यात सुद्धा कित्येक वेळा कित्येक वर्षाचा काल

गेल्याचा भास होतो कित्येक वेळा महिनेच्या महिने क्षणार्धाप्रमाणे गेल्या-सारखे आपणास वाटते सुखाचा दीर्घकाल किती लहान वाटतो आणि दु खाचा थोडासा वेळही युगासारखा कसा लाब वाटतो याचा अनुभव आपणा सर्वास आहे यावरून कालकल्पना ही आपल्याच मन स्थितीवर सर्वथैव अवलबून आहे ही गोष्ट कोणाच्याहि सहज लक्षात येण्यासारखी आहे. कित्येक वेळा तर आपली कालकल्पना समूळच नष्ट होते देशकल्पनाही याच जातीतली आहे देश म्हणजे काय याची वास्तविक कल्पना आपणास मुळीच नाही देश अथवा अवकाश याचा विस्तार किती आहे हे सागता येणे आपणास शक्य नाही अशा रीतीने या कल्पनेचे स्वरूप पूर्ण अनिश्चित असताही ही कल्पना आपल्या मनात आहे हे मात्र खरे हीच गोष्ट निमित्त या कल्पनेलाही लागू आहे

देश-काल निमित्त या कल्पनेचा एक विशेष असा आहे की, दुसऱ्या कोणत्यातरी वस्तूस ती जोडल्यावाचून तिचे अस्तित्व आपल्या मनात असू शकत नाही ज्याला अत नाही अथवा कसलेही रगरूप नाही अथवा कोणत्याही सृष्टपदार्थाशी सबध नाही असा अवकाश आपल्या चित्तात आणण्याचा यत्न करून पहा ही गोष्ट करणे तुम्हास शक्यच नाही अवकाश ही कल्पना मनात आणावयाची झाली तर अमुक दोन वस्तूंच्या मधली मर्यादित जागा अशीच कल्पना तुम्हास करावी लागते कोणत्या तरी पदार्थाला जोडल्यावाचून या कल्पनेला आपणास अस्तित्वच देता येत नाही कालकल्पनेलाही हाच नियम लागू आहे केवलरूप कालाची कल्पना आपणास करता येत नाही अमुक काल असे आपल्या चित्तात आल्याबरोबर त्या विशिष्ट अवधीच्या मागल्या आणि पुढल्या घडलेल्या गोष्टी आपल्या चित्तात आपोआपच उभ्या राहातात एका काली घडलेली एक गोष्ट आणि त्यानतर घडलेली दुसरी गोष्ट याचा सबध कालकल्पनेच्या मधल्या दुव्याने आपण जोडीत असतो अवकाश ही कल्पना चित्तात येण्यास ज्याप्रमाणे दोन वस्तूचे अस्तित्व लागते, त्याचप्रमाणे कालकल्पनेसाठीही दोन गत गोष्टीचे अस्तित्व लागत असते त्याचप्रमाणे निमित्तकल्पनाही काल आणि देश या दोन कल्पनापासून भिन्न करता येत नाही देश-काल-निमित्त या कल्पनेबद्दल जी विशेष लक्षात ठेवण्यासारखी खुबी तो हीच की या कल्पनेला स्वतत्र अस्तित्व

नाहीं. या खुर्चीला अथवा त्या भिंतीला जितके स्वतंत्र अस्तित्व आहे, तितकेसुद्धा देश-काल-निमित्त या कल्पनेला नाही प्रत्येक वस्तूभोवती ही कल्पना केवळ छायारूपाने पसरली आहे या खुर्चीला अथवा त्या भिंतीला ज्याप्रमाणे आपणास स्पर्श करता येतो, त्याप्रमाणे तिला स्पर्शही करवत नाही तिला खरे अस्तित्व नाही, तथापि तिला अस्तित्व नाही असेही म्हणता येत नाही कारण तिच्याद्वाराच हे सारे विश्व प्रत्यक्षत्वास येत आहे अशा रीतीने देश-काल-निमित्त या कल्पनेला अस्तित्व नाही आणि नास्तित्वही नाही हे आपल्या लक्षात आले असेलच दुसरा मुद्दा असा की, कित्येक वेळा ही कल्पना आपल्या चित्तातून समूळच नष्ट होते उदाहरणार्थ समुद्रावर लाट उठलेली आपण पहातो ती लाट म्हणजे समुद्रच हे आपणास माहीत असते तथापि लाट या नात्याने समुद्रापासून ती वेगळी आहे अशी जाणीवही आपल्या ठिकाणी असते हा भेद कसा झाला? नाम आणि रूप यामुळे हा भेद झाला आपल्या मनात जी नामरूपाची कल्पना आहे तिजमुळे हा भेद उत्पन्न झाला. आता समुद्राची कल्पना सोडून देऊन नुसत्या लाटेचीच कल्पना आपल्या चित्तात आपणास उभी करता येते काय? कधीच नाही समुद्र-कल्पना आणि तरंगकल्पना या दोन्ही अविभाज्य आहेत लाट खाली जाण्या-बरोबर आकारही नष्ट होतो, पण तो आकार खोटा नसतो तो आकार हा आपल्या चित्ताचा भ्रम नसतो तो आपण प्रत्यक्ष पाहिलेला असतो. जो-पर्यंत लाट होती तोपर्यंत आकारही होता आणि तो तुम्हास दिसणे अनिवा-र्यच होते मायेचे स्वरूप हेच

हे सर्व विश्व म्हणजे एक विशिष्ट आकार आहे हे तुमच्या लक्षात आता आले असेलच केवलरूप हे महासागरासारखे असून मी, तुम्ही, सूर्य, तारे इत्यादि सारे दृश्य पदार्थ त्या महासागरावरील लहानमोठ्या लाटा होत या लाटात लहानमोठेपणा कोठून आला? हा लहानमोठेपणा फक्त आकारात आहे हा आकार म्हणजे देश-काल-निमित्त हीच उपाधि होय ही उपाधी अथवा हा आकार त्या लाटेच्या अस्तित्वावर अवलंबून आहे ती लाट नाहीशी होण्याबरोबर देश-काल-निमित्त ही उपाधीही नष्ट होते एकाद्या व्यक्तीने मायेची ही उपाधी टाकून दिली म्हणजे मायाभ्रमही नष्ट होऊन तो मुक्त होतो देश-काल-निमित्त या उपाधीला आपण अत्यंत

चिकटून बसलेले आहो आपल्या मुक्तीच्या मार्गात आडव्या पडलेल्या या उपाधीला झुगारून देण्यासाठीच आपली ही सारी धडपड आहे सध्याच्या उत्क्रातिवादाचे तरी मूलरूप काय आहे? यात दोन मुख्य गोष्टी आहेत पहिले तत्त्व हे की एक प्रचड गुप्त शक्ति व्यक्तत्वास येण्याकरिता धडपडत आहे, आणि दुसरे तत्त्व हे की तिच्या आजूबाजूची परिस्थिति तिला दडपून टाकीत आहे ती प्रचड शक्ति व्यक्त होण्यासाठी धडपडत असता परिस्थिति तिला आड येत आहे या परिस्थितीशी झगडण्याकरिता त्या शक्तीला पुन पुन्हा नवी नवी शरीरे धारण करावी लागतात अत्यत क्षुद्र कीटक स्वत स व्यक्त करण्याकरिता धडपडत असतो त्याच्या मार्गात काही अडथळे येतात ते अडथळे त्या देहाने दूर होत नाहीत असे पाहून दुसरा देह तो धारण करतो आणि काही अडथळ्यास तो जिंकतो. अशा रीतीने देहामागे नवे देह व अनेक अडथळे जिकीत जिंकीत मनुष्याच्या स्वरूपापर्यंत तो येतो आता हीच विचारसरणी गृहीत धरून हीच तर्कपद्धति आपण पुढे चालू केली, तर कीटकापासून मनुष्यत्वास आलेली ही शक्ति अखेरीस सर्व अडथळे जिकून परिस्थितीच्या फासाबाहेर निघून जाईल हे उघड दिसते हाच सिद्धात तत्त्वाच्या भाषेने बोलावयाचा म्हटले तर त्याची माडणी अशी होईल प्रत्येक क्रिया दोन भागाची मिळून होत असते प्रत्येक क्रियेत दोन पोटक्रिया असतात एक कर्ता आणि एक क्रिया क्रिया ही कर्त्याच्या ताब्यात सदोदित रहावी, हा मानवी जीवितक्रमाचा एकच हेतू आहे त्याला धनीपण हवे आहे एखादा मनुष्य मला काही अपशब्द बोलला तर मला ताबडतोब दु ख होते अशा स्थितीत माझी सारी धडपड माझे मन धष्टपुष्ट करण्याकडे असते अशा प्रकारचा शब्दाचा आघात त्याजवर झाला तरी ते विकृत होऊ नये, याच हेतूने मी अनेक खटपटी करीत असतो अशाच रीतीने अखेरचा विजय सपादन करण्याकरिता आपण सारे यत्न करीत आहो नीति म्हणून जी आपण म्हणतो तिचाही वास्तविक अर्थ हाच आहे आपल्या या वागणुकीचे साधर्म्य केवलरूपाशी व्हावे अशा रीतीने वागणे ही नीति आपण केवलतत्त्वाशी साधर्म्य पावलो म्हणजे मर्यादित सृष्टीच्या बाहेर आपण जाऊ आणि ती आपला अमल आम्हावर गाजवू शकणार नाही सृष्टि मर्यादित

आहे या मर्यादेत आपण आहो तोवरच तिचा अमल आपणावर चालतो या मर्यादेच्या बाहेर जाण्याचा यत्न आपण करीत आहो आणि एक वेळ अशी येईल की आपला हा यत्न सफल होऊन आपण तिच्या मर्यादेबाहेर जाऊ या म्हणण्यात तर्कशास्त्राशी कोणताही विरोध येत नाही तर्कपद्ध-तीला हे मत अगदी सुसगत असे आहे

आता आपणास शिकण्यासारखी आणखीही एक गोष्ट आहे सृष्टि मर्या-दित आहे हे खरे कशावरून ? या प्रश्नाचे समर्पक उत्तर अतीद्रियशास्त्रच तुम्हास देईल सृष्टि म्हणजे अनताचेच मर्यादित रूप याकरिताच सृष्टि मर्यादित आहे अनत अथवा केवलरूप नामरूपाने मर्यादित होणे म्हणजेच सृष्टि अथवा विश्व उत्पन्न होणे होय ती मर्यादित नसेल तर अनतरूप होईल याकरिता आपल्या मार्गातील सर्व अडथळे जिकून समर्याद सृष्टीच्या बाहेर जाण्याचा एक वेळ खचित येईल असे म्हटले तर तर्कशास्त्राशी यात काय विरोध होतो ? आता हे अडथळे कसे जिकावयाचे एवढाच प्रश्न उरला आपल्याभोवती अनेक प्रकारच्या परिस्थिती आहेत यातील प्रत्येक जिकू म्हटले तर ती गोष्ट जवळ जवळ अशक्यच म्हटली पाहिजे पाण्यातल्या लहानशा माशाला शत्रूपासून सरक्षण करण्याची इच्छा होते हे तो कसे साधतो ? तो स्वत ला पख निर्माण करतो आणि आपले रूपातर पक्ष्याच्या रूपात करून घेतो त्या माशाने पाण्याच्या अथवा हवेच्या परिस्थितीत काही बदल केला नाही तसा बदल करणे त्याला शक्य नव्हते त्या परि-स्थिती जिकणे त्याच्या आहाराबाहेरचे होते, तथापि स्वत च्या रूपात बदल करून त्याने आपला हेतू सिद्धीस नेला अशा प्रकारचा बदल नेहमी कर्त्यात होत असतो उत्क्रातिशास्त्र तुम्ही पाहिले तरी तेथेही तुम्हास हीच गोष्ट आढळून येईल त्या ठिकाणीही सृष्टीत बदल होत नसून कर्त्यात तो होत असतो हीच गोष्ट सिद्ध केलेली आहे हेच तत्त्व धर्मशास्त्र आणि नीति-शास्त्र याना तुम्ही लागू केले तर कर्त्यात होणाऱ्या बदलामुळेच जगातील वाईट गोष्टीवर विजय मिळविता येतो असे तुम्हास दिसून येईल सृष्टीला सुधारीत बसण्याचा यत्न करण्यापेक्षा स्वत च तुम्ही सुधारला तर जगातील वाईटावर तुम्हास विजय मिळविता येईल अद्वैताने हाच सिद्धात सागितला आहे अमुक परिस्थिति ‘ वाईट ’ आहे अथवा अमक्या प्रकारचे दु ख जगात

आहे हे म्हणणेच मूर्खपणाचे आहे वास्तविक या साऱ्याचे जन्मस्थान तुमच्या आत आहे त्याना तुमच्या बाहेर अस्तित्व नाही मनावर कोणताही आघात होऊ द्यावयाचा नाही, इतके बलवान मी ते केले तर क्रोधादि विकार मला काय करणार आहेत? द्वेष माझ्या मनातून मी समूळ काढून टाकला तर मला कोणाचाही द्वेष करणे शक्य राहणार नाही क्रोधद्वेषादि कल्पनाना माझ्याच मनात अस्तित्व आहे या कल्पना माझ्या मनातून नाहीशा झाल्या तर क्रोधद्वेषाचे वारेही मला लागणार नाही

याकरिता पूर्णत्व पावण्याचा मार्ग म्हटला म्हणजे हाच की कर्त्यात सुधारणा करून त्याला पूर्ण करणे अर्वाचीन पदार्थविज्ञान आणि नीतिशास्त्र याशी सुसगत राहून त्याच्याही पुढे पाऊल टाकलेले एखादे धर्मशास्त्र असले तर ते अद्वैतशास्त्रच होय, असे मी ठासून सागतो प्राचीनकाळच्या द्वैत मताने सर्व गरजा भागण्यासारख्या नाहीत असे आटळून आल्यानतर अद्वैतशास्त्राची उत्पत्ति झाली मनुष्याच्या ठिकाणी श्रद्धा अवश्य पाहिजे आणि ती श्रद्धा बुद्धिपूर्वक पाहिजे आपल्या वापदाद्यानी सागितलेला धर्म तेवढाच खरा आणि परकीयाकडून आलेला धर्म खोटा अशा प्रकारची कल्पना या एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीच्या भागात शिल्लक आहे यावरून मनुष्याचे मन अद्यापिही कमकुवत आहे हे दिसून येते अशा प्रकारच्या कल्पना आपण झुगारून दिल्या पाहिजेत मी केवळ तुमच्या देशासच (इग्लडास) अनुलक्षून बोलतो असे समजू नका प्रत्येक देशात हीच स्थिति आहे, आणि खुद्द माझ्या मातृभूमीत तर तिला वेडे पीक आले आहे अद्वैतशास्त्राचा प्रसार अगदी खालच्या वर्गापर्यंत केव्हाही झालेला नाही हे मत काही ऋषीनी प्रथम स्थापित केले आणि ते अरण्यात जाऊन राहिले याकरिताच त्याला आरण्यक ही सज्ञा मिळाली. परमेश्वराच्या कृपेने बुद्ध अवतरला आणि हेच मन त्याने खालच्या वर्गापर्यंत पोहोचविले. त्या वेळी सारे राष्ट्र बौद्ध झाले त्यानतर बराच काळ लोटून सशयवादी आणि निरीश्वरवादी उत्पन्न होऊन त्यानी सारे राष्ट्र नाशाच्या पथाला लावले जडवादातून हिदुस्थान देशाला मुक्त करणे फक्त अद्वैतशास्त्रालाच शक्य आहे ही गोष्ट त्या वेळी दिसून आली

अशा रीतीने अद्वैतशास्त्राने भरतभूमीला दोन वेळा जडवादापासून मुक्त केले आहे. बुद्धावतारापूर्वी हिदुस्थान देश जडवादात अगदी बुडून गेला

होता आणि तो जडवादही अगदी घाणेरड्या स्वरूपाचा होता त्याचे स्वरूप हल्लीच्या जडवादाहूनही अधिक अमंगल होते एका अर्थाने मीही जडवादीच आहे कारण सर्व अस्तित्व एकरूप आहे असे मी म्हणतो अर्वाचीन जडवादीही तुम्हाला हेच सांगतात, पण ते अस्तित्व जडरूप आहे असे ते म्हणतात आणि येथेच त्यांचा व आमचा फरक आहे ते अस्तित्व परमात्मरूप आहे असें मी म्हणतो आणि ते केवळ जड आहे असे अर्वाचीन जडवादी म्हणतात केवळ या एकरूपापासूनच सर्व धर्म, सर्व विचार, सर्व आशा आणि सर्व वस्तु निर्माण झाल्या आहेत असे जडवादीही कबूल करतात हे सर्व ब्रह्मातून निर्माण झाले आहे असे मी म्हणतो पण बुद्धावतारापूर्वी जो जडवाद निर्माण झाला होता त्याचे स्वरूप '**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत । ऋण कृत्वा घृत पिबेत्।** या एका श्लोकात साठविले होते जीवमान असेपर्यंत शक्य तितकी चैन करणे हीच नीति आणि पुढचा काही विचार न करता ऋण काढून सण करणे हाच धर्म, हे या पूर्वीच्या जडवादाचे रूप होय या तत्वज्ञानाचा प्रसार हिंदुस्थानात त्या काळी इतका झाला होता की त्याचा काही अवशेष अद्यापिही कोठे कोठे सापडतो बुद्धदेवाने वेदांतधर्म पुन्हा प्रकाशात आणला अगदी खालच्या वर्गापर्यंत त्याचा प्रसार करून त्यांनं भरतभूमीचे रक्षण केले बुद्धावताराच्या समाप्तीनंतर सुमारे एक हजार वर्षांनी जडवाद पुन्हा धुडगुस घालू लागला हिंदुस्थानातील बहुतेक लोक बौद्धानुयायी बनलेले होते बराच काळ लोटल्यामुळे बुद्ध देवाने सांगितलेल्या तत्त्वाचे स्वरूप विकृत झाले होते बहुतेक लोक अज्ञानतिमिरात बुडून गेले असल्यामुळे बौद्धमताचे आकलन त्यांच्या मतीला करता येईनासे झाले होते विश्वाचा शास्ता परमेश्वर म्हणून कोणी नाही असे बौद्ध मत असल्यामुळे सामान्य जनतेने आपल्या देवदेवता, ग्रामदैवते, क्षुद्र दैवते आणि भुतेखेते यांना पुढे आणले आणि बुद्ध देवाने सांगितलेल्या तत्त्वाची त्यांनी एकच खिचडी करून टाकली यामुळे जडवादाचा अमल पुन्हा गाजू लागला उच्चवर्गीय लोक इंद्रियजन्य सुखाच्या मागे धावत सुटले आणि खालचा वर्ग भोळसरपणे वाटेल तसा वागू लागला. या वेळी श्रीशंकराचार्यांचा अवतार निर्माण झाला आणि वेदांततत्त्वाला त्यांनी पुन्हा चालन दिले बुद्धिगम्य मार्गावर आरूढ होऊन वेदा-

ताची त्यांनी पुन्हा स्थापना केली उपनिषद् ग्रंथातील विवेचन पुष्कळ वेळा बुद्धीला आकलन करता येत नाही बुद्धदेवाचा सारा भर तत्त्वज्ञानातील नीतिशास्त्र शिकविण्याकडे होता श्रीशंकराचार्यांनी त्याचे बौद्धिक स्वरूप व्यक्त केले विवेचक बुद्धीला पटेल अशा रीतीने उपनिषद् ग्रंथाची मांडणी आचार्यांनी केली अद्वैत सिद्धांताच्या साखळीतील प्रत्येक दुवा तावून, सुलाखून पक्का खणखणीत आहे असे त्यांनी जगाच्या निदर्शनास आणले

जडवाद आज युरोपात प्रबळ आहे बुद्धीला पटल्यावाचून अर्वाचीन संशयवादी लोक कोणताच सिद्धांत ग्रहण करीत नाहीत परमेश्वराने त्यांच्या आत्म्यांचे तारण करावे अशी प्रार्थना तुम्ही वाटल्यास करा, पण आपल्या बुद्धीचा मार्ग ते सोडणार नाहीत बुद्धीचे समाधान होईल असा धर्म अथवा तत्त्वज्ञान यूरोपाला मिळाले तरच तरणोपाय आहे, आणि अशा प्रकारच्या बुद्धिमार्गी लोकांचे समाधान करण्याचे सामर्थ्य जर कोणत्या धर्मात असेल तर ते अद्वैत धर्मातच आहे धर्माचा पूर्ण लोप होऊन अधर्म मातला म्हणजे वेदांत धर्म उदय पावतो, आणि यामुळेच आजही युरोपात आणि अमेरिकेत त्याचे बीज रुजत आहे.

आता अद्वैतासंबंधी आणखीही एक गोष्ट मला आपणास सांगावयाची आहे प्राचीन उपनिषद् ग्रंथातील तत्त्वज्ञान पूर्णपणे काव्यमय आहे त्या ग्रंथाचे कर्ते कवी होते. अंतःस्फूर्ति फक्त कवीलाच होते असे प्लेटो म्हणतो हे प्राचीन मंत्रद्रष्टे ऋषी अशाच प्रकारचे कवी होते सामान्य जनतेच्या बुद्धीच्या कक्षेबाहेर उड्डाण करून काव्यरूपाने सत्य प्रमेये त्यांनी पाहिली त्यांनी धर्मोपदेश कधी केला नाही, तत्त्वसिद्धांताचे उद्घाटन त्यांनी केले नाही अथवा त्यावर ग्रंथही लिहिले नाहीत त्यांच्या अंतःकरणातून काव्यौघ आपोआप बाहेर पडला **सिद्धप्रज्ञेचेनि लाभे। मनचि सारस्वतें दुभे। मग सकल शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें ॥** अशी सिद्धप्रज्ञाची स्थिति त्यांना प्राप्त झाली होती बुद्धदेवाच्या ठिकाणी अंतःकरणाचे विशालत्व दृष्टीस पडते त्याचे अंतःकरण विश्वरूप होऊन गेले होते धर्माचे व्यवहार्य रूप काय आहे हे स्वतःच्या आचरणाने दाखवून त्याने ते सर्वांच्या आटोक्यात आणून दिले श्रीशंकराचार्यांच्या ठिकाणी बुद्धीचे अतुल वैभव दिसून येते. प्रत्येक वस्तूवर आपल्या बुद्धिसूर्याचा पूर्ण प्रकाश त्यांनी पाडला आहे

बुद्धदेवाचे उदार अतकरण आणि आचार्यांचे बुद्धितेज या दोन गोष्टींचे एकत्र रूप आज आपणास हवे आहे असा अभूतपूर्व सयोग घडून आला तर त्यातून जगाने पूर्वी पाहिले नाही अशा स्वरूपाचे अत्युच्च तत्त्वज्ञान निर्माण होईल अशा स्थितीत अर्वाचीन भौतिक शास्त्रे आणि प्राचीन धर्म एकमेकाच्या हातात हात घालून चालतील काव्य आणि तत्त्वज्ञान ही स्नेह-रज्जूंनं एकत्र बाधली जातील भविष्यत्काली उदय पावणारा धर्म अशा स्वरूपाचा आहे असा सद्धर्म सिद्ध झाला तर सर्वकाली आणि सर्वस्थली, सर्व लोकाच्या उपयोगी तो पडेल अर्वाचीन शास्त्राला हा धर्म पूर्ण समत होईल अर्वाचीन शास्त्रे आजच हळू हळू त्याकडे जाऊ पाहात आहेत व्यक्तत्वास आलेल्या अनेक वस्तु म्हणजे एकाच शक्तीची अनेक रूपे आहेत असे अर्वाचीन शास्त्र जेव्हा सागते तेव्हा प्राचीन उपनिषद् ग्रथाची आठ-वण आपणास होत नाही काय ? अर्वाचीन शास्त्राचा कल कोणीकडे आहे हे आपणास आता स्पष्ट दिसत नाही काय ? भरतभूमीने मनाच्या द्वारे आणि तर्कशास्त्रपद्धतीने धर्माचा अभ्यास केला अतींद्रिय ज्ञानाच्या मागे ती लागली होती युरोपीय राष्ट्रे हाच अभ्यास बाह्यसृष्टीच्या द्वारे आज करीत आहेत आणि आता तीही तेच सिद्धात प्रस्थापित करू पाहात आहेत अत-सृष्टीचा अभ्यास करून '**एकमेवाद्वितीयम्**' हा सिद्धात आम्ही ठरविला अर्वाचीन जड शास्त्रेही हाच सिद्धात आता प्रस्थापित करू पाहात आहेत. जी एकच शक्ति विश्वात आहे तीच निरनिराळ्या स्वरूपाने निरनिराळ्या वस्तु म्हणून प्रगट होत आहे असे अर्वाचीन जड शास्त्र आपणास सागत आहे सर्व मनुष्ये स्वतत्र होण्याकरिता धडपडत आहेत आणि सृष्टीच्या बध-नातून मोकळे व्हावे हीच त्याची इच्छा आहे असे अर्वाचीन शास्त्रेही कबूल करू लागली आहेत आम्ही नीतिमान् का असावे कारण नीतीच्याच द्वारे मोक्षाचा लाभ होईल आणि अनीतीच्या द्वारे सृष्टीच्या शृखलेत पडाल असे अर्वाचीन शास्त्रेही सागू लागली आहेत

अद्वैतशास्त्र दुसऱ्या कोणत्याही धर्माशी विरोध करू इच्छित नाही हा त्याचा आणखी एक विशेष लक्षात ठेवण्यासारखा आहे. '**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसगिनाम्।** ( गीता अ० ३, श्लो० २६ ) दुसऱ्या धर्माशी विरोध करून त्याच्या अनुयायात बुद्धिभेद करावा अशी अद्वैताची इच्छा

नाही दुसऱ्या धर्मात ढवळाढवळ करून मोडतोड करणे हे अद्वैताचे ब्रीद नाही उलटपक्षी प्रत्येकाला मदत करून तो त्याला अधिकाधिक उच्च दशेवर आरूढ करतो अद्वैतशास्त्राने सर्व मनुष्यजातीला आपल्या पोटाशी धरिले आहे सर्व विश्वाचे जे समवायी रूप तेच परमेश्वराचे स्वरूप होय असे या शास्त्राचे सागणे आहे सर्व जगाचा एक धर्म व्हावा अशासाठी तुम्ही खटपट करीत असाल तर तो धर्म अर्धवट स्वरूपाचा असता उपयोगी नाही. त्याचे स्वरूप पूर्ण असून त्यात सर्व प्रतीच्या धर्ममताचा अतर्भाव झाला असला पाहिजे

दुसऱ्या कोणत्याही धर्मात ही कल्पना इतक्या स्पष्टपणे गोवलेली आढळत नाही अद्वैताशिवाय बाकीचे सारे धर्म अर्धवट असून पूर्णत्व पावण्यासाठी धडपडत आहेत यामुळेच ते अर्धवट असताही आज जिवत राहिले आहेत हिंदुस्थानात अनेक पथ पुरातन काळापासून अस्तित्वात आहेत, तथापि अद्वैताने त्याच्याशी कधीच विरोध केलेला नाही द्वैतवादी आजमितीसही आहेत आणि त्याची सख्याही फार मोठी आहे कारण अशिक्षित मनाला द्वैतमत जितके लवकर पटते तितके अद्वैत पटत नाही द्वैतमत हे मोठे सोईचे, स्वाभाविक आणि सामान्य बुद्धीच्या माणसाला पटण्यासारखे असे आहे तथापि त्याच्याशीसुद्धा अद्वैताने विरोध केलेला नाही परमेश्वर या विश्वाच्या बाहेर कोठेतरी आहे असे द्वैतमत असता परमेश्वर आणि माझा आत्मा एकच आहेत असे अद्वैत सागते परमेश्वर बाहेर कोठेतरी आहे असे म्हणणे हा परमेश्वराचा उपहास होय असे अद्वैत शास्त्र म्हणते आम्हाला अत्यत सन्निध जर कोणी असेल तर तो परमेश्वर होय असे अद्वैताचे सागणे आहे असे असताही द्वैताची कल्पना स्वाभाविक असल्यामुळे तिचे अस्तित्व असणेही अनिवार्य आहे ही गोष्ट अद्वैताला कबूल आहे, आणि जे द्वैती युक्त मार्गाने चालले आहेत, त्याच्याशी त्याचा तटाही नाही द्वैतवाद्याला सर्वत्र भेद दिसेल. त्याने ज्या मताचा अगिकार केलेला आहे त्याचा हा प्रकृतिस्वभावच आहे ठीक आहे त्याच्याशी अद्वैत विरोध करू इच्छित नाही तोडाने कसलीही उपपत्ति द्वैतवादी सागत असला तरी दोघाचे अखेरचे साध्य एकच आहे हे अद्वैत जाणून आहे. या अखेरच्या साध्याबद्दल मात्र या दोन मतात फार फरक आहे द्वैताशिवाय बाकी सर्व मते चुकीची आहेत

असा द्वैतवाद्याचा अट्टाहास आहे परमेश्वर हा व्यक्तिविशिष्ट आहे असे जगातील द्वैतवाद्याचे मत आहे ज्याप्रमाणे एखादा चक्रवर्ती राजा कोणावर कृपा करतो व कोणाचें शीर उडवितो, त्याचप्रमाणे सर्व सत्ताधारी परमेश्वरही कोणाला बक्षीस देतो आणि कोणाला दड करतो असे द्वैतमत आहे एखाद्या व्यक्तीवर अथवा एखाद्या विशिष्ट मानववशावर त्याची कृपा अकारण होत असते आणि तो त्याना सर्व प्रकारची सुखे देत असतो अशा स्थितीत आवडते आणि नावडते असा भेद परमेश्वरापाशी आहे ही कल्पना स्वाभाविकपणेच द्वैतवाद्याच्या चित्तात उभी राहते आणि आपणही परमेश्वराच्या लाडक्यात शिरावे अशी त्याला इच्छा होते "आम्ही परमेश्वराचे लाडके आहो आणि आमच्या मतावर विश्वास ठेवाल तर तुम्हीही त्याच कोटीत याल" असली मते प्रत्येक धर्मात नमूद केलेली तुम्हास आढळतील काही काही द्वैती तर इतके आकुचित मनाचे असतात की, परमेश्वराचे थोडेसे लाडके लोक मात्र तरून जाणार आहेत आणि बाकीच्या मनुष्यानी कितीही धडपड केली तरी या लाडक्यात त्याग जमा केले जाणार नाही असे ते म्हणतात असला आकुचितपणा अधिकउण्या प्रमाणावर ज्या द्वैत धर्मात नाही असा एकही द्वैतवादी धर्म अस्तित्वात नाही असे मी निश्चयाने सागतो यामुळे द्वैतवादी धर्मानी आपआपसात युद्धे करीत रहावी हे रीतसरच आहे, आणि द्वैतवादी धर्माचा इतिहास पाहिला तर त्यातही हेच आढळून येते द्वैतधर्माचे भक्त बहुधा अशिक्षितातच फार आढळतात मी मोठा आहे असे वाटणे, ही भावना मनुष्याच्या ठिकाणी स्वाभाविक आहे आणि मनुष्य जो जो अधिक अशिक्षित तो तो या भावनेचा पगडा अधिक असावयाचा अशा स्थितीत परमेश्वराच्या लाडक्यापैकी आपण एक आहो या भावनेने त्याचे चित्त लवकर खुलते द्वैतवाद्याचा परमेश्वर म्हणजे सदोदित हातात सोटा वागविणारा एक अधिकारीच होय पाठीवर सोटा बसल्यावाचून तुम्ही कधीच सुधारणार नाही आणि तुमच्या परमेश्वराच्या हाती सोटा असल्यावाचून तुम्ही कधीच नीतिमान् होणार नाही असे द्वैतवादी सागतात. गरीब बिचाऱ्या खालच्या वर्गातील लोकाना फारसा विचार नसतो, आणि हा मोठा वर्ग द्वैताचा अनुयायी असतो या गरीब बिचाऱ्या वर्गाचा छळ हजारो वर्षे प्रत्येक देशात चालू आहे यामुळें परमेश्वराच्या शिक्षेतून मोकळे होणे हीच

मुक्ति अशी त्याची कल्पना झाली आहे "सैतानाची कल्पना तुमच्या धर्मात नाही काय ? असे असणे कसे शक्य आहे ?" असा प्रश्न अमेरिकेतील एका धर्मोपदेशकाने मला विचारला, पण जगातील सर्व विशाल बुद्धीचे पुरुष अद्वैताच्या मार्गानेच गेलेले आहेत "मी आणि माझा पिता एकच आहोत" असे म्हणणारा पुरुष खरोखरच मर्द होता हजारो वर्षे तो जगाचे कल्याण आज करीत आहे तो अद्वैती होता म्हणूनच दुसऱ्याबद्दल त्याच्या पोटात दया होती हे आपणास स्पष्ट कळते "आकाशातील आपल्या पित्याची प्रार्थना करा" असा उपदेश त्याने सामान्य जनतेस केला ज्या सामान्य जनतेला याहून अधिक उच्च कल्पना आकलन करण्याची पात्रता नाही तिला हा उपदेश योग्यच आहे "मी द्राक्षाचा वेल असून तुम्ही माझ्या खाद्या आहा" असे त्याने उच्चवर्गीयास म्हटले, आणि "मी आणि माझा पिता एकच आहो" हे रहस्य त्याने आपल्या शिष्याना मात्र सागितले

द्वैतवाद्याच्या या परमेश्वरविषयक कल्पना महानुभाव बुद्धाला कधीच समत झाल्या नाहीत असल्या कल्पनाची पर्वा त्याने केली नाही म्हणून लोक त्याला निरीश्वरवादी आणि जडवादी असे म्हणू लागले पण हाच बुद्धदेव एखाद्या क्षुद्र बकऱ्यासाठी सुद्धा देहत्याग करण्यास तयार होता साऱ्या जगातल्या अत्युच्च नीतिविषयक कल्पना याच नरश्रेष्ठाने पुढे आणल्या जेथे कोठे नीतिविषयक कल्पनाचा प्रसार झाला असेल, तेथे तेथे त्यात या नीतिसूर्याच्या एखाद्या किरणाचा तरी प्रवेश झाला असल्याचे आढळून येईल जगात अशा प्रकारचे जे श्रेष्ठ पुरुष होऊन गेले, ते सारे इतक्या उदार बुद्धीचे होते की, त्याची ती बुद्धि एखाद्या विशिष्ट देशाला अथवा ज्ञातीला कधीच चिकटून बसली नाही आज बुद्धीची वाढ एवढी मोठी झाली आहे व भौतिक शास्त्रीय ज्ञानाची लाट अशी प्रचड उसळली आहे की, असा प्रकार या काळी घडून येईल असे स्वप्नसुद्धा शेपन्नास वर्षापूर्वी कोणास पडले नसते मनुष्यजातीच्या इतिहासात एवढी क्राति सध्या घडली असता बुद्धासारख्या नरश्रेष्ठाला एखाद्या देशाच्या मर्यादेत कोडून ठेवणे आपणास शक्य नाही सर्व जनतेला त्याचा प्रसाद आता अवश्य मिळाला पाहिजे. लोकाच्या वृत्ती जुलमाने आकुचित करण्याचा यत्न करणे अत्यत अनुचित आहे त्यायोगे मनुष्याची अवनति होऊन व ती अविचारी बनून पशूच्या योग्य

तेस जातात नीतिदृष्ट्या हा त्याचा वधच होय आजच्या काळी आपणास कशाची जरूर असेल तर अत्यत उदार अत करण आणि अत्यत विशाल बुद्धि याच्या सयोगाची आहे निस्सीम प्रेम आणि निस्सीम ज्ञान ही एकत्र नादणे आज आपणास अवश्य आहे. ‘सच्चिदानद’ एवढीच परमेश्वराची व्याख्या वेदाताने केली आहे याहून अधिक विशेषणाची उपाधी परमेश्वराच्या मागे त्याने लावलेली नाही सत्–चित् आणि आनद याचे जे समवायीरूप ते परमेश्वर अशी वेदाताची व्याख्या आहे प्रेम आणि ज्ञान यावाचून जीवितही शक्य नाही त्याचप्रमाणे प्रेमावाचून ज्ञान अथवा ज्ञानावाचून प्रेम हीही चिरकाल राहू शकणार नाहीत सत्–चित् आणि आनद याची समतोल अवस्था आपणास आज हवी आहे आणि आपले अखेरचे साध्यही तेच आहे. कोणत्याही एकाच बाजूने झालेली वाढ आपणास इष्ट नाही. बुद्धदेवासारख्या उदार अत करणाला श्री शकराचार्यांच्या विशाल बुद्धिमत्तेची जोड देणे अगदी शक्य आहे अशा प्रकारचा अभूतपूर्व आणि पावन योग घडून यावा याकरिता आपणापैकी प्रत्येक जण धडपड करीत राहील असा मला भरवसा आहे.

---

७

## ईश्वराचें सर्वव्यापित्व

आपण कितीही धडपड केली तरी आपल्या साऱ्या आयुष्यात अनेक दुष्ट गोष्टीचे काटे बोचण्याचा प्रसग आपणास कसा अवश्यमेव येतो याचा अनुभव आपणा सर्वांस आहेच आपल्या आयुष्याचा मोठा भाग अशाच प्रसगानी भरलेला असतो असल्या प्रकारच्या दुष्ट गोष्टीना आपल्या आयुष्यात कधीतरी अत येईल असे दिसत नाही कालाच्या आरभापासून त्याना नाहीशा करण्याकरिता आपण एकसारखे युद्ध सुरू ठेविले आहे, तथापि त्याची स्थिति जवळ जवळ पूर्वीसारखीच आजही आहे त्याना जिकण्यासाठी जो जो अधिक उपाय आपण शोधून काढावे तो तो नव्या नव्या दु खद गोष्टी आणखी उदयास येतात अशा स्थितीत या दु खातून मुक्त होण्याचा उपाय म्हणून परमेश्वराला भजा असे सारे धर्म सागतात,

हेही आपणास माहीत आहेच जगाबद्दल अधिक डोकेफोड करीत न बसता ते आहे तसेच घ्या, हा व्यवहारी लोकाचा उपदेश आपण मान्य केला तर दु खावाचून दुसरे काहीच या जगात आपणास मिळणार नाही असे सर्व धर्माचे म्हणणे आहे त्याचप्रमाणे या जगाच्या पलीकडे दुसरेही कसले तरी अस्तित्व आहे असेही सारे धर्म निश्चयाने सागतात केवळ आपल्या पचेंद्रियानी ज्याचा अनुभव आपणास होतो, त्यातच सर्व अस्तित्व आले असे नाही एकदर अस्तित्वाच्या अल्पाशाची जाणीव मात्र आपणास पचेंद्रियानी होते, आणि त्या अल्पाशाची जाणीव ही केवळ वर वर होते त्याच्या पलीकडे जे अनत अस्तित्व पसरले आहे त्यात या दु खद गोष्टीस थारा नाही. या अनत अस्तित्वाला कित्येक लोक परमेश्वर म्हणतात, दुसरे कित्येक अल्लाह म्हणतात, आणखी कित्येक जिहोवा, ज्योव्ह इत्यादि अनेक नावानीही त्याला सबोधितात, यालाच वेदाती ब्रह्म असे म्हणतात

निरनिराळ्या धर्मानी आपणास केलेल्या उपदेशाचा पहिला परिणाम असा होतो की हे जीवित आपणास नकोसे होते असल्या स्थितीत जगून तरी काय करावयाचे आहे असे आपणास वाटू लागते आपल्या जीवितात ज्या नाना प्रकारच्या दु खद गोष्टी घडून येतात, त्या नाहीशा करावयाच्या असतील तर काय करावे, या प्रश्नाला सरळ उत्तर म्हणजे तो जीवनक्रमच नाहीसा करावा हे होय असल्या उत्तरावरून मला एका जुन्या गोष्टीची आठवण झाली. एका वेळी एका गृहस्थाच्या डोक्यावर डास बसला होता त्याला मारण्याकरिता त्या गृहस्थाच्या एका स्नेह्याने त्या डासाला असा तडाखा दिला की, त्याने डासाबरोबर त्या गृहस्थाच्या मस्तकाचाही चुराडा झाला. दु खमुक्तीकरिता आता सागितलेला उपाय असल्याच प्रतीचा आहे जगात दुष्ट वस्तू भरल्या आहेत आणि दु खेही अनेक आहेत, ही गोष्ट कोणीही नाकबूल करीत नाही ही कथा इतकी जुनी आहे की, ती सर्वास ठाऊक असल्यामुळे तिच्या सिद्धीसाठी काही प्रमाणसुद्धा द्यावयास नको, पण दु खमुक्तीचा उपाय म्हणून जगातील धर्मानी काय योजना केली आहे ? हे जग केवळ क पदार्थ आहे आणि त्यापलीकडे जे काही आहे ती खरी सत्य वस्तू आहे आपली अडचण याच ठिकाणी उभी राहाते जग सोडून द्या हा धर्मानी सागितलेला उपाय करावयाचा म्हणजे आपल्या सर्वस्वाचा नाश

करणे होय. याला उपाय हे नाव तरी देता येईल की काय याचीच मला शका आहे अशा स्थितीत या अडचणीतून बाहेर पडावयास काहीच मार्ग नाही काय ? या प्रश्नावर वेदात उत्तर करतो की, सर्व धर्मांनी जे काय सागितले आहे ते बरोबर आहे, तथापि त्यातील रहस्य तुम्ही बरोबर गळी उतरवून घ्या याबद्दल पुष्कळ वेळा तुमच्या समजुतीत घोटाळा झालेला असतो धर्मांची वचने पुष्कळ वेळा अस्पष्ट असतात याकरिता त्याचा स्पष्टार्थ बरोबर समजणे अत्यत अवश्य आहे बुद्धि आणि अत करण या दोहोचाही एकत्र सयोग आपणास हवा आहे या दोहोतही अत करण अधिक महत्वाचे आहे या जीविताात जी काही अत स्फूर्ति आपणास मिळते तिचा उगम अत - करणापासून झालेला असतो 'तुला पूर्ण बुद्धि पाहिजे की अत करण पाहिजे ?' असा प्रश्न मला कोणी केला, तर मला अत करण पाहिजे असा जबाब मी तावडतोब देईन शभरवेळा हा प्रश्न मला कोणी विचारला तरी तितक्या वेळा तेच उत्तर मी नि शकपणे देईन ज्याला खरे अत करण प्राप्त झाले असेल त्याचे जीवित सुखाचे होऊन त्याची वाढही अव्याहत होत जाईल पण एखादा पुरुष अत्यत बुद्धिमान् असता अत करणशून्य असला तर तो कोऱ्याचा कोराच जगातून जाईल. त्याचे जीवित वाळवटा-सारखे रखरखीत होईल

याच वेळी आणखीही एक गोष्ट आपण लक्षात ठेविली पाहिजे की, अत - करणातील वृत्तीच्या प्रवाहाबरोबर वाहवत जाणाऱ्या मनुष्याला अनेक प्रकारच्या दुष्ट गोष्टीस वळी पडावे लागते खाड्यात पडण्याचे प्रसग त्याला वारवार प्राप्त होतात याकरिता उदार अत करण आणि विशालबुद्धि याचा सयोग असणे आपणास इष्ट आहे बुद्धीवाचून अत करण अथवा अत कर-णावाचून बुद्धि अशी स्थिति आपणास नको तर या दोहोंचेही विशालत्व आपणास एकत्र हवे आहे

या जगात आपणास काय हवे आहे याला काही सीमा बाधता येईल काय ? जग अनत आहे याकरिता तुमचे अत करण कितीही विशाल झाले अथवा तुमची बुद्धि कितीही विशाल झाली तरी त्या दोहोसही वावरण्यास येथे पुरेसा अवकाश आहे. या दोहोचा सयोग निर्बधपणे सचार करू लागला

तर त्याला येथें जागा नाही असें नाहीं. याकरिता या दोहोंना हातात हात घालून मोकळेपणी खुशाल सचरू द्या.

जगातील वस्तुस्थिति काय आहे याचा उमज बहुधा साऱ्या धर्मांस बरोबर पडलेला आहे; पण त्या साऱ्याची जी एकच चूक झालेली दिसते ती ही कीं, ते अत करणाबरोबर वाहवत गेलेले आहेत. त्याच्या उत्कट भावनाना धर्बंध राहिलेला दिसत नाहीं. ‘जगात दु ख आहे तर जगच सोडून द्या कसे’ हा त्यानी केलेला उपदेश खरा आहे आणि मोठ्या महत्वाचा आहे यात शका नाहीं. जग सोडून दिलें पाहिजे याबद्दल मतभेद होणे शक्य नाहीं सत्य स्थिति जाणावयाची असेल तर असत्याचा त्याग केला पाहिजे हे कोणी-ही कबूल करील. चागलें हवें असेल तर वाईट टाकून दिलें पाहिजे याबद्दल मतभेद असण्याचे कारण काय? जीवित हवे असेल तर मृत्युदायक गोष्टीं-पासून दूर राहिलें पाहिजे हेही अगदीं उघड आहे.

पण असें असताही पचेद्रियद्वारा नित्य अनुभवास येणाऱ्या जीविताचा त्याग करावयाचा म्हटलें तर आपणापाशीं काय उरेल? जीवित या शब्दाचा अर्थ आमच्या समजुतीने पचेद्रियद्वारा होणारा अनुभव हाच होय. आपल्या समजुतीप्रमाणे दिसणारे हें जीवित आपण टाकून दिलें तर आपल्याजवळ काय उरेल?

वेदातातील तत्त्वाचा पुढे आपण विचार करू त्यावेळीं या गोष्टींचा अधिक चागला खुलासा आपणास होईल. सध्या मी इतकेच सागून ठेवतों कीं, या कोड्याचे विवेचकबुद्धीला पटणारें उत्तर एकट्या वेदातानेच दिलेलें आहे. वेदाताच्या एकदर मताचा रोख काय आहे व जगाचे स्वरूप त्याने काय सागितलें आहे एवढयाचेंच विवेचन आजच्या प्रसगीं मला करावयाचें आहे.

वास्तविक पाहाता जगावर बोटे मोडण्याचे काम वेदातानें केलेलें नाहीं. सन्यास हेंच सर्वांचें अखेरचें साध्य आहे हें मत वेदातानें जितके विशद केलें आहे तितके ते दुसऱ्या कोणत्याही धर्मानें केलेलें नाहीं. तथापि त्यानें आत्महननाचा मार्ग सागितलेला नाहीं हें मात्र अवश्य लक्ष्यात बाळगलें पाहिजे. जग ईश्वरस्वरूप आहे हा वेदातमताचा खरा इत्यर्थ होय. आप-णाला जग जसें दिसते अथवा आपणाला जसें भासतें तसें वास्तविक तें

नसल्यामुळे त्याचा त्याग करून त्याचे खरें स्वरूप ओळखा हा वेदांताच्या उपदेशाचा इत्यर्थ होय परमेश्वर आणि जग यात कांहीं भेद नाही. याकरितां त्याचे खरें जें परमेश्वरस्वरूप आहे तें ओळखा असें वेदाताचे सागणे आहे. "या विश्वात जें काही अस्तित्व आहे त्याजवर परमेश्वराची गवसणी आहे" अशा अर्थाची एक अत्यत प्राचीन श्रुति आहे.

विश्वातील प्रत्येक वस्तूभोंवतीं प्रत्यक्ष परमेश्वराचे आवरण आहे ही गोष्ट आपणास जाणावयाची आहे. तथापि असे करताना त्यात दभ अथवा खोटा उत्साह असता उपयोगी नाही जगांत जें दुष्टत्व भरले आहे त्याजबद्दल नुसती डोळेझाक करण्यातही फायदा नाही, तर प्रत्येक वस्तूत परमेश्वर ओतप्रोत भरला आहे असा प्रत्यक्ष अनुभव आपणास आला पाहिजे जगाचा त्याग करावयाचा तो अशा रीतीने केला पाहिजे, आणि असा त्याग केला म्हणजे जे काही शिल्लक उरेल ते परमेश्वरस्वरूप होय बायकापोरे सोडण्याचे कारण तुम्हास नाही. त्याचा त्याग करून तुम्ही पळून जाऊ नका. तर परमेश्वराचे अस्तित्व त्याच्याही ठिकाणी आहे हें तुम्ही जाणून घ्या. ससाराचा त्याग करा असें धर्म तुम्हाला सागतो तेव्हा मुलालेकराना घराबाहेर हाकून द्या असा या उपदेशाचा अर्थ घ्यावयाचा नाही. असा आततायीपणा करणारे लोक प्रत्येक देशात आहेत, पण असे कृत्य म्हणजे धर्म नसून ते राक्षसी कृत्य होय मुलाच्या ठिकाणीही परमेश्वराचा वास पाहाणें हाच खरा धर्म प्रत्येक वस्तूसबधेंही असेंच समजावयाचे. जीवितात आणि मृत्यूत व सुखात आणि दु खात परमेश्वराचा सारखाच वास आहे. सर्व जग त्यानेच अतर्बाह्य भरलेलें आहे. तुम्हीं आपली दृष्टि उघडली तर तो तुम्हास खचित दिसेल वेदाताचें सागणे अशा प्रकारचे आहे. तुम्ही आपल्या कल्पनेने जें जग निर्माण केले आहे त्या जगाचा त्याग करा. तुमची कल्पना अर्धवट अनुभवावर रचिली असल्यामुळें ती चुकीची आहे. तुमची विवेचकबुद्धिही अत्यत अस्पष्ट आहे. याशिवाय तुमच्या आंगीं उपजत मनोदौर्बल्य आहे ते वेगळेंच. अशा प्रकारच्या अर्धवट तयारीवर जगाबद्दल अर्धवट कल्पना तुम्ही उभारता, तेव्हा त्या अर्थातच चुकीच्या असतात. याकरिता त्या जगाचा त्याग करा. ज्या जगाबद्दल इतका दीर्घकाल आपण विचार करीत आहों आणि इतका दीर्घकाळ ज्याला आपण चिकटून बसलेले

आहो ते जग आपल्याच कल्पनेचें साम्राज्य आहे अर्थातच ते खोटे आहे. याकरिता त्याचा त्याग करा. डोळे उघडून खरें जग तुम्ही पाहिले म्हणजे तुमच्या काल्पनिक जगाला वास्तविक अस्तित्वच नव्हतें असें तुमच्या प्रत्ययास येईल. तुमचे काल्पनिक जग निव्वळ स्वप्नमय–मायामय–होते असें तुम्हांस कळून येईल. ज्याला अस्तित्व म्हणून होते तो स्वत परमेश्वरच असा अनुभव तुम्हांला येईल. मुलालेंकरात आणि स्त्रीपुरुषात त्याचीच व्याप्ति आहे. चागल्यात आणि वाईटात तोच आहे. पापात आणि पापी मनुष्यातही त्याचाच वास आहे. जीवितात आणि मृत्यूत तोच भरून राहिला आहे.

अद्वैतसिद्धांताची अशा प्रकारची दर्पोक्ति ऐकून एखाद्याची छाती खरोखरच दडपून जाईल, तथापि हेच मत सिद्ध करून लोकास ते सागण्याची आणि शिकविण्याची वेदाताची इच्छा आहे. येथूनच वेदातमताला आरभ होतो

अशा रीतीने जगातील दु खाची आणि दुष्ट गोष्टीची वाट आपण लावू शकतों कसलीही इच्छा धरू नका आपल्या दु खाचें मूळ कारण काय ? आपल्या साऱ्या दु.खाचे मूळ एकच आहे, ते मूळ इच्छा हे होय कांहीं तरी असावे अशी इच्छा आपणास होते. काहीं कर्मभोगानें त्या इच्छेची तृप्ति होत नाही आणि याचा परिणाम दु ख हाच. ज्या ठिकाणीं कसली इच्छाच नाही तेथे दु खाचेहि कारण नाही. या ठिकाणी या विवेचनाबद्दल थोडासा गैरसमज होण्याचा संभव आहे. याकरिता इच्छा-त्याग म्हणजे काय ? आणि दु खनिर्मूलन म्हणजे काय ? याचे स्पष्टीकरण करणें अवश्य आहे. आपल्या समोरच्या या भिंतीला कधीं इच्छा झाली नाहीं आणि कधी दु खही तिने भोगले नाहीं. अगदी खरे; पण ती जागच्याजागींच आहे आणि तिच्यात वाढ झालेली नाहीं ही गोष्टही लक्ष्यात ठेविली पाहिजे. या खुर्चीला इच्छा आणि दु ख हीं दोन्ही नाहींत पण अनतकाल ती खुर्चीच राहणार. सुखदु.खांच्या उपभोगांतही तेच आहे. फार काय पण मी असेंही म्हणेन कीं दु ख ही फार उपयुक्त वस्तु आहे. आपण जो कांहीं मोठा धडा शिकतों तो दु खामुळेंच शिकतों. आपल्या हातून अनेक चुकीच्या गोष्टी घडतात. आपल्या हातून त्या घडल्या तर बरें होते असेंहि आपणास

पुष्कळ वेळा वाटते, पण याच चुकानीं आपणास ज्ञान दिलेलें असते हें विसरता उपयोगी नाहीं. या आपल्या चुका आपणास गुरूच्या जागीं झालेल्या असतात. मीं थोड्याशा चागल्या गोष्टी केल्या आणि पुष्कळशा वाईट केल्या याचा मला खरोखरच आनद होतो. एखादी गोष्ट बरोबर रीतीने पार पाडल्याबद्दल मला जसा आनद होतो तसाच आनद माझ्या चुकापासूनही मला होतो, कारण माझ्या प्रत्येक चुकीनें मला एक एक मोठा धडा शिकविला आहे. चालू क्षणी ज्या काहीं स्वरूपाने मी आपणासमोर उभा आहें ते रूप म्हणजे माझ्या हातून घडलेल्या सर्व कर्मांचा आणि माझ्या सर्व विचाराचा परिपाक होय. प्रत्येक कृत्य आणि प्रत्येक विचार याचा परिणाम मजवर घडलेला आहे आणि या सर्वांचे जे समवायी रूप तेच माझ्या उन्नतीचें स्वरूप होय. इच्छा असणें चुकीचे आहे ही गोष्ट आपणा सर्वांस समजते; पण इच्छा-त्याग म्हणजे काय? सगळ्या इच्छा आपण सोडून दिल्या तर आपले हें जीवित चालावे कसे? असे करणें म्हणजे आत्महत्याच होय. इच्छा माराव्या आणि त्याबरोबर मनुष्यानींही मरावे अशाच किमतीचा हा हिशोब झाला. याचे स्पष्टीकरण असे·—तुम्ही आपली वतनवाडी सोडून द्या असें आमचें म्हणणें नाही. जीविताला आवश्यक असणाऱ्या वस्तु टाकून द्या असेंही आमचे तुम्हास सागणें नाहीं. फार काय पण वाटल्यास चैनीच्या वस्तूही खुशाल बाळगा. जें तुम्हाला हवे असेल ते खुशाल जवळ बाळगा पण मुद्दा इतकाच कीं त्याचें खरे स्वरूप काय आहे, हे जाणून त्याचा अनुभव घ्या. जगातल्या सपत्तीवर अमक्या एकाचाच हक्क आहे असे नाहीं. ही वतनवाडी माझी आहे, ही माझ्या ताब्यांत आहे, हिचा मालक मी आहें असल्या कल्पना जवळ बाळगू नका. तुम्ही, आम्ही आणि बाकीचे सारे लोक वास्तविक क.पदार्थ आहेत तुमची आमची खरी किंमत काय आहे? जगात जें काहीं आहे त्याचा खरा मालक एकटा परमेश्वरच आहे; कारण प्रत्येक वस्तूभोंवतीं त्याचें आवरण पडलेलें आहे, हें श्रुतिवचन मी नुकतेज सागितलें आहे. ज्या सपत्तीचा उपभोग तुम्ही घेतां तींत परमेश्वर आहे; तुमच्या मनात उद्भवणाऱ्या इच्छेत त्याचा वास आहे; आपल्या इच्छातृप्तीकरितां ज्या वस्तू तुम्ही विकत घेतां त्यातही परमेश्वर आहे. तुमच्या सुदर कपड्यांत आणि उची दागदागिन्यातही तो आहे. पूर्वीच्या विचारसरणीचा खरा

अर्थ हा आहे आपल्या प्रत्येक कृतींत, प्रत्येक संभाषणांत आणि आपल्या देहांतही परमेश्वराचा वास आहे हें सत्य तुम्ही जाणलें तर आजचा सर्व देखावा पार बदलून जाईल आणि सांप्रतच्या दुःखमय आणि कष्टमय जगाच्याऐवजीं स्वर्ग तुम्हास दिसू लागेल.

"स्वर्गाचें राज्य तुमच्यातच आहे" असे येशू ख्रिस्त म्हणतो. वेदांताचें म्हणणेंही हेंच असून सर्व अवतारी पुरुषही हेंच सांगतात; पण ही गोष्ट ज्याला डोळे असतील त्याला दिसेल आणि ज्याला कान असतील त्याला ऐकू येईल. ज्या सत्याच्या शोधार्थ आपण अनंतकाल भटकत आहों तें आपणांपाशीच आहे आणि निरंतर ते आपणापाशीं होते. ते हरवले आहे असा भ्रम अज्ञानामुळें आपणास झाला. आणि या भ्रमात रडत ओरडत आपण साऱ्या जगभर त्याला धुंडाळीत हिंडत आहों; पण ते सत्य आपल्याच अंतःकरणात राहिलेले आहे आणि तेथेच त्याचा शोध आपणास लागेल हे आपण विसरलो आहो.

जग सोडून द्या, या वचनाचा जुना गांवढळ अर्थ आपण लक्षात घेतला तर काय स्थिति होते पहा. हात जोडून स्वस्थ बसावे, कोणतेही काम करू नये, निव्वळ दगडासारखें निश्चळ राहावे, आणि विचार सुद्धां करू नये, असा याचा अर्थ होतो. शुद्ध नशीबावर हवाला ठेवून जगाचा ओघ नेईल तिकडे जावे, सृष्टि वागवील तसें वागावे आणि या जाग्याहून निघून त्या खडकावर आदळावे अशी आपली स्थिति होईल. पण या वचनाचा हा अर्थच नव्हे. सर्व प्रकारचे कर्म आपणांस केलेच पाहिजे; पण कर्म म्हणजे काय हे प्रथम उमजून मग ते केलें पाहिजे. केवळ इंद्रियवश होऊन जीं मनुष्यें इंद्रियतृप्तीसाठीं कर्में करितात त्याना कर्मांचे रहस्य कधीही समजत नाहीं. ज्याला कोणत्याही प्रकारचा स्वार्थ राहिलेला नाही आणि जो इंद्रियवश नाहीं तोच कर्मरहस्य जाणतो, तोच खरे कर्म करतो. कोणताही विशिष्ट हेतू मनांत न धरतां जो कर्म करतो तोच खरा कर्ता होय. अमुक एक प्रकारचा लाभ मिळावा अशी कोणतीहि इच्छा ज्याला राहिलेली नाहीं तोच खरें कर्म करतो.

एखादें सुंदर चित्र असतें, पण त्याचा खरा भोक्ता कोण असतो तें चित्र विकणारा कीं पाहणारा? विकणाराकडे पाहावें तर तो आकड्याच्या बेरजा

करण्यांत चूर झालेला दिसतो. या चित्राला पैसे पडले किती आणि त्याच्या विक्रीपासून फायदा होणार किती या हिशेबात त्याचे लक्ष गुतलेलें असते. त्याच्या मेदूत नफ्याशिवाय दुसरा कोणताच विषय नसतो. त्याचें लक्ष कोणते गिऱ्हाईक सर्वांत अधिक किमत देते याकडे असतें. किंमत जो जो अधिक चढत जाते तो तों त्याचा आनद वाढत जातो; पण जो मनुष्य खरेदीच्या अथवा विक्रीच्या कोणत्याही उद्देशानें तेथे गेलेला नसतो तोच त्याच्या सौंदर्याचा खरा भोक्ता असतो. तो त्या चित्राकडे पाहातो आणि त्याच्या सौंदर्याने आनदित होतो हे सारें विश्व त्या चित्रासारखे आहे आपल्या साऱ्या इच्छा नष्ट झाल्या म्हणजे जगाचा खरा उयभोग आपणास घडेल; आणि त्यावेळीं या खरेदी विक्रीच्या आणि मालकी हक्काच्या कल्पना विराम पावतील सावकार आणि कूळ या भाषा जातील. खरेदी करणारा नाहींसा होईल आणि विक्री करणाराहि त्याबरोबर जाईल. असे झाले तरी जगद्रूपी तें सुदर चित्र जागच्या जागींच राहील. "तो एक महाकवी असून फार प्राचीन आहे हे सारें विश्वकाव्य त्यानें रचिलें आहे" असें ईश्वराचे वर्णन एका ठिकाणीं मी वाचलें. याहून अधिक सुदर अशी दुसरी ईश्वर-विषयक कल्पना माझ्या वाचण्यात कोठेही आलेली नाही आपल्या सर्व आशा नष्ट झाल्या म्हणजेच हे काव्य वाचून त्यातील रस चाखण्याची पात्रता आपणास येईल. मग ईश्वराचें सर्वव्यापित्व आपल्या प्रत्ययास येईल जगा-तले कोनेकोंपरे आणि अधारी गल्ल्या—ज्या पूर्वी आपणास भीतिप्रद आणि पापकर्दममय अशा दिसत होत्या त्याही ईश्वररूप दिसू लागतील त्याचे वास्तविक रूप आपणासमोर उघडें होईल. आणि मग आपले आपणासच नवल वाटेल कीं आपण उगीच रडत होतों. सारा वेळा आपण केवळ साक्षी सारखे बाजूस उभे होतों असे आपल्या प्रत्ययास येईल.

'नित्य कर्म करीत रहा' असा वेदांताचा उपदेश तुम्हांस आहे; पण कर्म करतांना जगाचें जें मायावी रूप आहे ते सोडून द्या, असें वेदात सागतो. परमेश्वराचा वास सर्वांभूतीं आहे हें समजून घ्या, आणि अशा रीतीनें कर्म करा. शंभर वर्षे वाचावें अशी इच्छाही हवी तर बाळगा, तुमची इच्छा असेल तर जगातल्या साऱ्या वस्तू जमा करा, पण त्यातही परमेश्वराचा वास आहे हे तत्त्व ध्यानात धरा. तम्हाला नरकरूपी भासणारी जागाही वास्त-

विक स्वर्गभुवन आहे हें कोणत्याही क्षणी विसरू नका. या जगावर पुष्कळ वर्षे आपण वाचलो तर परक्यास मदत करावी आणि सदोदित आनंद द्यावा व घ्यावा याकरितांच वाचू अशी इच्छा धरा. अशा हेतूने तुम्ही कर्मे करीत गेला म्हणजे या मायाजालातून बाहेर पडण्याचा मार्ग तुम्हास सापडेल. यावाचून दुसरा एकहि मार्ग आपणास उपलब्ध नाही. जगाचे सत्य स्वरूप न जाणता त्यातील चैनीच्या विषयाच्या डोहात जो बिनदिक्कत उडी घेतो त्याचा डाव फसला आहे हें पक्के लक्ष्यात ठेवा अखेरचे साध्य त्याला सापडणार नाही त्याचप्रमाणे जगाला शिव्याशाप देऊन आणि त्यावर त्रागा करून जो मनुष्य अरण्यात जाऊन बसतो, आपल्या शरीराला अनन्वित त्रास देतो आणि अशा रीतीने त्याला जो हळूहळू मरणाकडे ढकलतो त्याचे अतःकरण वालुकामय अरण्यासारखे रखरखीत होऊन अखेरीस त्याचाही डाव फसतो. हे दोन्हीही मार्ग आततायीपणाचे आहेत मध्य रेषेची ही दोन्ही टोके चुकीचीं आहेत. या दोन टोकानी जे जे गेले त्याचा मार्ग चुकून अखेर त्याची फसगतच झालेली आहे.

याकरिता प्रत्येक वस्तूत परमेश्वर आहे हें प्रथम जाणून नतर कर्म करा, असा वेदाताचा उपदेश आहे. आपले सारे आयुष्य हेही परमेश्वराचेच एक प्रकारचे रूप आहे हे जाणून नित्य कर्मरत रहा. आपल्या हाती कर्म करणे एवढेच आहे आणि यावाचून दुसरी कोणतीही अपेक्षा आपणास नाहीं हे जाणून कर्म करा. परमेश्वराचा वास वस्तुमात्रात असता त्यास शोधण्यासाठीं दुसऱ्या कोठे जाणार ? तो पूर्वीच तेथे हजर आहे. आपल्या प्रत्येक कर्मांत, विचारात आणि भावनेत त्याचा वास आहे, हे जाणून कर्म केल्यास तेच आपणास मुक्तिदायक होईल त्यावांचून अन्य उपाय नाहीं. अशा रीतीनें जे कर्म आपण करू त्याचे परिणाम आपणास बाधक होणार नाहींत. आपणावर जी जी आपत्ति कोसळते तिच्या तिच्या मुळाशीं खोट्या इच्छा हेंच कारण असते; पण सर्वत्र परमेश्वराचा वास आहे हें तत्त्व आपण जाणले तर त्या इच्छांतही परमेश्वर सापडून त्या पवित्र होतील आणि त्यांपासून आपणास कोणतेही दु:ख प्राप्त होणार नाही हें रहस्य ज्याच्या ध्यानीं आलेले नाही त्याना हें जग असेच भेसुर भासत राहाणार. आपल्या आजूबाजूला मगलमय वस्तूची केवढी मोठी खाण आहे हे पुष्कळास ठाऊक नाही. हा शोध त्याना

अजून लागलेलाच नाही जगाचे भेसुर स्वरूप कोणते ? 'अज्ञान' असें उत्तर वेदात देतो.

सर्वांत अत्यत मोठ्या अशा नदीच्या काठीं बसलो असता आपण तहानेनें मरत आहो, अन्नाची रास जवळ पडली असता क्षुधेनें आपले प्राण जाऊ पहात आहेत. आनदमय विश्व आपणासन्निध असतां आपणास ते सापडत नाहीं आपला वास सर्वकाळ त्यातच असता त्याचे स्वरूप आपणास समजत नाहीं. ही आपली चूक सुधारावी यासाठींच धर्माचा अवतार आहे. आनदमय विश्वांत सदोदित वास करावा ही इच्छा साऱ्याच्या हृदयांत आहे जगांतील सारीं राष्ट्रें याच शोधात आहेत धर्माचा अतिम हेतू हाच आहे आणि निरनिराळया धर्मांनीं निरनिराळया भाषेनें याच साध्याचें स्पष्टीकरण केलें आहे. निरनिराळ्या धर्मांत विसगतता दिसते याचे कारण केवळ भाषा हेंच होय. एक धर्म एका रीतीने बोलत असता तीच गोष्ट दुसरा धर्म थोड्या निराळया रीतीनें सागतो दोघास सांगावयाची वस्तु एकच असता भाषा मात्र वेगळी झालेली असते

या सबधीं आणखीही अनेक प्रश्न येथें उद्भवतात. बोलणें हें नेहमीच फार सोपें असते. सर्वत्र ईश्वराचा वास पहावा म्हणजे जगातील सर्व सौख्याचा लाभ होईल हे शब्द माझ्या लहानपणापासून माझ्या कर्णसपुटावर आदळत असत, पण जगाच्या कोलाहलात मिसळून त्यातले एक दोन रट्टे माझ्या पाठीवर बसले कीं ही कल्पना पार नाहींशी होते रस्त्याने मी चालत असतो आणि परमेश्वराचा वास सर्वत्र आहे या कल्पनेंत चूर झालेला असतों. इतक्यात एखादा धटिंगण येऊन मला असा धक्का देतो कीं भर रस्त्यांत मी साष्टाग नमस्कार घालतों मी ताबडतोब उठून उभा राहातो आणि आपल्या मुठी वळू लागतों माझ्या अगातलें रक्त सळसळून माझ्या डोक्यात शिरतें आणि माझा विचार त्यात वितळून नाहींसा होतो मी सारें काहीं विसरून जातों. मी जणूकाय वेडा होतों आणि सर्वत्र परमेश्वर पाहाण्याऐवजीं सर्वत्र मला सैतान दिसू लागतो सर्वत्र परमेश्वर आहे ही गोष्ट आपल्या बाल्यापासून आपणास लोक शिकवीत असतात सारे धर्म या तत्त्वाचा उच्चार मुक्तकठाने करीत असतात. नव्या करारात ख्रिस्ताने हेच सागितलें आहे. या गोष्टी लहानपणापासून आपणास ठाऊक असतात; पण हे मनोमय वाता-

वरण सोडून आपण व्यवहारात उतरलो कीं आपल्या अडचणीस सुरवात होते एके वेळी एक सुदर साबर तळयात पडलेल्या आपल्या पडच्छायेकडे पाहात होता स्वत चे रूप पाहता पाहता तो आपल्या बच्चाला म्हणाला, " पहा, मी कसा सामर्थ्यवान् आहे, माझें मस्तक किती डौलदार आहे; माझे सारे अवयव कसे पिळदार आणि मासल आहेत पहा. मी धावतों तरी किती त्वरेनें ! " इतक्यात दूर अतरावरून कुत्र्याचे भुकणे त्याच्या कानी पडले ते ऐकताच तो एकदम धावत सुटला आणि मग बऱ्याच वेळाने परत आला. तेव्हा त्याचें पाडस त्याला म्हणालें, " बाबा, तुम्ही आपल्या शक्तीचे एवढे वर्णन माझ्या जवळ केलें, पण कुत्र्याचा शब्द ऐकताच तुम्ही पळत सुटला हें कसें ? " पाडसाचा ह्या प्रश्न ऐकून साबर म्हणाला, " बाळा ते सारें खरे, पण कुत्र्याचा शब्द ऐकताच माझे हृदय ठाव सोडते त्याला काय करावे ? " आपणा साऱ्याची गोष्ट अशीच आहे आपण शूर आहो, कृतार्थ आहो असे आपणास वाटत असते, मनुष्यजातीबद्दल उच्च कल्पना आपल्या मनात असतात, बादशाही बेत आपल्या चित्तात आपण करीत असतो, पण ससारांतल्या मोहाचीं आणि टक्क्याटोणप्याचीं कुत्रीं भुकू लागली की त्या साबराप्रमाणें आपण दशदिशा पळत सुटतो. असे आहे तर या साऱ्या धार्मिक शिक्षणाचा उपयोग तरी काय ? याचाही उपयोग आहे, याचा फारच मोठा उपयोग आहे. तो हाच की, अभ्यासाच्या बळाने आपण शेवटी विजय मिळवू. एका दिवसात साऱ्या गोष्टी घडतात असें नाही. एकादी गोष्ट आज साध्य न झाली तरी अभ्यासाने आणि निश्चयाने कालेंकरून ती खचित साध्य होईल.

" प्रथम ऐकून घ्या, मग त्यावर विचार करा आणि नतर त्याचेच ध्यान करा " अशी श्रुति आहे. आकाश आपणा सर्वांना दिसते जमिनीशीं सरपटणाऱ्या किड्यालासुद्धा ते दिसते, तथापि त्याचे अतर केवढे मोठे आहे ? आपणापासून ते कितीतरी दूर आहे. आपलें अखेरचे साध्यहि असेंच दूर आहे; पण तेथपर्यंत आपणाला पोहोंचलेच पाहिजे हे आपणास ठाऊक आहे. आपलें साध्य लाब आहे पण तसेंच तें उच्चतमही आहे. तें उच्चतम साध्य आपणास सिद्ध करावयाचे आहे. या जगात बहुतेक लोकास या साध्याची कल्पनाही नसते आणि अधारांत चाचपडल्याप्रमाणें ते इत-

स्तत. भटकत असतात, ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे बरें ? आपलें साध्य काय आहे हे ज्याच्या लक्षात आलेले आहे त्यानें हजार चुका केल्या तर ज्याला ते ठाऊक नाहीं असा मनुष्य खास पन्नास हजार चुका करील. याकरिता ध्येय म्हणून प्रत्येकाला पाहिजेच या ध्येयाबद्दल जितक्या गोष्टी ऐकता येतील तितक्या ऐकाव्या, म्हणजे अखेरीस त्या आपल्या हृदयापर्यंत पोचतील; आपला मेंदू त्यानीं भरून जाईल; आपल्या शिराशिरातून त्याचा प्रवेश होईल आणि रक्ताच्या प्रत्येक थेबात आणि प्रत्येक रोमरध्रात त्या खेळू लागतील आपल्या देहात अशा रीतीने त्या सर्वत्र दुमदुमू लागल्या म्हणजे त्याचेच ध्यान आपणास लागेल. हृदय भरून तुडुब झाले म्हणजे शब्दरूपाने मुखावाटे ते पाझरू लागते आणि हाताच्या द्वारे ते कर्म करू लागते.

आपणास कोणत्याही कार्यास उद्युक्त करणारी जबर शक्ति म्हटली तर ती विचार ही होय. याकरिता अत्यत उच्च विचारानी आपले मन भरपूर भरून सोडा. हे विचार दररोज आणि दरक्षणी कानावर पडू द्या. महिनेच्या महिने ते चित्तात घोळत राहू द्या. आपल्या कृतीत ते न उतरले अथवा आपल्या हातून चुका झाल्या तरी त्याबद्दल यत्किंचितही क्षिति बाळगू नका चुका घडणें हे अगदी स्वाभाविक आहे. फार काय, पण आपल्या जीविताचे ते भूषणच आहे चुका न घडल्या तर त्या जिविताची किमत तरी काय ? रात्रदिवस युद्धाचे प्रसग असणे हेच आपणास साजेसे आहे. असे युद्ध प्रसग आणि विजयोत्साह ज्या जीवनात नसतील ते जीवन मी कवडीमोल समजतों असले जीवनच मला नको. असे युद्धाचे प्रसग नसतील तर जिवितात काव्यही उरणार नाही याकरिता युद्धप्रसगाना भिऊ नका आणि अपजयाची खत बाळगू नका. एखादा बैल साऱ्या जन्मात चुकूनसुद्धां खोटे बोलत नाहीं म्हणून तो मनुष्यापेक्षा श्रेष्ठ झाला काय? खोटे बोलणारा झाला तरी मनुष्य तो मनुष्य, आणि बैल तो बैल याकरिता अपजय झाले अथवा पिछेहाट झाली तरी अशा गोष्टीकडे लक्ष्य देण्याचे कारणच आपणास नाही. काही झालें तरी आपल्या ध्येयाला चिकटून रहा. हजार वेळां पराभव झाला तरी फिरून यत्न करा. '**ऐसे सुख कधीं लाहता होईन । देखे अवघे जन ब्रह्मरूप ।**' असे सदोदित म्हणत रहा. परमेश्वराचे अस्तित्व

सर्वत्र दिसू लागणें ही गोष्ट अत्यंत दु साध्य आहे ते आज सर्वत्र दिसत नसलें तरी निदान आपल्या आवडीच्या एखाद्या वस्तूत तरी ते प्रथम पाहा. तेथे तुमचे चित्त स्थिरावलें म्हणजे तेच ब्रह्मरूप दुसरीकडे पाहू लागा. या अभ्यासाने तुमच्या दृष्टिपथाची कक्षा दिवसेदिवस विस्तृत होत जाईल. अनंत जीवित आपणा समोर पडले आहे; मग एखादी गोष्ट आजच साध्य न झाली तर त्याबद्दल दु.ख करण्याचें काय कारण आहे? अखेरीस आपण खास विजय मिळवू.

'**ऐकमेवाद्वितीयम्**' हे वेदांताचे दुसरें एक महावाक्य आहे जें मनापेक्षाही अधिक तरल आहे, ज्याची गती मनाहून अधिक आहे, जेथे देवदेवताही पोहोंचू शकत नाहीत, जेथे विचारालाही अवकाश नाही, ज्याच्या गतीमुळे विश्वातील सर्व गती दृश्यमान् होतात त्या एकातच हे सर्व अस्तित्व आहे ते एकच चलन पावत असताही ते अचल आहे. ते जवळात जवळ आणि दूरात दूर आहे ते प्रत्येक वस्तूच्या अंतर्यामी आहे आणि प्रत्येक वस्तूच्या बाह्यभागीही तेच आहे प्रत्येक वस्तूच्या अंशाअंशात ते भरलेले आहे **सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः** ( गीता अ. ६ श्लो. २९ ) ज्याला त्या आत्म्याच्या ठिकाणी सर्व भूते दिसतात आणि सर्व भूताच्या ठिकाणी तो आत्मा दिसतो त्याला आत्म्याचे सान्निध्य सदोदित असते त्या आत्मरूपापासून तो कधीही लांब जात नाही या आत्म्याच्या ठिकाणीच सर्व जीवन आणि सर्व विश्व ज्या वेळी आपणास दिसू लागेल त्यावेळीच सारे रहस्य आपल्या हाती येईल आणि हे रहस्य प्राप्त झाल्यानंतर मायेचा भ्रम नाहीसा होईल. विश्वात सर्व एकरूपच आहे असा अनुभव ज्याला आला असेल त्याच्या ठिकाणीं दु ख कोठून उत्पन्न होईल?

सर्व विश्वात पूर्ण एकरूपता आहे असा वेदांताचा सिद्धांत आहे. आपणास विश्वात अनेकता भासते हेंच आपलें अज्ञान असून याच अज्ञानामुळें दु - खाची प्राप्ती कशी होते हे वेदांतानें दाखविले असल्यामुळे त्याचा विचार आपण यथावकाश करू. प्रत्येक मनुष्य दुसऱ्यापासून विभक्त, एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रापासून विभक्त; पृथ्वीपासून चंद्र विभक्त अशी आपली सध्याची दृष्टि आहे. या विभक्तपणाच्या कल्पनेपासूनच दुःखाची उत्पत्ति होते, पण हा

विभक्तपणा खरा नसून तो केवळ आभासरूप आहे असे वेदांताचे म्हणणें आहे. केवळ वरवर पाहाणारासच हा भेद दिसतो. पण ज्याची दृष्टि वस्तूच्या अतर्यामी पोहोचू शकेल त्याला सर्व वस्तूचे एकरूप दिसेल हे वरवरचे बाह्यरूप सोडून वस्तूच्या अतर्भागात तुम्ही प्रवेश केला तर माणसामाणसात, निरनिराळ्या मानववशात, गरीब श्रीमतात, लहान थोरात आणि पशूत व मनुष्यात वास्तविक एकरूपता आहे असे तुम्हास आढळून येईल. एकाचींच हीं अनेक रूपे झालेलीं आहेत असे तुम्हास दिसेल. त्याला अशा प्रकारच्या एकरूपतेचा अनुभव येईल, त्याला मायाभ्रम पुन्हा पछाडणार नाहीं; त्याला भ्रम कशाचा होणार ? प्रत्येक वस्तूचें खरे स्वरूप काय आहे हें तो जाणत असतो प्रत्येक वस्तूचें रहस्य त्याच्या हस्तगत झालेलें असते अशा स्थितींत त्याला दु ख तरी कशापासून होणार ? त्याला इच्छा कशाची असणार ? प्रत्येक वस्तूचा धागा त्याने परमेश्वरापर्यंत पोचविलेला असतो. तो थेट मध्यबिंदूपर्यंत जाऊन भिडलेला असतो. सर्व वस्तू सच्चिदानदरूप आहेत हें तो अनुभवाने पाहत असतो. अशा स्थितींत जन्म मृत्यू, रोग आणि दु खें तेथे कशी प्रवेश करणार ? त्याला गरज तरी कशाची असणार ? आणि गरज नसली तर असतोष तरी कसा उत्पन्न होणार ? सर्वत्र सच्चिदानदरूपच आहे हा अनुभव आल्यानतर मायेच्या दृश्याभासाने तो पुन्हा फसत नाही. सर्व वस्तूत आणि सर्व स्थितीत जर सच्चिदानद रूपच आहे तर त्याने शोक तरी कोणासाठी का करावा ? मृत्यु आणि दु:ख हेही भ्रमच आहेत. त्याना वास्तविक अस्तित्व नाही. सर्वत्र एकरूपता असल्यामुळे तेथे ‘दुसरे’ हा शब्दच जन्म पावत नाही. मग अमक्यासाठी दु ख ही भाषा तरी कशी संभवेल ? ज्यासाठी दु ख करावे अशा दुसरेपणाला तेथे अस्तित्व नाही, हा अनुभव ज्याला आला असेल त्याचा प्रवेश प्रत्येक वस्तूच्या अतर्यामी झालेला असतो. तेथे शुद्ध निरामय, निराकार, निष्कलक, सर्वज्ञ असें एकच रूप शिल्लक असतें. सर्व ज्ञान आणि सर्व काव्य यांचा वास तेथेच असतो. प्रत्येकाला त्याच्या कृतीप्रमाणें फळ येथून वाटलें जाते या जड जगाच्या मागें जे हात धुवून लागतात ते अधारात चाचपडत असतात. हें जग अज्ञानाचें कार्य आहे या जगाच्या मागे लागणें म्हणजे अज्ञासाच्या मागें लागणें होय. याचे हें दृश्य रूप खरें आहे असें जे समजतात ते अधारात चाचपडत

असतात. या जगात आपलें सारें आयुष्य घालवूनही ज्याना कसल्याच उच्चतम वस्तूची कल्पनासुद्धा होत नाही ते निबिड अधारात पडलेले आहेत असे समजावें; पण प्रकृतीचे रहस्य ज्याच्या हाती आलें असेल, जें प्रकृतीच्या मर्यादेच्या पलीकडे आहे त्याचे दर्शन ज्याला घडलें असेल तो या भवनदीच्या पैलतीरास पोचतो आणि सदा सच्चिदानदरूप होऊन बसतो. " हे सूर्या, आपल्या सुवर्ण गोलाने तू सत्य झाकून टाकलें आहेस. हा पडदा तू दूर कर म्हणजे त्याच्या पाठीमागे असलेलें तुझे सत्यरूप मला दिसेल. तुझ्या अतर्यामीं असलेलें रूप मी जाणलें आहे तुझ्या दीप्तिमय किरणाचा खरा अर्थ मी जाणून चुकलो आहे आणि तुझ्या ठिकाणीं कोण प्रकाशते हेही मी पाहिलें आहे. तुझ्यातील सत्य मी पाहिलें असून तेच सत्य माझ्या ठिकाणीही आहे. मी तेच सत्य आहें. "

---

## ८

## अनुभव.



उपनिषद् ग्रथातील फार सोप्यापैकी एका उपनिषदातील काही भाग मी तुम्हास वाचून दाखविणार आहे. याला कठोपनिषद् असे म्हणतात. हें उपनिषद् फार सोपें पण अगदी काव्यमय आहे. मृत्यूचें रहस्य या नावाने सर एड्विन् आर्नोल्ड यानी जे त्याचे भाषातर केले आहे ते तुम्हापैकीं कोणी कदाचित् वाचलेंही असेल. जगाचे मूळकारण काय याच्या शोधार्थ गेल्या व्याख्यानाचे प्रसगी आपण निघालों असता या प्रश्नाचे उत्तर जगाच्या बाह्य आकारात हिंडून मिळत नाहीं हें आपणास दिसून आले. आणि नतर या प्रश्नाचे समाधान अत सृष्टीच्या द्वारा होते की काय याचाही विचार आपण केला. कठोपनिषदात या प्रश्नाच्या उत्तराचा शोध याच द्वारें केला आहे. मनुष्याच्या अत:सृष्टींत जी घडामोड चालते तींत या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर मिळतें कीं काय याचा विचार अतींद्रियदृष्ट्या त्याच ग्रथात केला आहे. हें बाह्यजग कोणीं उत्पन्न केलें या पहिल्या प्रश्नापासून यात

सुरवात केली असून हे दृश्यस्वरूपास कसे आलें याचा ऊहापोहही त्यांत केला आहे आतां मनुष्य जगतो आणि हालचाल करतो ती कशामुळे आणि तो मरतो तेव्हा या हालचाल करणाऱ्या वस्तूचे काय होते असा प्रश्न येथे उपस्थित होतो आरंभीच्या तत्त्ववेत्त्यानी जड अथवा बाह्यसृष्टाचा अभ्यास करून तिच्याद्वारे अखेरपर्यंत पोंचण्याचा यत्न केला त्याच्या सर्व खटपटींत जे साध्य झालें तें इतकेच की, अत्यत श्रेष्ठ अशा प्रतीचा मानवप्राणी या विश्वाचा नियामक असावा असे त्यास वाटू लागलें हा प्राणी अत्यत श्रेष्ठ असला तरी तो मानवप्राणीच होता मनुष्यप्राण्यात ज्या काही उणीवा असावयाच्या त्या त्याच्यातही अल्प प्रमाणानें तरी असल्यामुळे अखेरच्या सत्य वस्तूपर्यंत ते पोंचले असें म्हणता येत नाही. फार झाले तर त्यानी सत्याची मजल अशत गाठली इतकेच म्हणता येईल. हे विश्व म्हणजे मानवी प्राण्यानी भरलेली जागा एवढयाच दृष्टीने आपण त्याचे अवलोकन करीत असतो आणि त्याच्या शास्त्याच्या जागीं व्यक्तिविशिष्ट परमेश्वराची योजना करणे हे सामान्य मानवी बुद्धीला योग्यच होते

आपण अशी कल्पना करू की, एखाद्या गाईच्या ठिकाणी तत्त्व बुद्धीचा उदय होऊन ती धर्मविचार करू लागली तर सर्व विश्वात गाय हेच प्रधान तत्त्व तिला दिसेल आणि ती गाईच्याच दृष्टीने या प्रश्नाचे उत्तर देईल. तिच्या दृष्टीने अत्यत गुणवती अशा एखाद्या गाईची योजना विश्वशास्त्याच्या जागीं ती करील आपल्या दृष्टीने जें परमेश्वराचे रूप आपण कल्पितो तें तिच्या दृष्टिपथात येणे शक्यच नाहीं याच रीतीने माजरे तत्त्व विचार करूं लागलीं तर त्याचा परमेश्वर म्हणजे एखादा प्रचड बोका असू शकेल आणि विश्वाच्या कोड्याला त्याचे उत्तर म्हणजे मार्जारतत्त्व दृष्टीचे उत्तर होईल आपली आणि त्याची विचारसरणी हीं कधीही एकरूप असावयाची नाहीत. आपण मनुष्यानी या कोड्याचें दिलेलें उत्तर अर्थातच अपूर्ण असणें हे या विवेचनावरून उघड होईल. येथें आणखीही एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे ती ही की, विश्व म्हणून जी कांहीं वस्तु आहे त्या सर्व वस्तूचा अतर्भाव आपल्या अत्यत विशाल कल्पनेंतही व्हावयाचा नाहीं. आपण सर्वज्ञ आहों आणि आपल्या कल्पनाशक्तीबाहेर कोणतेही अस्तित्व राहू शकावयाचे नाहीं अशी घमेंड मनुष्याला असते, पण ही घमेंड अगदीं चुकीची आहे.

याकरिता या रहस्याचें जें काही उत्तर आपण देऊ त्यांत एक मुख्य गोम अवश्य राहील ती ही कीं, ज्या विश्वाच्या कोड्याचे उत्तर आपण देत असतो ते विश्व म्हणजे आपल्या कल्पनाशक्तींत एकदर अस्तित्वापैकीं जेवढा भाग आपल्या बुद्धीनें आपण आकलन करतो तेवढ्यालाच आपण विश्व म्हणत असतों. आणि फार झाले तर तेवढ्या अर्धवट भागापुरतेच उत्तर आपणास देता येईल सत्य वस्तूचे आकलन इद्रियद्वारा करणें आपणास शक्य नाही. ते आपल्या बुद्धीतही येऊ शकत नाहीं आपल्या पाच इद्रियाच्या द्वाराने जो काहीं अनुभव आपणास होतो आणि जें आपल्या दृष्टीस दिसते तेवढेच विश्व या सज्ञेने आपण ओळखतो आपली विश्वाची कल्पना इद्रियगत अनुभवाची आहे; आता आपण अशी कल्पना करू की आपणास आणखी एक सहावे इद्रिय प्राप्त झालें असे झाले तर विश्वाचे साप्रतचे स्वरूपही आपणास अगदी निराळें दिसू लागेल हे अगदी उघड आहे लोहचुबकासारखें एखादे आकर्षक इद्रिय आपणास प्राप्त झाले तर पूर्वी माहीत नसलेली अशी मूलशक्तीची लक्षावधि रूपे आपल्या अनुभवास येऊ लागण्याचा पुष्कळ सभव आहे. अशा प्रकारचीं कोट्यवधि रूपे आजही सृष्टीत वावरत असलीं तरी ती जाणण्याचे साधन आपणास आज उपलब्ध नसल्यामुळे त्याच्या अस्तित्वाची कल्पनाच आपणास नाही. आपली इद्रियें मर्यादित आहेत आणि ही मर्यादाही अगदीं आकुन्चित आहे; आणि ज्याला आपण विश्व असे म्हणतो त्याचा अतर्भाव या अत्यत आकुन्चित मर्यादेंत आपण करीत असतों या आकुन्चित भागाचा विचार करता करतां व्यक्तिविशिष्ट परमेश्वरापर्यंत आपण पोचतो आणि या विश्वाच्या कोड्याचे ते अखेरचे उत्तर आहे असे आपण म्हणतों. पण सर्व विश्वाचे रहस्य एवढ्या उत्तरांत अर्थातच येऊ शकणार नाहीं, पण एवढे झाले तरी मानवीप्राणी हताश होऊन तेथेच थाबतो असे नाही. तो विचारवत प्राणी आहे. त्याच्या चित्तात आलेले विचार कमाल मर्यादेला पोहोचेपर्यंत त्याला स्वस्थ बसू देत नाहींत. एकदर अस्तित्वाचे रहस्य आपणास कळले पाहिजे ही त्याची आकाक्षा आहे. विश्वात जें जें काही निर्माण झालें आहे आणि जे जे प्राणी अस्तित्वात असणें शक्य आहे त्या साऱ्याचे दर्शन घेऊन या साऱ्या देखाव्याचा उलगडा करण्याची त्याची हाव आहे.

एकदर अस्तित्वाचे स्वरूप काय आहे हे ठरविणें अत्यंत अगत्याचे आहे हें येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून दिसून येईल. अस्तित्वाचे अनेक प्रकार आहेत. या सर्व प्रकाराच्या पोटीं कोणते एकच तत्त्व आहे याचा शोध आपणास प्रथम केला पाहिजे. हे तत्त्व आपल्या इंद्रियानीं जाणता येण्या-जोगें असो अथवा नसो, पण त्याचा शोध प्रथम करणें अवश्य आहे. उच्च प्राण्यात व नीच प्राण्यातही एकच तत्त्व मध्यवर्ती सूत्राप्रमाणें गुतलेले आहे असा शोध आपणास लागला तर आपल्या या कोड्याचें समाधानकारक उत्तर मिळण्याचा मार्ग मोकळा होईल. तीव्र विवेचकबुद्धीने आपण आपले तर्कशास्त्र सूक्ष्म केलें आणि त्याद्वारें सर्व अस्तित्वाचा मूळपाया एकच असला पाहिजे एवढे जरी सिद्ध केलें तरी या कोड्याचें रहस्य आपणास कळण्याचा मार्ग पुष्कळ अशी सुलभ होईल; पण असे समाधानकारक उत्तर कधींकाळीं मिळा-वयाचे असेल तर बाह्येंद्रिय द्वारा अनुभवास येणाऱ्या विश्वात भटकून मात्र ते सापडावयाचे नाहीं. कारण अशा रीतीने अनुभवास येणारे विश्व हे एकदर अस्तित्वाचा लहानसा भागमात्र आहे.

याकरिता इंद्रियें सोडून अधिक खोल बुडी आपण मारली तरच आपला निभाव लागेल हें उघड आहे या कोड्याच्या उत्तराकरिता अत्यत प्राचीन काळीं ज्यानीं पहिले यत्न करून पाहिले त्याना असें दिसून आले कीं, मध्य बिंदूपासून जो जों लाब जावे तों तों अनेक भेद आणि अनेक प्रकार आढ ळून येतात. आणि मध्यबिंदूच्या जवळ जो जों जावे तों तो भेद कमी होत जाऊन ते सारे एकरूपतेकडे येत असतात. एका वर्तुळाच्या परिघापासून मध्यबिंदूपर्यंत अनेक त्रिज्या आपण काढल्या तर दोन त्रिज्यामधील परि घावरचे अतर सर्वात मोठें असून त्या त्रिज्या मध्यबिंदूकडे जों जो येउ लागतात तो तो हें अतर कमी होत जाते असें आपणास दिसून येते. आपलें बाह्य जग हें मध्यबिंदूपासून अत्यत लाब अतरावर आलेलें अस्तित्व आहे याकरितां एकदर अस्तित्वातले सारे देखावे येथे दिसतील हें शक्यच नाहीं आपलें बाह्य विश्व म्हणजे एकदर दृश्याचा लहानसा भाग मात्र आहे. याशि वाय येथे मानसिक, बौद्धिक, नैतिक इत्यादि दुसरे भागही अस्तित्वात आहेत याकरिता इंद्रियगम्य अथवा जडविश्व घेऊन त्यांत एकदर अस्तित्वाचे रहस्य पाहूं जाणें अगदीं चुकीचें आहे—अशक्य गोष्टीमागें धावण्यासारखें आहे. i

उघड आहे याकरिता या साऱ्या अस्तित्वाचा मध्यवर्ती बिंदू कोठे आहे हे शोधून काढणें आपणांस जरूर आहे. ज्या मध्यवर्ती बिंदूवर आपण उभे राहिलों असतां सारें विश्व अवलोकनांत येऊ शकेल असा मध्यबिंदू आपण शोधून काढला पाहिजे येथे उभे राहून मग या उत्तराच्या शोधास आपणास निघालें पाहिजे. पहिलें कोडें हेंच आहे की, हा मध्यवर्ती बिंदू आहे तरी कोठे ? तो आपल्याच ठिकाणीं आहे हें याचें उत्तर होय खोल भागात प्रवेश करतां करतां प्राचीन ऋषिवर्यास जें दिसून आले ते हेंच की, मनुष्याच्या जीवात्म्याच्या अत्यत खोल भागात सर्व विश्वाचा मध्यबिंदू राहिलेला आहे सर्व अस्तित्व या मध्यबिंदूकडे धाव घेत आहे. या मध्यबिंदूवर आपण उभे राहिलो तरच या विश्वाच्या कोड्याचा उलगडा होईल. यावरून हें विश्व कोणी निर्माण केले हा प्रश्न फारसा तत्त्ववादाचा नसून त्याचें उत्तर मिळाले तरी त्याचा फारसा उपयोग नाही हे आपणास दिसून येईल.

कठोपनिषद् हे अलकारिक भाषेंत लिहिलेले आहे. प्राचीनकाळीं एक अत्यत श्रीमान मनुष्य होता. त्याने एक यज्ञ केला. स्वत.जवळ असलेल्या सर्व धनदौलतीचें दान करावयाचे हा या यज्ञांतील मुख्य भाग होता. कोणतेंही काम मन.पूर्वक करण्याची सवय या श्रीमान् गृहस्थाला नव्हती. ‘ अमक्यानें मोठा यज्ञ केला ’ असा आपल्या नावाचा कीर्तिघोष चोहोंकडे व्हावा इतकीच त्याची इच्छा होती. तेव्हा त्याने स्वत स निरुपयोगी अशा वस्तू दान करण्याचा सपाटा लावला. म्हाताऱ्या, दूध आटलेल्या, आंधळ्या आणि लगड्या गाई तो दान देऊ लागला. त्याला नाचिकेत या नावाचा एक मुलगा होता. आपल्या बापाचे करणे रास्त मार्गाचे नाहीं ही गोष्ट या मुलाच्या लक्षांत आली. यज्ञककण बाधते वेळी घेतलेली शपथ आपला बाप मोडीत आहे हें त्यास समजलें, पण ही गोष्ट आपल्या बापाजवळ कोणत्या शब्दानें व्यक्त करावी याचा उमज त्याला पडेना. मातापितरें म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराचींच रूपें होत असें शिक्षण हिंदू मुलास लहानपणापासूनच मिळालेलें असते. यामुळें आपल्या बापाला स्पष्ट बोलण्याचा धीर नाचिकेताला होईना. अखेरीस आपल्या बापाजवळ जाऊन मोठ्या आदबीनें आणि नम्रतेनें तो त्याला म्हणाला, “ बाबा, माझे दान तुम्ही कोणास करणार ? कारण आपल्या सर्वस्वाचें दान करणे हेंच या यज्ञाचें मुख्य आंग आहे. ”

मुलाचा हा प्रश्न ऐकून बाप सतापून म्हणतो, "तू हें काय बोलतोस? कोणताही बाप आपल्या मुलाचे दान कधीतरी करतो काय?" तथापि त्या मुलानें हाच प्रश्न पुन्हा दोन तीन वेळा विचारला तेव्हां बाप संतापून त्याला म्हणाला, "जा तुझे दान मी यमाला केले आहे." एवढे झाल्यावर तो मुलगा यमराजाकडे म्हणजे मृत्यूकडे गेला. जगात प्रथम मेलेला मनुष्य यम झाला आहे तो स्वर्गास गेल्यानतर इतराचा शास्ता झाला. नाचिकेत यमलोकीं गेला. त्यावेळी यमराज घरी नव्हते. तीन दिवसानी ते घरीं आले तेव्हा त्यानीं नाचिकेतास पाहिले

यमराज म्हणाले, "नाचिकेता, तू येथे तीन दिवस उपाशीं राहून माझी वाट पहात बसला आहेस. तुझा सन्मान करावा अशी तुझी वास्तविक योग्यता आहे. हे ब्राह्मणा, तुला माझे नमन असो. मला कल्याणप्रद आशीर्वाद दे. तीन दिवस मी घरीं नव्हतो याबद्दल मला फार वाईट वाटते; पण माझ्या या प्रमादाची भरपाई मी करून देतों प्रत्येक दिवसाबद्दल एक एक या प्रमाणें तुला हवे ते तीन वर माग." यमराजाचें हें भाषण ऐकून नाचिकेत म्हणाला, "यमराजा, मजवरचा माझ्या बापाचा क्रोध जाऊन मजवर तो सुप्रसन्न व्हावा असा मी पहिला वर मागतों." "तथास्तु" असे यमराज म्हणाले. नाचिकेत पुढें म्हणाला, "ज्यायोगे स्वर्ग मिळतो असा यज्ञ कोणता हे मला सांगावे." सहिता म्हणून वेदग्रथाचा जो भाग आहे त्यात ही स्वर्गाची कल्पना मुख्यत्वेकरून आढळते. स्वर्गात जाऊन दिव्य देह धारण करणें आणि पितृलोकी वास करणे हेच मनुष्याचें अखेरचें ध्येय आहे अशी कल्पना सहितात आढळते. यानतर दुसऱ्याही अनेक कल्पनाचा उदय झाला; पण तेवढ्यानींही मनाचे पूर्ण समाधान होण्यासारखें नव्हते. या जगांतलें जीवित आणि स्वर्गातले जीवित यात फारसें अतर असणार नाही ही गोष्ट या प्राचीन तत्त्ववेत्त्याच्या लक्षात हळुहळू आली. स्वर्गसुख म्हणजे फारच झालें तर उत्तम शरीरप्रकृतीच्या अत्यत श्रीमान् गृहस्थाचें सुख होय. यापलीकडे त्यांत काहीं नाही देह दिव्य झाला तरी अखेरीस तो जडदेहच राहणार. या गोष्टी हळुहळू त्यांच्या लक्षात आल्या. बाह्य जगाच्या नादीं लागून आपण कितीही भटकलो तरी या विश्वाच्या कोड्याचे उत्तर मिळून आपलें पूर्ण समाधान कधीहीं होणार नाही याचा विचार आपण नुकताच केला.

आपल्या या दृश्य जगांत या कोड्याचें उत्तर मिळणे जर शक्य नाहीं तर याच्या कितीही सुधारलेल्या आवृत्ती आपण काढिल्या तरी त्यांत त्याचे उत्तर कोठून येईल ? कारण जड परमाणू हे दृश्य विश्वाचा एक अत्यत लहानसा अंश आहे हें आपण नित्य लक्ष्यात ठेविले पाहिजे. जेथे कोणत्याही प्रकारचे जड परमाणू नसतात असे अनेक देखावे आपल्या नजरेस प्रत्यहीं पडत असतात.

उदाहरणार्थ, आपण जड सृष्टीत वावरून हस्तपादादि जड अवयवांनीं जितकी जड कार्यें करतों त्याहून मनानें व बुद्धीनें केलेली कार्यें किती अधिक असतात हें लक्षात आणा मन आणि बुद्धी हीं कार्यव्यापृत नाहींत असा एकही क्षण नाही यावरून आपल्या अतःसृष्टीतील कार्यांची व्याप्ति केवढी मोठी असली पाहिजे याचा तुम्हीच विचार करा इद्रियद्वारा अनुभवास येणारे दृश्य त्या मानानें ‘ दर्यामे खसखस ’ असेच आहे मनुष्याचे अतिमध्येय स्वर्ग आहे. या म्हणण्यांतही हीच चूक होते एकदर विश्व म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गध एवढ्यांतच येते असें म्हणण्यासारखें आहे याकरितां विश्वाच्या कोड्याचें अखेरचें उत्तर स्वर्ग हे असू शकणार नाहीं. यज्ञानी देवता सतुष्ट होतात आणि यजमानाला त्या स्वर्गाला घेऊन जातात अशी कल्पना सहिता ग्रथांत आहे

कोणताही धर्मग्रथ अत्यंत जुना झाला म्हणजे त्याजबद्दलची श्रद्धा वाढत जाते, हा अनुभव सर्व धर्मांत आपणास आला असेलच हिंदुस्थानात जेव्हां कागद मिळत नव्हतें तेव्हां ताडपत्रावर ग्रथ लिहिले जात पुढे कागद करण्याच्या कलेचा उदय हिंदुस्थानांत होऊन वाटतील तितके कागद मिळू लागले, तथापि ताडपत्र हेंच अत्यत पवित्र आहे हा समज अद्यापिही तेथें आहे. अशा रीतीनें किती तरी प्रकारच्या वस्तूस प्राचीनत्वामुळें हिंदुस्थानांत पावित्र्य प्राप्त झालें आहे. अग्नि पेटवावयाचा तो दोन लाकडाच्या घर्षणानें पेटवावयाचा ही नऊ दहा हजार वर्षांपूर्वीची प्राचीन पद्धति आज दिवसालाही तेथे अस्तित्वांत आहे. यज्ञप्रसंगीं, दुसऱ्या कोणत्याही रीतीनें पेटविलेला अग्नि तेथें चालावयाचा नाहीं. दुसऱ्या चालीरिती पुढे पुढें प्रचारात आल्या तरी हिंदु आर्यांनी आपल्या प्राचीन चालीरीतींस पूर्ण फाटा कधींच दिला नाहीं. किंबहुना त्या जुन्या चाली त्यांना अधिकच पूज्य आणि पवित्र वाटू लागल्या. यहुदी

लोकाची अशीच स्थिति आहे. ते आपले लेख प्राचीनकाळी भूर्जपत्रावर लिहीत. साप्रत कागदाचा उपयोग ते करतात तथापि भूर्जपत्र ते फार पवित्र मानतात. सर्व राष्ट्रात हाच प्रकार आढळून येतो आज ज्या कांही गोष्टी पवित्र म्हणून तुम्ही करता त्याचें पावित्र्य त्याच्या केवळ जुनेपणात मात्र आहे. हीच गोष्ट वैदिक यज्ञासही लागू आहे. कालेकरून त्यांचे जीवनाचे मार्ग जरी बदलत जाऊन सुधारत गेले तरी प्राचीन चालीरिती या पावित्र्याच्या कल्पनेमुळे अस्तित्वात राहिल्या

यानतर अशा प्रकारच्या यज्ञयागादि क्रिया करणे हा कांही लोकाचा धदाच होऊन बसला. त्याना पुढे उपाध्याय म्हणू लागले. लोकाकडून अशा क्रिया करविणे हा त्यांचा पोटाचा धदा झाल्यामुळे तो अर्थातच त्याचें सर्वस्व होऊन बसला. यज्ञातील हवनीय द्रव्याचें पान धूम्रद्वारा देवता करतात आणि त्याच्या मोबदल्यात सर्व वस्तू यजमानास देतात या समजामुळें यज्ञाचें प्राबल्य वाढत चाललें. यज्ञयागादि क्रियानीं जगातील वाटेल ती वस्तु प्राप्त करून घेतां येईल असा लोकाचा समज झाला. काहीं विशिष्ट स्तोत्रे म्हटली आणि विशिष्ट आकाराचे स्थडिल रचले म्हणजे देवता वाटेल त्या वस्तू देतात असें लोकास वाटू लागले याच समजास अनुसरून नाचिकेताने प्रश्न केला की, कोणत्या प्रकारच्या यज्ञानें स्वर्ग मिळेल. यमराजानें त्याला एक यज्ञ सागून यापुढे हा यज्ञ तुझ्याच नावाने प्रसिद्ध होईल असें म्हटलें.

यानतर नाचिकेतानें तिसऱ्या वराचा प्रश्न केला. तो म्हणाला, " एखादा मनुष्य मृत झाला म्हणजे त्याचें अस्तित्व शिल्लक असते असे कित्येक म्हणतात आणि त्याचा पूर्ण नाश होतो असे दुसरे कित्येक म्हणतात. यात खरें काय आहे हे आपण मला सागावे. " हा प्रश्न ऐकून यमराज घोटाळयांत पडले. ते म्हणाले, " या प्रश्नाचें उत्तर प्राचीन काळीं देवदेवांसही सांपडलें नाहीं. हा प्रश्न इतका सूक्ष्म आहे कीं, त्याचें उत्तर बुद्धीला आकलन करता येण्यासारखें नाही. नाचिकेता, तू दुसरा कोणता तरी वर माग. हा प्रश्न तू मला करू नको. दुसरा एखादा वर मागून मला वचनमुक्त कर."

यावर नाचिकेतानें उत्तर दिलें, " यमराज, हा प्रश्न अत्यत बिकट आहे आणि या बाबीत देवदेवताचेंही समाधान झाले नाहीं असे जें आपण म्हटलें

तें खरें; पण आपणासारखा वक्ता गुरु मला दुसऱ्या कोठें मिळणार ? आणि मला मागण्यासारखा याच्या तोडीचा दुसरा वर तरी कोणता असणार ? "
यमराज म्हणाले, " वाटेल तेवढी संपत्ति आणि संतति मागून घे, शतायु पुत्रपौत्र मी तुला देतों, तुला मी गाई, हत्ती, घोडे आणि सुवर्ण दान करतों; वाटल्यास पृथ्वीचे साम्राज्य माग आणि इच्छेस येईल तेथपर्यंत त्याचा उपभोग घे. संपत्ति आणि दीर्घ आयुष्य हीं मी तुला वाटेल तितकी देतो. तुझ्या असतील त्या इच्छा मी तृप्त करतों जगात मिळण्यास कठीण अशी एकादी वस्तू तुला हवी असली तरी तीही मी तुला देतों. जगांत कधी दृष्टीससुद्धा न पडणाऱ्या अप्सरा मी तुला देतो नाचिकेता, त्या तुझ्या दासी होऊन राहतील; पण मृत्यूनंतर काय स्थिति होते हा प्रश्न तू मला पुन्हा करू नको."

नाचिकेत म्हणाला, "यमराज, आपण सांगितलेल्या साऱ्या वस्तू क्षणभंगुर आहेत. इंद्रियद्वारा चैतन्यशक्ति हिरावून नेणे हे त्याचे कार्य आहे. आयुष्य कितीही दीर्घ झाले तरी केव्हां तरी ते संपणारच. याकरिता ही सारी संपत्ति आपली आपल्याजवळच ठेवा. केवळ संपत्ति जवळ असल्यानें मनुष्याचें समाधान होते असे नाही. मृत्युराज, आपले दर्शन एकवार घडल्यानंतर संपत्तीची मातब्बरी वाटेल काय ? आपली इच्छा असेल तोंपर्यंतच आम्ही जिवंत राहणार; पण आपण आम्हास घेऊन जाण्याचे ठरविल्यावर त्या संपत्तीचा आम्हाला काय उपयोग ? याकरिता मी मागितलेला वरच मला देण्याची कृपा करावी."

नाचिकेताच्या या भाषणानें संतुष्ट होऊन यमराज त्याला म्हणाले, "पूर्णत्व पावणे आणि इंद्रियजन्य सुखाचा उपभोग घेणें हे दोन मार्ग परस्परांपासून अगदी भिन्न आहेत. या दोहोंचें पर्यवसान अगदीं वेगवेगळें आहे. याकरिता या मार्गांनी गेलेली मनुष्ये परस्परापासून अगदींच अलग असतात. ज्याला पूर्णत्व पावण्याची इच्छा असते तो चित्तशुद्धीच्या मार्गें लागतो. ज्याला विषयसुखें हवीं असतात तो आपलें अखेरचे साध्य चुकवून भलतीकडेच भटकत असतो. मनुष्याला हे दोन्ही मार्ग मोकळे आहेत. ते दोन्हीही त्याच्यापुढें उभे राहिलेले आहेत. या दोहोंची योग्य पारख करून हे दोन वेगवेगळे आहेत आणि त्यांचे परिणाम वेगवेगळे होतील ही गोष्ट शहाणा जाणतो. विषयसुखापेक्षां पूर्णत्व अधिक श्रेष्ठ

आहे हें त्याच्या लक्षांत येते; पण मूर्ख असतो तो देहेंद्रिय सुखाच्या मागे लागतो. नाचिकेता, बाह्य वस्तूच्या भपक्याला न भुलता त्यांचा त्याग तू केलास यात तुझे शहाणपण दिसून आले." यानतर यमराजांनीं नाचिकेताला उपदेश केला आहे.

या ठिकाणी त्यागाच्या कल्पनेचा उदय झाल्याचे आपणांस दिसून येतें. विषयसुखाच्या सर्व वासना जिंकल्यावांचून कोणाही मनुष्याच्या हृदयात सत्य वस्तू प्रकाशणार नाहीत ही कल्पना येथे स्पष्ट उदय पावली आहे. जोंपर्यंत आपल्या इद्रियाच्या इच्छा प्रबळ होऊन आपणास बाह्यवर्ती करीत आहेत आणि जोंपर्यंत त्या बाह्य जगाची गुलामगिरी आपणांकडून करवीत आहेत तोंपर्यंत बाह्य टिळाटोपी आपण कितीही केली तरी आपल्या अत - करणात सत्य वस्तूचा उदय कोठून होईल? शब्द, स्पर्श, रूप, रस गधादिकांच्या द्वारें आपलीं इद्रिये आपणास एकसारखीं बाह्यवर्ती करीत आहेत चित्ताची आसक्ति क्षणोक्षणीं बाह्य वस्तूकडे तीं वळवीत आहेत. अशा स्थितींत सत्य वस्तु कोठून दिसणार?

यमराज म्हणाले, " जगातील संपत्तिजाताची भूल पडल्यामुळें ज्यांच्या बुद्धीला बाल्यदशा प्राप्त झाली आहे त्यांना विचार सुचणें शक्य नाहीं. यामुळें जगाच्या पलीकडे काय असावे हा विचार त्यांच्या बुद्धीला स्पर्शही करीत नाहीं.' दिसते ते खरें, पलीकडचे कोणी पाहिलें आहे?' हा विचार सदोदित चित्तांत वागविल्यानें पुन पुन्हा ते माझ्या सपाट्यांत सांपडत असतात."

हें सत्य लक्षांत येणें हे अत्यत दुष्कर कर्म आहे सदोदित कर्णपथावर तें आदळत असतांही पुष्कळाच्या लक्षात तें येत नाहीं. कारण, वक्ता आणि श्रोता हे दोघेही उच्च पायरीवरचे असावे लागतात. हे दोघेही तुल्य-बल असावे लागतात. फुकटचा काथ्याकूट करून मन वारंवार भग मात्र पावते. येथे कोरडा बुद्धिवाद कोणत्याच कामास येत नाहीं. वास्तविक पाहतां हा बुद्धिवादाचा प्रश्नच नसून तो प्रत्यक्ष वस्तूचा प्रश्न आहे. 'आहे कीं नाहीं' हा सशयच खोटा असून तें आहेच असा तुमच्या बुद्धीचा निश्चय व्हावयास पाहिजे. तुमच्या ठिकाणीं श्रद्धा असली पाहिजे असें प्रत्येक धर्म निक्षून सांगत असल्याचें आपण ऐकलें आहे. यामुळें आमच्या ठिकाणीं केव्हां केव्हा अध-

श्रद्धा उत्पन्न होते; पण ही अधश्रद्धा माझ्या दृष्टीनें चांगली नाहीं. आता या अधश्रद्धेच्या पाठीमागेही एक मोठे तत्त्व आहे यांत संशय नाहीं यांतील मुख्य मुद्दा इतकाच घ्यावयाचा कीं शुष्क काथ्याकूट करून आपल्या मनाचा समतोलपणा बिघडवू नका, कारण, आपण कितीही वादविवाद केला तरी परमेश्वराचें दर्शन घडविण्याचे कार्य तो करणार नाही. हा वादविवादाचा प्रश्न नसून प्रत्यक्षाचा आहे हे लक्षात ठेवा वादविवाद झाला तरी त्याला अनुभवाचा पाया पाहिजे. अनुभव नसल्यास समाधानकारक वादविवाद होऊच शकणार नाहीं. विवेचक बुद्धीनें कोणत्याही प्रश्नाची चर्चा आपण करतो तेव्हां अनुभविलेल्या वस्तूचा विचार तारतम्याने आपण करीत असतों. ज्ञान म्हणजे मनातील वस्तूची बाह्य वस्तूशी तुलना होय. जर कोणत्याही वस्तूचा अनुभव आपल्या चित्तात पूर्वीच नसेल तर तेथे तुलना शक्यच नाहीं. ही वस्तुस्थिति जगाच्या बाह्य स्वरूपासबधीं जशी खरी आहे तशीच ती अत सृष्टीच्या बाबीतही खरी आहे. एखादा रसायनशास्त्री कांहीं रासायनिक पदार्थ घेतो आणि त्यातून आणखी एखादा पदार्थ उत्पन्न करून दाखवितो. तो पदार्थ तुमच्या नजरेस पडत असतो. इद्रियाच्या द्वारा त्याचें ज्ञान तुम्हास करून घेता येते आणि मग त्याच्या द्वारे रसायनशास्त्राचे आपले सिद्धात तुम्ही निर्माण करता. सर्व शास्त्रात याच पद्धतीचा उपयोग होतो. प्रत्यक्ष वस्तूचा परिचय हाच सर्व ज्ञानाचा मूळ पाया आहे आणि याच पायावर विवेचक बुद्धीची आणि तर्कशास्त्राची इमारत आपणास रचायाची आहे; पण चमत्कार हा की बहुतेक लोक धर्माच्या बाबीत मात्र हें तत्त्व विसरतात. धर्माच्या बाबीत अशा प्रकारच्या अनुभवाची गरज आहे हे त्याच्या लक्षात येत नाही. असा अनुभव येणे अशक्य आहे असें त्यांस वाटते. धर्मज्ञान मिळावयाचे तें नुसत्या कोरड्या वादविवादानें प्राप्त होईल असा समज अलीकडच्या काळी बहुतेकांचा आहे. पण धर्मज्ञान हा वाचाळतेचा प्रश्न नसून वस्तुस्थितीचा प्रश्न आहे. तो अनुभवाचा प्रश्न आहे. आपल्या अत सृष्टीचे सशोधन करून तेथे काय चाललें आहे हे आपणास शोधून काढावयाचे आहे आत्म्याचे स्वरूप काय आहे हें आपल्याच ठिकाणी आपणास पहावयाचे असून त्याचा प्रत्यक्ष अनुभवही घ्यावयाचा आहे. असा अनुभव होणें याचेच नाव धर्म. पोकळ बडबडीनें

धर्मज्ञान आपणांस कधींही होणार नाहीं. याकरितां ईश्वर आहे कीं नाहीं या प्रश्नाचा निकाल वादविवादानें लागावयाचा नाही, कारण वादविवाद करणाऱ्या दोन्ही बाजू अनुभवानें बोलत नसल्यामुळें दोन्हीही सारख्याच तोलाची बडबड करीत राहतील ईश्वराला खरोखर अस्तित्व असेल तर तें आमच्या हृदयांतच आहे आपण त्याचें कधीं दर्शन घेतलें आहे काय? जगाला तरी खरें अस्तित्व आहे की नाहीं या प्रश्नाचा निकाल अद्यापिही लागला नसून या बाबतीत प्रत्यक्ष अभिमानी आणि परोक्ष अभिमानी यांच्यातील वाद कधी काळींतरी सपेल की काय याची शकाच आहे; तथापि जगाचें अस्तित्व आहे ही गोष्ट आपल्या अनुभवातील आहे अशाच रीतीनें आपल्या जीवनक्रमातील सर्व प्रश्न सोडविताना अनुभव आणि वस्तुस्थिति ही प्रथम लक्षात घेतलीं पाहिजेत. धर्माची बाबही अशीच आहे. त्यात सांगितलेल्या कांहीं वस्तूचा अनुभव प्रथम घेतला पाहिजे आणि मग त्या पायावर पुढील इमारत उठविली पाहिजे आम्ही म्हणतों तें आधळेपणानें खरें माना असा जो हटाग्रह सर्व धर्मांत आढळून येतो तो मात्र मनुष्यजातीस अवनतिकारक आहे हें विसरता उपयोगी नाही माझ्यामागे आधळयासारखे या असें जो तुम्हास सांगतो तो स्वत अवनतीस जाऊन तुम्हासही अधोगतीस नेत असतो. जगातील सत्पुरुषाचा अधिकार झाला तरी इतकाच कीं, त्यानीं आपले अनुभव आम्हाम सागावे आणि असे अनुभव आम्हास आले तर आम्ही त्यांचे म्हणणें अवश्य खरें मानू, पण असे अनुभव येईपर्यंत त्याचें म्हणणे आंधळेपणानें खरें मानण्यास आम्ही कबूल नाही. आता अशाच प्रकारे वादाची बाजू घेऊन धर्मशास्त्रावर जे लोक हल्ले करतात त्याच्यासबधीही एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे ती ही की, अशा लोकापैकी शेंकडा नव्याण्णवाहूनही अधिकानीं धर्मशास्त्राचा अभ्यास केलेला नसतो. आपल्या अत सृष्टीचें पृथक्करण त्यांनीं केलेले नसतें. सत्य वस्तू काय आहे हें जाणण्यासाठीं त्यांनीं कधींही धडपड केलेली नसते. यामुळें धर्माविरुद्ध त्यांनी आणलेले आक्षेप अगदीं फोल ठरतात. श्रोत्याच्या मनावर त्यांच्या शब्दाचें वजन पडत नाहीं. उद्या एखादा जन्माध उठून जर असें म्हणू लागला कीं, सूर्याच्या अस्तित्वावर विश्वास ठेवणारे सारे मूर्ख आहेत तर त्याच्या या म्हणण्याचा परिणाम आपल्यावर कितीसा होणार बरें ?

धर्मज्ञान म्हणजे अनुभव हा मुद्दा प्रथम नीट शिकून घ्या आणि तो कधींही विसरू नका हा अत्यत महत्वाचा मुद्दा आहे. पुस्तकांत, मतांत, देवळांत आणि चर्चांत अथवा मशिदीत धर्म लपून राहिलेला नाही ही गोष्ट ज्या दिवशीं आपल्या लक्षांत येईल त्या दिवशी धार्मिक बाबींतील सारे तटे लयास जातील. धर्म म्हणजे प्रत्यक्ष अनुभव. ज्यानें आत्मानुभव घेतला असेल, ज्यानें परमेश्वराची प्रत्यक्ष भेट घेतली असेल तोच एक खरा धार्मिक. लाब लाब झगे अगांत अडकवून आणि धर्माधिकाऱ्याच्या उच्च पदावर आरूढ होऊन पोकळ बडबड करणारा मनुष्य आणि ससारात पूर्ण गुरफटून गेलेला अज्ञ मनुष्य याच्यात वास्तविक फरक कांहीच नाहीं. फरक म्हटला तर इतकाच कीं एक भाराभर बोलू शकतो आणि दुसऱ्यास तसे बोलता येत नाहीं. वास्तविक पाहतां आपण सारेच निरीश्वरवादी आहों. खरी गोष्ट अशी आहे कीं ईश्वराचे अस्तित्व आपणास मान्य नाही ही वस्तुस्थिति लपवून चालावयाचें नाही. आपण ती एकदम कबूल करू या आपल्या ठिकाणी बुद्धीची वाढ पुष्कळ झाली असेल पण तेवढयामुळें आपण धार्मिक झालों असे मात्र होत नाही. आपली बुद्धि कितीही उच्च पदाला पोहोचली तरी आपणास धर्मज्ञान देण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं. एखादा ख्रिती घ्या अथवा मुसलमान घ्या, अथवा दुसऱ्या कोणत्याही धर्माचा मनुष्य घ्या. त्या ख्रिस्त्याला त्याच्या शास्त्रात सांगितलेल्या गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव घडला असेल तर तत्क्षणींच त्याला पूर्णता प्राप्त झाली असली पाहिजे. तो प्रत्यक्ष परमेश्वरच व्हावयास पाहिजे; पण असे परमेश्वराचे अवतार किती लोकात कितीसे आहेत बरें ? तथापि जगातील कोट्यवधी लोक आपणास ख्रिस्ती म्हणवितात. याचा खरा अर्थ इतकाच कीं, त्या शास्त्रांतील वचनाचा अनुभव कधी काळीं तरी घेण्याचा यत्न ते करतील. आजची वस्तुस्थिति पाहता या कोट्यवधि लोकांत एकही खरा ख्रिस्ती नाही.

अशाच प्रकारें आमच्या हिंदुस्थानांत तीस कोटी वेदांती आहेत; पण धर्माचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला इसम हजारीं एक या प्रमाणात जरी सांपडण्याजोगा असता तरी जगाचे स्वरूप पार बदलून गेलें असते. वास्तविक पाहतां आपण सारे निरीश्वरवादी असतांही जो कोणी ही गोष्ट कबूल करतो त्याच्यावर निकराचे हल्ले करण्यास आपण मागेंपुढे पाहत नाही. आपण सारे अंधारांत चांचपडत

आहों. धर्म म्हणजे मनाच्या मलखांबावर बुद्धीच्या पकडी आणि पोकळ वादविवाद, इतकाच त्याचा अर्थ आपण करतों. धर्मज्ञानाला याहून अधिक किंमत आपण कधीच देत नाहीं. धर्मशास्त्राच्या चार गोष्टी ज्याला चांगल्या प्रकारें सागता येतात तो आपल्या मते परम धार्मिक होतो; पण धर्माचा हा अर्थच नव्हे **'वाग्वैखरी, शब्दझरी, शास्त्रव्याख्यानकौशलम् । वैदुष्यं विदुषां तद्वत् भुक्तये न तु वक्तये ।'** चतुरपणें भाषण करणे आणि बुद्धीच्या पकडी लढवून वादविवाद करणें ही साधने क्षणभर चित्तरंजनाच्या उपयोगीं पडत असलीं तरी मुक्तीला त्यांचा कांहींच उपयोग होत नाही. आपण प्रत्यक्ष आत्मानुभवाच्या मार्गाला लागतो तेव्हाच खऱ्या धर्ममार्गास आरंभ होतो; तेव्हाच धर्माचा अरुणोदय होतो. त्याच वेळेस नीतिमार्गासही सुरवात होते. आपली सध्याची स्थिति पाहता आपण आणि पशू यांत नीतिदृष्ट्या फारसा फरक नाही. आपल्या आगी काही थोडी नीतिमत्ता दिसत असेल तर तिचें कारण हें की समाजाचा कोरडा आपल्या पाठीमागें सदोदित सज्ज होऊन बसलेला आहे.' तुम्ही चोरी केली तरी त्याबद्दल तुम्हास आम्ही शिक्षा करणार नाही,' असें समाज म्हणाला तर एकमेकाचीं घरें लुटण्यास आपण ताबडतोब खचित आरभ करू. आम्ही चोरी करीत नाहीं आणि या बाबींत नीतीने वागतो याचे कारण पोलिस शिपायाचें अस्तित्व हेंच आहे. अमुक गोष्ट आपण केली तर लोक काय म्हणतील ही धास्ती आपल्या चित्तांत असल्यामुळे आपण काही अशी नीतीने वागत असतो. बाकी वास्तविक पाहतां पशूत आणि आमच्यांत कांहीच फरक नाहीं. माझ्या या म्हणण्यांत कांहीं तथ्य आहे की नाही याचा पडताळा तुम्ही आपल्या अतरंगांतच घ्या. तुमचें अत करण माझ्या म्हणण्याला खचित मान डोलवील असें आहे तर हा दाभिकपणा तरी कशाला? आम्ही धार्मिक नाही ही गोष्ट आपण मोकळेपणीं कबूल करू या. स्वत ला धार्मिक म्हणवून इतराचा उपहास करण्याचा मार्ग आपण आता सोडू या. आपणा परस्परात बधुत्वाचे नाते आहे आणि ज्या दिवशी धर्मतत्त्वांचा अनुभव आपणास येईल त्याच दिवशीं आपण खरोखर नीतिमानही होऊ.

एखादा देश तुम्ही प्रत्यक्ष पाहून आला असलात आणि एखादा मनुष्य तुम्हीं तो पाहिला नाही असें जबरीनें तुम्हांकडून कबूल करवू लागला तरी

अशा कबुलीमुळें मीं तो देश पाहिलेला आहे, ही तुमची जाणीव तुमच्या हृदयातून नष्ट होणार नाही अशाच रीतीने बाह्य जगापेक्षाही अधिक स्पष्ट रीतीनें धर्माचा आणि ईश्वराचा अनुभव तुम्हास झाला म्हणजे तुमची ती जाणीव कोणत्याही कारणाने नष्ट होणार नाही मग तुमचा विश्वास दृढ होईल त्याच वेळी सत्य म्हणजे काय हेंही तुम्हास कळेल, कारण त्या वेळी तुम्ही आणि सत्य एकरूप व्हाल.

वेदातातील मुख्य गुरुकिल्ली हीच कीं, धर्माचा अनुभव घ्या असे वेदात तुम्हांस सागत आहे. नुसत्या बडबडीचा काहीच उपयोग व्हावयाचा नाहीं; पण धर्मानुभव होणे हे अत्यत दुर्घट कर्म आहे हेही लक्षात ठेविले पाहिजे. परमेश्वराचे स्वरूप 'अणोरणीयान' असें आहे. अत्यत सूक्ष्म अणूहूनही त्याचे स्वरूप सूक्ष्म आहे. अतर्वर्ती होऊन सत्पुरुषानी त्याचा अनुभव घेतला आणि असा अनुभव घेऊन आनद आणि दु ख, सद्गुण आणि दुर्गुण, चांगलें आणि वाईट व जीवित आणि मृत्यु या सर्व द्वद्वापलीकडे ते गेले. ज्याला त्याचे दर्शन झालें त्याने सत्याचे प्रत्यक्ष दर्शन घेतलें मग स्वर्गलोक म्हणून जी कल्पना आहे तिची वाट काय असा प्रश्न येथे कोणीं उपस्थित केला तर जेथे दु खाचे वारेही नाही आणि जेथे सर्व सुखें एकवटून राहिलेली आहेत तो स्वर्ग अशी आमची कल्पना आहे. याचा अर्थ असाच की आम्हांस येथे मिळणारी सर्व सुखे हवी असून येथे प्राप्त होणारी दुःखें मात्र नकोत ही कल्पना फार चागली आहे यात शका नाही. असे वाटणें अगदीच स्वाभाविकही आहे, पण यात व्यग इतकेच कीं, ही कल्पना अगदी चुकीची आहे. कारण सर्वथा चागली अशी एकही वस्तू ज्याप्रमाणे उपलब्ध नाहीं त्याचप्रमाणें सर्वथा वाईट असेही काही नाही.

रोम शहरीं एक गृहस्थ राहात होता. आपले हिशेब तपासता तपासता आपणाजवळ आतां फक्त एकच कोट रुपये शिल्लक आहेत असे त्याला आढळून आले. स्वत चे हें दारिद्र्य पाहून उद्या आपले कसे होणार याची चिंता त्याला इतकी लागली की त्याने ताबडतोब आत्महत्या करून घेतली. ही गोष्ट तुम्हीं सर्वांनी ऐकलीच असेल. एक कोट रुपये जवळ असणें ही त्याच्या दृष्टीनें दारिद्र्याची परमसीमा झाली. आनद आणि दु ख यांचा तरी वास्तविक अर्थ काय आहे? अमुक गोष्ट मिळाली म्हणजे मला आनद होईल

असे आपणास वाटत असते, पण ती गोष्ट मिळाली म्हणजे आनद शोधू लागावें तो तो आणखी एखाद्या वस्तूत जाऊन बसलेला आढळतो. अशा रीतीनें आनद पुढे आणि आपण पाठीमागें अशी धावपळ अखड सुरू आहे. आनद आणि दु ख या दोन्हीही धावत्या वस्तू आहेत. तो समोर दिसतो आणि आता सापडला म्हणून त्याजवर झाप घालू लागावें तोंच तो पुढें पळून जातो. मी लहान मुलगा होतो तेव्हा गाडीवान् होण्यात मला मोठी मौज वाटे. घोड्याच्या पाठीवर चाबूक उडवीत उडवीत गावभर फिरणें हीच माझ्या आनदाची अत्युच्च कल्पना होती; पण आतां या कल्पनेचें अस्तित्वही कोठे दिसत नाही जगातला असा एकतरी आनद आहे काय कीं ज्याला तुम्ही अखड चिकटून राहाल ? हा अत्यत महत्त्वाचा मुद्दा आपण नीट समजून घेतला पाहिजे. ‘ आनद आनद ’ हे एक विलक्षण भूत आमच्या माना धरून बसलें आहे आणि ते इतके जबर आहे की त्याला गाडून टाकणें अत्यत दुर्घट कर्म आहे. आपणापैकीं प्रत्येकाची सुखाची कल्पना वेगवेगळी आहे अफूबाजाला अफूची गोळी खाण्यात सुखाची परम सीमा झालीसे वाटते एखाद्या दिवशी अफू मिळाली नाहीं तर तो त्याला दुर्दिन वाटतो त्याला स्वप्नात स्वर्ग दिसला तर जिकडे तिकडे अफूची लागवड केलेली आहे असेंच त्याला दिसेल, पण अशा स्वर्गांत मला कोणी नेलें तर तेथे माझी काय स्थिति होईल बरे ? असल्या स्वर्गापेक्षा माझी सुखदु खमिश्र पृथ्वीच मला बरी वाटेल. जिकडे तिकडे सुंदर उपवने पसरलीं आहेत आणि त्यामधून झुळझुळ जलप्रवाह वाहात आहेत अशीं स्वर्गाचीं वर्णनें फारशी आणि आरबी काव्यांत जिकडे तिकडे आढळतात. नद्यानीं चोहोकडून वेढलेल्या अशा एका प्रदेशात माझ्या आयुष्याचीं बरींच वर्षें गेली. या प्रातांत पुष्कळ वेळा नद्याना महापूर येऊन गावेंचीं गावें वाहून जातात आणि प्राणहानीही पुष्कळ होते. अशा स्थितींत जलप्रवाहमय स्वर्गाचे वर्णन मला कितीसे रुचेल ? माझा स्वर्ग म्हणजे ज्या ठिकाणीं अगदीं बेतापुरते पाणी असेल असाच असावयाचा. आपल्या सुखाच्या कल्पनात वारंवार कितीतरी बदल होत असतो. एखाद्या तरुणाला सुस्वरूप स्त्रीची प्राप्ति स्वर्गसुखासारखी वाटते. हाच मनुष्य वृद्ध झाला म्हणजे स्त्रीविषयक कल्पना त्याला सुखदायक वाटत नाहींत. आपल्या ज्या कांहीं

गरजा असतात त्या जेथे तृप्त होतील तो त्या वेळेपुरता आपला स्वर्ग असतो. या गरजात जसजसा बदल होईल तसतसा स्वर्गाच्या कल्पनेतही अवश्य बदल होत जाणार. इद्रियगत सुखाचा उपभोग हेच सुखसर्वस्व असें ज्यांना वाटते त्याच्या दृष्टीने वाटणाऱ्या स्वर्गांत आम्हास कोणी नेऊन ठेवले तर आमची उन्नति कधीच व्हावयाची नाही अशा स्थितींत राहणें हे आत्म्याचे मरण होय. आत्म्याला याहून अधिक भयकर अशी कोणतीच स्थिति नाही. अशा स्थितीत काळ घालवीत राहणे इतकीच आमची इति-कर्तव्यता आहे काय ? थोडे हसावे, थोडे रडावे, थोडे नाचावे आणि मुरडावे आणि एके दिवशी कुत्र्यासारखे मरून जावे हेच आमचे जन्म-साफल्य काय ? जगातील सुखाकरिता तुम्ही लाळ घोटीत असता तेव्हां आपण आत्म्याला शापदग्ध करीत आहों ही गोष्ट तुमच्या मनात तरी येते काय ? पण असे आचरण तुम्ही प्रत्यही करीत आहा. खरा आनद कोठे आहे हें ठाऊक नसल्यामुळे लौकिक आनदाच्या मागें लागून आत्म्यावर तुम्ही अग्निवर्षाव करीत आहा तुम्ही लौकिक आनद सोडून द्या आणि सुतक्या-सारखे दुर्मुख रहा असे आमच्या तत्त्वज्ञानाचे तुम्हास मुळीच सागणे नाहीं. पण आनदाचे खरें स्वरूप काय आहे हे ओळखा, इतकेच आमचे तत्त्वज्ञान तुम्हास सागत आहे. एखाद्या रानटी शिकारी मनुष्याला तुझी स्वर्गाची कल्पना काय म्हणून विचारले तर तो म्हणेल की, ज्या ठिकाणी रानडुकरांची जिकडे तिकडे शिकार होऊन भाजलेलें मास खावयास मिळते तो स्वर्ग, पण त्याची ही कल्पना ऐकून आपणास हसण्याचे कारण नाहीं. आमच्या कल्पना याहून कदाचित् अधिक चागल्या नटविलेल्या असतील तथापि त्यांची वास्तविक योग्यता तीच आहे. आपण सारे रानडुकराच्या मागें लागलेले असून त्याचे भाजलेलें मास खाण्याची इच्छा करीत आहो.

आतां तत्त्वज्ञानाचे म्हणणें असें आहे की कधींही न बदलणारा, अधिक उणा न होणारा आणि केवलरूप असा आनद अस्तित्वात आहे. आपण ज्या प्रकारची चैन आणि ज्या प्रकारचे आनद येथे भोगतों त्याच प्रकारचा तो आनद असणे शक्य नाहीं. येथे आपणास जो आनद प्राप्त होतो तो त्या परमानदाचा एक अत्यंत लहान अणू आहे. ज्या ज्या क्षणीं आपणास आनद होत असतो त्या त्या क्षणी त्या चिरस्वरूप आनदाचा उपभोग आपण

घेत असतों, पण त्याचे स्वरूप बाह्य वस्तूनी झाकलेलें असतें, यामुळें आपणास प्राप्त होणारा आनद कोठून येतो याचा बरोबर उमज आपणास पडत नाहीं. तो आनद विषयापासून प्राप्त होतो असा भ्रम आपणास पडतो चोर चोरी करतो त्यावेळी सुद्धा प्राप्त वस्तूबद्दल जो आनद त्याला होतो तोही वस्तुत' निर्विकल्प आनदच असतो, पण त्याभोंवती अनेक प्रकारच्या भलभलत्या दृश्य वस्तूचे आणि परिस्थितीचें आवरण पडलेलें असल्यामुळें त्याचें खरें स्वरूप त्या चोराच्या ध्यानांत येत नाहीं आपणास प्राप्त झालेला आनद त्या वस्तूतच होता असा भ्रम त्याला पडतो; पण आनदाचें हें खरें स्वरूप आपणास समजून घ्यावयाचे असेल तर प्रथम निवृत्तिमार्गास आपण लागले पाहिजे. निवृत्तिमार्गाच्या अखेरीस खऱ्या वस्तुस्थितीचा बोध होईल. अज्ञानापासून आपण निवृत्त झालें पाहिजे. त्याचप्रमाणे जगाचे जे खोटें स्वरूप आहे त्याचाही त्याग आपण केला पाहिजे. असें झालें म्हणजे सत्य वस्तु आपण होऊनच आम्हासमोर उघडी होईल. सत्य वस्तु आम्हास सांपडली म्हणजे ज्या वस्तूचा त्याग आपण प्रथम केला होता त्यांचें खरे स्वरूप आपणांस समजेल. त्यांचें पूर्वीचे स्वरूप आणि त्यांचा पूर्वीचा देखावा हीं बदलून जातील. त्यांच्या ठिकाणीही परमेश्वराचा वास आहे ही गोष्ट आपणास कळून येईल, पण त्याचें हे स्वरूप समजावयास प्रथम सत्य वस्तूचें दर्शन होणे आपणांस अवश्य आहे. प्रथम त्याचा त्याग आपण केला म्हणजे त्याच वस्तू आपणास पुन्हां ईश्वरस्वरूपानें प्राप्त होतील. आपले क्षुद्र आनद आणि आपली सारी दु खें गुंडाळून प्रथम बाजूस ठेविलीं पाहिजेत

"सर्व श्रुतीनी ज्याचा घोष केला आहे, ज्याच्या प्राप्तीसाठी सर्व प्रकारची तपे धडपडत आहेत आणि ज्याच्या प्राप्तीसाठी मनुष्ये ब्रह्मचर्याचे पालन करतात त्याचें वर्णन एकाच ॐ या शब्दानें मी करतों" अशा अर्थाची एक श्रुति आहे. श्रुति ग्रथांत ॐ हा शब्द तुम्हास वारवार आढळून येईल. तो शब्द श्रुतीना अत्यत पवित्र वाटतो.

"मनुष्य मृत झाल्यानतर त्याचे काय होते" असा प्रश्न नाचिकेतानें विचारला तेव्हा यमराज म्हणतात, "सर्वज्ञ आत्मा कधीही मरत नाहीं. त्याच प्रमाणें तो कधीं जन्मासही येत नाहीं. तो कशातून उत्पन्न होत नाहीं, आणि त्यांतूनही काही उत्पन्न होत नाहीं. तो कशाचे कार्य नाहीं अणि

कारणही नाहीं. अशा प्रकारचा अज, अनंत, अव्यय आणि सदा एकरूप असणारा आत्मा शरिराच्या नाशाबरोबर नाश पावत नाहीं. मारणाराला, मी त्याला मारला असें वाटतें आणि मरणाराला मी मरतों असे वाटते ही दोन्हीही खोटीं त्या दोघांसही वस्तुस्थिति समजत नाही. **नाय हन्ति न हन्यते ।** ( गीता अ० २ रा ) अशी वस्तुस्थिति आहे तो कोणाला मारीत नाहीं अथवा स्वतःही मरत नाहीं ' हे यमराजानीं सांगितलेलें तत्त्व लक्षांत येण्यास फार कठीण आहे. यमराजानी आपल्या भाषणाच्या आरंभी आत्म्याला ' सर्वज्ञ ' असें जे विशेषण लावले आहे ते मोठ्या मुद्याचे आहे हे आपणांस विशेषेकरून मला सागावयाचें आहे. आत्म्याच्या ठिकाणी सर्वज्ञत्व आणि पावित्र्य ही अगोदरच पूर्णत्वाने आहेत असें वेदाताचे मत आहे. वेदातमताचा आपण पुढें विचार करू तेव्हां याचा अधिक खुलासा आपणास होईल. प्रत्येक आत्म्यांत पूर्ण ज्ञान भरलेलें असून बाह्य जगात फरक दिसतो तो फरक उपाधीच्या फरकामुळें उत्पन्न झालेला असतो. ज्याद्वारें ते ज्ञान व्यक्तदशेस येते त्या द्वारांत जो अधिक उणेपणा असेल त्याची छाया मूलरूपावर पडल्यामुळें त्यांत अधिक उणेपणा असल्याचा आभास होतो मनुष्यामनुष्यांत जो फरक दिसतो अथवा मनुष्यात आणि इतर वस्तूत फरक असल्याचा जो भास होतो तो फरक गुणधर्ममूलक नसून प्रमाणात्मक आहे. प्रत्येक वस्तूच्या अंतर्यामींचें स्वरूप एकच आहे सत्पुरुषाच्या ठिकाणी आणि पाप्यांच्या ठिकाणीं वास करणाऱ्या आत्म्यात काहीं फेर नाही. सुखी मनुष्यात आणि दुःखी मनुष्यांत या बाबीत काही फेर नाही त्याचप्रमाणें सुदर आणि कुरूप माणसांतही आत्म्याचे स्वरूप एकच आहे. मनुष्यांत ज्या आत्म्याचा वास आहे त्याच आत्म्याचा वास पशूतही आहे आत्म्याचें रूप सर्व दृश्य विश्वांत एकच आहे. फरक उत्पन्न होतो तो त्याच्या प्रकाशाचे जें कमी अधिक परिमाण असतें त्यामुळें उत्पन्न झालेला असतो. कित्येकात त्याचें रूप अधिक स्पष्ट असतें तर दुसऱ्या कित्येकात तें अधिक पुसट असते, पण यामुळें आत्म्याच्या मूळरूपांत भेद उत्पन्न झालेला असतो असें मात्र नाहीं. एखाद्या मनुष्याचा पेहेराव अशा प्रकारचा असेल कीं त्यामुळें त्याच्या शरिराचा बराच भाग उघडा राहात असेल. आणि दुसरा एखादा मनुष्य पोषाखानें आपलें सारें शरीर झांकून टाकीत असेल; पण असें झाले तरी त्यांच्या

अवयवरचनेंत कांही फरक उत्पन्न होत नाही. बाह्यतः दिसणारा फरक कपड्यामुळें उत्पन्न झालेला असतो. अमुक चांगलें आणि तमुक वाईट अशा प्रकारचा भेद वेदातानें कोणत्याही वस्तूसंबधानें केलेला नाहीं हा महत्वाचा मुद्दा या प्रसगीं सागून ठेवणे अवश्य आहे चागलें आणि वाईट असा भेदच वेदाताच्या दृष्टीला दिसत नाही. एकच वस्तू प्रसंगभेदानें चागली अथवा वाईट होऊ शकते हा अनुभव आपणांस आहेच जी गोष्ट आज चांगली असे मी म्हणतो तीच गोष्ट उद्याच्या पालटलेल्या परिस्थितीत मी कदाचित् दुःखदायक आहे असेही म्हणेन थडीच्या दिवसात जो विस्तव आपणास सुखदायक वाटतो तोच विस्तव प्रसगी आपले शरीर भाजून आपणास दुःखदायकही होतो. त्यांत विस्तवाचा काही अपराध आहे काय ? अशाच प्रकारें आत्मा पूर्ण आणि पवित्र असताही जो मनुष्य भलभलतीं कृत्यें करतो तो स्वत सच फसवीत असतो. त्याला स्वत:चेच खरें स्वरूप ठाऊक नसते. खुनी मनुष्यात सुद्धा त्याच पवित्र आत्म्याचा वास आहे. तो भलत्या कर्मांस प्रवृत्त झाला ही त्याची चूक आत्म्याला व्यक्तदशेस आणण्याऐवजी त्यानें त्याजवर आणखी एक पडदा मात्र घातला. मृत मनुष्यांतील आत्मा देहाबरोबर मरत नाहीं. तो अनत आणि अव्यय आहे. त्याचा नाश करणें शक्य नाहीं. तो अणूरेणूहून सूक्ष्म असून आकाशाहून मोठा आहे. जे आपल्या आचरणानें पवित्र होतात ते दु खमुक्त होऊन परमेश्वरकृपेनें त्यांना आत्मलाभ होतो. ज्याला देह नाही असा आत्मा त्याच्या देहांत असतो. तो अनतरूप असताही त्यांच्या लहानशा देहांत सामावलेला दिसतो. तो सर्वज्ञ आणि सर्वसाक्षी आहे. आत्म्याचे हे स्वरूप अनुभवास आल्यामुळें सत्पुरुष दु:खाच्या पलीकडे गेलेले असतात.

" सभाषणानें, मोठ्या बुद्धिमत्तेनें अथवा वेदांताच्या अभ्यासानेंही आत्मानुभव होणार नाहीं " अशा अर्थाची एक श्रुति आहे. हें वचन अत्यत धाष्टर्याचे वाटते. प्राचीन ऋषी कोणत्याही विशिष्ट ठिकाणीं न थाबता आपल्या विचारबुद्धीला अगदीं मोकळेपणीं वावरू देत असत हें मीं पूर्वी सांगितलेंच आहे. खिस्ती लोकांना बायबल हा ग्रथ जितका पूज्य वाटतो त्याहूनही वेद आम्हांस अधिक पूज्य वाटतात. परमेश्वराने मनुष्याच्या हृदयांत सचार करून त्याजकडून धर्म बोलविला असा तुमचा समज आहे, पण आम्हा हिंदुस्थानांतील

लोकास वेदग्रंथांसंबधीं इतकी पूज्य भावना आहे कीं ज्या वस्तूला श्रुतींत अस्तित्व नाहीं तिला कोठेच अस्तित्व नाहीं श्रुतिग्राह्य असें कांहींच नाहीं वेदांमुळें ही सर्व सृष्टि निर्माण झाली आहे. ज्याला ज्ञान अशी संज्ञा लावतां येईल तें सारें वेदांत सांठविले आहे. त्यातील प्रत्येक शब्द पवित्र आणि अनत आहे. आत्म्याप्रमाणेंच तो अनाद्यनत आहे. सृष्टीच्या उत्पन्नकर्त्यांचें सारें मन जणू काय या ग्रथात सांठवून ठेविलें आहे वेदग्रंथांबद्दल हिंदुस्थानांत अशाप्रकारची पूज्यबुद्धि आहे. अमुक एक गोष्ट नीतीची कां तर ती वेदांत नीतीची म्हटली आहे म्हणून. अमुक गोष्ट अनीतीची कां? वेदांत सागितली आहे म्हणून. वेदग्रथाबद्दल इतकी पूज्यबुद्धि असताही ज्या ऋषिवर्यांनी वेदांच्या अभ्यामानें आत्मलाभ होणार नाहीं असें उच्च रवानें सागितलें, त्यांच्या धैर्याचें वर्णन कोठवर करावे? 'परमेश्वराची कृपा ज्यावर होते त्याला तो दर्शन देतो. असेही एक श्रुतिवचन आहे. या वचनांत पक्षपाताचा भास होतो. यमराजांनीं या वचनाचा उलगडा असा केला आहेः—'जे दुष्कृत्यें करणारे असतील आणि ज्याच्या चित्तास शांति प्राप्त झाली नसेल त्यांना प्रकाश कधींही गोचर होणार नाहीं. जे अत करणाचे पक्के असतील, कर्मानें जे पवित्र असतील आणि यमनियमानी ज्यांनीं इद्रियनिग्रह केला असेल त्यांना आत्मानुभव होईल '

आत्मा हा स्वारासारखा असून देह रथासारखा आहे बुद्धि ही सारथ्यासारखी आहे, मन या दोऱ्या असून इद्रियें घोड्यासारखीं आहेत. ज्याचे घोडे शिकून चांगले तयार झालेले असतील आणि त्याच्या दोऱ्या मजबूत असून सारथ्याच्या हातीं पक्कया असतील तोच मुक्काम गांठू शकेल. हा अखेरचा मुक्काम म्हणजे सर्वव्यापित्व हा होय. ज्याचे घोडे तुफान झालेले असतील आणि ज्याच्या सारथ्याच्या हातांतील दोऱ्या ढिल्या पडल्या असतील तो रथ इतस्ततः भटकून आणि अखेरीस कोठे तरी आपटून त्याचा चुरा होईल. सर्वांतर्यामीं वसत असलेला आत्मा डोळयांनीं दिसत नाहीं अथवा इंद्रियांना भासत नाहीं; पण ज्यांचीं मनें शुद्ध आणि पवित्र झालीं असतील त्यांना त्याचा अनुभव होतो. आत्मा शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधादि सर्व इद्रियाच्या बाहेर आहे. तो अनाद्यनत आहे. तो या सृष्टींतही नाहीं तो कधींही बदलत नाहीं. तो सदोदित अव्यय आहे. ज्याला आत्मानुभव झाला

असेल त्याची सुटका मृत्यूच्या दाढेतून होते; पण अशी स्थिति प्राप्त करून घेणें हे फार बिकट काम आहे. तिखट धार दिलेल्या वस्तऱ्यावरून चालण्या-इतकें ते कठीण आहे हा मार्ग अत्यत लाबच्या प्रवासाचा आणि धोक्याचा आहे; पण असें असले तरी धीर न सोडता पुढें जाण्यासाठी धडपडत रहा मुक्काम गाठीपर्यंत मध्ये कोठेंही थाबू नका.

सर्व उपनिषद् ग्रथांच्या पोटी जी एक मुख्य गोष्ट आढळून येते ती आत्मानुभव ही होय या बाबींत अनेक प्रकारचे प्रश्न वेळोवेळा उपस्थित होण्याचा सभव आहे विशेषत अर्वाचीन काळच्या मनुष्याला तर नाना प्रकारच्या शका उपस्थित होतील. इतकी खटपट आम्हीं केली तर तिचा लौकिक उपयोग आम्हास काय होईल ? अशा प्रकारचे अनेक प्रश्न त्याच्या चित्तांत उभे रहातील. अशा प्रकारचे कितीही प्रश्न उभे राहिले तरी त्या सर्वांचे मूळ एकच. ते मूळ म्हणजे आपले पूर्वग्रह हेंच. आपल्या मनावर पूर्वीच्या समजुतींचा दृढ परिणाम झालेला आहे या समजुती आपल्या चित्तातून एकाएकी जात नाहींत, आणि वारंवार त्या जागृत होऊन अनेक शकांना त्या जन्म देत असतात. जन्मादारभ्य जे द्वैतात पडले असतील आणि व्यक्तिविशिष्ट परमेश्वराची कल्पना ज्याच्या मनावर अत्यत दृढ होऊन बसली असेल त्याना हे सिद्धान्त फार कडक वाटल्यास नवल नाहीं, पण ते ऐकून घेऊन त्यावर त्यानी मनन केलें तर त्याचे दृढीकरण होऊन त्यांज-पासून मन पराङ्मुख होणार नाहीं. त्याना या सिद्धाताची जी भीति आज वाटत आहे ती त्याच्या दृढ परिचयानें नाहीशी होईल. तत्त्वज्ञानासबधीं जो एक मोठा आक्षेप वारवार ऐकू येतो तो त्याच्या उपयुक्ततेसबधीं होय. या ज्ञानाचा उपयोग काय या प्रश्नाला एकच उत्तर देतां येईल. ते असे कीं, इद्रियजन्य सुखाच्या मागे लागणें हे तुमच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें जर चागलें ठरते तर ज्याना धर्मविचारांत सुख प्राप्त होत असेल त्यांनीं त्या मार्गांत का शिरू नये ? इद्रियजन्य सुखापासून ज्याना आनद वाटत असेल, त्यानीं त्याच्या मागे खुशाल लागावे. पण, इद्रियात ज्याना सुख सांपडत नाही आणि ज्याना अधिक उच्च प्रकारचे सुख हवे आहे असेही कांहीं असू शकतील खाण्यापिण्यात कुत्र्याला सुख होते, उच पर्वतावर रहावयास जाऊन तेथून एखाद्या ताऱ्याचा वेध घेण्याकरितां जगातील सर्व

सुखें सोडण्यांत ज्योतिष्याला काय आनद होतो याची कल्पना त्या कुत्र्याला होणार नाहीं. तो कुत्रा त्याला खुळा समजून मनातल्या मनांत त्याला हसेल लग्न करून संसार करण्यापुरते द्रव्यही या वेडप्याजवळ नसावे असेंही त्याच्या मनात येईल. यावर तो ज्योतिषी म्हणेल "गड्या, तुझें सुख इद्रियगत असल्या-मुळें इद्रियापलीकडच्या सुखाची जाणीव तुझ्याकडे नाहीं इद्रियजन्य सुखांच्या मागें लागण्याचा हक्क तुला जितका आहे तितकाच माझ्या आनदामागें लागण्याचा मलाही आहे या पर्वतशिखरावर येऊन राहण्यातच मला आनद आहे"

आपल्या स्वत च्या विचाराप्रमाणें बाकीच्या जगाने आपले वर्तन ठेवावें आणि त्यापासून यत्किंचितही ढळू नये अशीच जणू काय आपली अपेक्षा असते. आपली मोठी चूक ती हीच. सर्व विश्व आपल्या मनाच्या मापानें आपण मोजून टाकीत असतों तुम्हाला इद्रियाच्या सतोषात अत्यत मोठें सुख वाटत असेल पण मलाही त्यातच सुख वाटावे अशी जबरी माझ्यावर तुम्ही कां करावी ? आणि अशी जबरी तुम्हीं करू लागला की तुम्हा आम्हात तट्याचे मूळ उपस्थित होतें. उपयुक्ततावादाला अनुसरणारा ससारी मनुष्य आणि धार्मिक मनुष्य या दोघात हेंच अतर आहे. उपयुक्ततावादी म्हणतो, "मी किती सुखी आहें पहा मी द्रव्य सपादन करतों पण धर्मासबधीं विचार करून मी आपलें डोके शिणवीत नाही. त्याचा शोध लागणें दुरापास्त आहे आणि तो नसला तरी माझें काय अडतें आहे ? तो नसला तरी माझ्या सुखात काही उणीव येत नाहीं. मग हे सशाचे शिंग मीं का शोधावें ?" ठीक आहे. उपयुक्तता वादाच्या दृष्टीनें या म्हणण्यास आम्ही हरकत घेत नाहीं. पण जगाची स्थिति काय आहे याचा विचार करा. दुसऱ्या कोणासही न दुखविता एखादा मनुष्य स्वतःस सुख प्राप्त करून घेत असेल तर त्याचे कल्याण चिंतून आम्ही त्याला आशीर्वाद देऊ; पण हाच मनुष्य येऊन 'तुम्हीही असेंच केले पाहिजे नाही तर तुमची गणना मूर्खांत होईल' असें मला म्हणू लागला तर 'तुला ज्यानें सुख होते त्या वस्तूनें मला सुख होत नाही' असें त्याला सागणें मला भाग पडेल. पैशाच्या मागें लागण्यात एखाद्या उपयुक्ततावादी संसाऱ्याला सुख होत असेल पण पैसा मला इतका तिरस्करणीय वाटत असेल कीं, पैशाच्या मागें लागण्यापेक्षां जीव देणेंसुद्धां

मला बरें वाटेल. धार्मिक मनुष्य उपयुक्ततावाद्याला अशा प्रकारचें उत्तर देईल. ऐहिक वस्तूंचा वीट ज्यांना आला असेल त्यांनाच धर्माकडे वळण्याची बुद्धि होईल अशी खरी गोष्ट आहे. जगातले सारे अनुभव घेऊन त्यातील सुखांचा वीट आपणास वाटू लागला पाहिजे. या वस्तू तुच्छ आहेत हें अनुभवानें कळावयास हवे. असे झाल्याशिवाय धर्मज्ञानाची खरी इच्छा आपल्या ठिकाणीं उत्पन्न होणार नाही. एका जगाचे दरवाजे पुरते बंद झाल्याशिवाय दुसऱ्या जगाचे दरवाजे उघडणार नाहींत.

इंद्रियजन्य सुखाच्या मार्गाचें रूपांतर आणखीही एका प्रकारें होत असते. हें रूप मोठे मोहक पण तितकेंच भयंकरही आहे या जगात अनुभवास येणारी सर्व दु:खें विलयास जाऊन त्यातील सुखे मात्र शिल्लक उरण्याचा काळ केव्हां तरी येईल अशा प्रकारचे मत सर्व प्राचीन धर्मांत आढळून येते. या मतावर विश्वास ठेवणें शक्य नाहीं. असा काळ कधीतरी येईल हे म्हणणे विवेचक बुद्धीला पटावयाचे नाही. जग जसे आजपर्यंत चालत आलें आहे तसेंच तें अखंड चालू राहणार, हे म्हणणें मोठें भीतिप्रद आहे ही गोष्ट खरी, पण तसें स्पष्ट म्हणण्यावाचून मला तरी दुसरा मार्ग दिसत नाहीं. आंगात मुरलेला संधिवात जसा असतो तद्वतच या जगातील दुःख आहे. त्याला एका सांध्यांतून हुसकावून लावलें तर तेथून निघून तो दुसऱ्या सांध्यात शिरून बसतो; आणि तेथून बाहेर काढल्यास तो आणखी एखादें घर शोधतो; पण तो शरीरांतून कायमचा निघून जात नाहीं. तुम्हीं काहीं केलें तरी त्याचे अस्तित्व कोठेंना कोठें उरतेच प्राचीन काळी माणसें जंगलात राहून परस्परांस खात असत. आतां अर्वाचीन काळीं परस्परांचें मांस तीं भक्षण करीत नाहीत, पण एकमेकांचे खिसे कापतात सध्या फसवाफसवीच्या धंद्याला मोठी तेजी आहे. या धंद्याखालीं गावेंचीं गावें आणि देशचे देश उध्वस्त होत आहेत. याला सुधारणा म्हणावी की उत्क्रांति म्हणावी कीं दुसरें काय नांव द्यावें हें मला सुचत नाहीं. तुम्ही तरी याला सुधारणा असें नांव द्याल असें मला वाटत नाहीं. हल्लीं ज्याला आपण सुधारणा असें म्हणतों तींत मनुष्याच्या हांवेची वाढ मात्र पूर्वीपेक्षां पुष्कळ पटीनें झाली आहे; नाना प्रकारच्या इच्छा मनुष्याच्या मनांत उत्पन्न होऊं लागल्या आहेत. या आशेच्या मागे लागूनच मनुष्य दुःखाच्या चक्रात सापडतो ही गोष्ट

इतकी उघड आहे की तिचे विवेचन करण्याचेंही कारण नाहीं. भिकाऱ्याची स्थिति आणि ही स्थिति या दोन्हीं अगदीं एकसारख्या आहेत. कोणत्या ना कोणत्यातरी वस्तूच्या मागें लागावे आणि तिचेंच चिंतन करीत बसावे; ती तृप्त झाली तर आणखी नवी इच्छा उद्भवावी हा प्रकार मात्र सध्या सर्वत्र वाढत आहे. ही वाढती हांव तृप्त करण्याचीं एकपट साधनें आपल्या हातीं आली तर हांव तिकडे दसपट वाढून बसते. या जगातील सुखदु खाचें समवायी रूप सर्वकाल एकच आहे समुद्रात एखाद्या ठिकाणीं लाट उठली तर त्या लाटेच्या उचीच्याप्रमाणें दुसऱ्या ठिकाणीं खाडा पडतो. एका मनुष्याला सुख प्राप्त झालें तर दुसऱ्या एखाद्या मनुष्याला अथवा पशूला त्याच कारणामुळें दु ख प्राप्त होते. माणसाची सख्या वाढत आहे आणि दुसऱ्या बाजूला काहीं पशू अस्तित्वातून नाहीसे होण्याच्या पथास लागले आहेत पशूचा सहार करून आणि अरण्ये नाहींशीं करून त्यांचीं निवासस्थानें आपण बळकावीत आहों. अशा स्थितीत जगाच्या सुखात भर पडत आहे असे आपणास कसें म्हणता येईल? एखादा मानववश बलिष्ठ झाला म्हणजे दुसऱ्या दुर्बल मानववशाला भक्षण करतो; पण इतकें करून तो स्वत तरी सुखी होतो काय? तो सुखी होत नाही. त्याच्यात यादवी सुरू होते. अशा प्रकारचा प्रत्यक्ष व्यवहार नजरेसमोर चालू असता जग हें कधीतरी स्वर्गभुवन होईल हे म्हणणें खरे कसें मानावें? वस्तुस्थिति या मताविरुद्ध साक्ष देत आहे. व्यवहार बाजूस ठेऊन केवळ तत्त्वदृष्टया या प्रश्नाचा विचार केला तरीही या मताची हीच वाट लागते.

पूर्णत्व अनत आहे. ज्या स्थितीला आदि आणि अत हीं आहेत ती स्थिति पूर्ण आहे असें म्हणता येणार नाही. याकरितां पूर्णत्व हें अनाद्यनतच असलें पाहिजे. हें पूर्णत्व आपल्या ठिकाणी अगोदरच असून ते व्यक्त दशेस आणण्याची आपली खटपट सुरू आहे. तुम्ही, मी आणि सर्व प्राणी याच खटपटीत गुतलेले आहों येथपर्यंत ही उपपत्ति ठीक आहे. पण कांहीं जर्मन तत्त्ववेत्ते हीच उपपत्ति मुळाशी धरून असें म्हणतात कीं, अशाच रीतीने ही उत्क्राति वाढत वाढत आपण पूर्ण स्वरूपी प्राणी बनून जाऊ. पूर्ण स्पष्टत्व अथवा उत्क्राति या शब्दाचा अर्थ काय? पूर्णत्व म्हणजे अनतत्व आणि स्पष्ट दशा म्हणजे नियमबद्ध दशा. तेव्हा पूर्ण स्पष्ट दशा याचा अर्थ

शान्त स्थितींतील अनतदशा म्हणजे ज्या स्थितीला अत आहे अशी अनत स्थिति असा या शब्दाचा अर्थ होतो. यात परस्परविरोध कसा आहे हें उघड दिसते याकरिता अशा प्रकारच्या उपपत्तींनीं फार तर बालबुद्धीचे मात्र समाधान होईल, पण असल्या उपपत्ति कोणाच्याही मनांत भरविणे म्हणजे त्याच्या मनात विषाचे बीजारोपण करणें होय. असल्या उपपत्ति धर्मसाधक नसून परमनाशक मात्र खास आहेत. जग हें उच्च स्थितीतून भ्रष्ट पावलेलें आहे आणि मनुष्यप्राणी ईश्वराचा भ्रष्ट झालेला अवतार होय हेही आपणांस माहित आहे. ही गोष्ट सर्व धर्मांनी एकमतानें कबूल केलेली आहे आज आपली स्थिति पशूच्या जवळ जवळ झाली असून आता या शृखलेंतून बाहेर पडण्यासाठीं आपण धडपडत आहो; तथापि आपले पूर्णत्व याच स्थितीत कधींही प्रगट होणार नाही. आपण कितीही धडपड केली तरी एक वेळ अशी येईल की ज्या ठिकाणीं आपल्या धडपडीचे काही न चालता आपणांस स्वस्थ बसावे लागेल इद्रियाच्या वृत्ती कायम ठेवून आपलें पूर्णत्व आपणास प्रगट करता येईल ही गोष्ट कालत्रयातही घडणें शक्य नाहीं. जोंपर्यंत आपण इद्रियाच्या आधीन आहों तोपर्यंत पूर्णत्व मिळविणे शक्य नाही. त्यापलीकडे आपण गेलों म्हणजे अनतत्वाच्या राजमार्गास आपण लागू

त्याग म्हणतात तो हाच. ज्या मार्गाने चालत गेल्यामुळें इद्रियांच्या आधीन आपण झालों आहों त्याच मार्गाने आपणास परत गेलें पाहिजे तो रस्ता उलट दिशेनें चालून गेल्याखेरीज या अडचणींतून बाहेर पडण्यास दुसरा मार्ग नाहीं. जेव्हा हा उलटा मार्ग आपण चालू लागू तेव्हाच खऱ्या नीतिमार्गास आरभ होईल. सगळया नीतिग्रथाचे सार काढावयाचे म्हटले तर ते ‘मी नसून तू’ एवढया शब्दात काढता येईल अहकाराचा पूर्ण लोप होणे हा साऱ्या नीतिसिद्धांताची गुरुकिल्ली होय. हा अहकार आपल्या मूळ अनत रूपाचा दर्शक आहे आणि बाह्य जगात आपलें मूळचे अनतरूप प्रगट व्हावे यासाठीं तो धडपडत आहे. या धडपडीचा परिणाम असा झाला आहे की त्यानें स्वतःला या साडेतीन हात देहांत कोंडून घेतले आहे. यामुळें त्याचे अनतरूप नाहींसें होऊन अत्यत आकुञ्चित स्वरूप त्याला प्राप्त झालें आहे. हें क्षुद्र रूप टाकून देऊन मूळच्या विशाल अनतरूपाला मिळण्या-

करितां आलेल्या रस्त्यानें त्याला परत गेले पाहिजे तुमच्या ठिकाणीं हा क्षुद्र अहकार जो जो वाढतो तो तो त्या अनत रूपापासून तुम्ही अधिक भ्रष्ट होता आणि जो जों त्याचा विसर तुम्हास पडतो तो तों त्या अनतत्वाकडे एक एक पाऊल तुम्ही पुढे टाकीत असता. ‘ अह ’ या क्षुद्र भावनेने प्रेरित होऊन जेव्हा तुम्ही जगात अवतरता आणि इद्रियाच्या आधीन होता तेव्हा तुम्ही खोट्या मार्गास लागलेले असता. यामुळेच अहमहमिका सुरू होऊन जगात दुष्टत्व उत्पन्न होते; तथापि हा मार्ग चुकीचा आहे असा अनुभव कालेकरून आला म्हणजे त्यागाची पूर्व तयारी होते; आणि अखेरीस आपलें चित्त पूर्ण सन्यासी बनते. असा सन्यास त्याला प्राप्त झाला म्हणजे हा क्षुद्र अहकार मरून नाश पावतो. या क्षुद्र जीविताच्या आशेनें लाळ का घोटावी ? येथे राहून इद्रियजन्य सुखें भोगावी आणि मृत्यूनतरही स्वर्गासारख्या ठिकाणीं जाऊन याच इद्रियजन्य सुखाची सुधारलेली आवृत्ति काढावी हाच विचार मृत्यूचें कारण होय.

पशुत्वाच्या स्थितीतून उत्क्रात होत होत आपण मनुष्ये झालों आहों, ही गोष्ट खरी असेल तर मनुष्ये अपक्रात होत होत तीं पशू बनली असतील ही गोष्ट सुद्धा खरी असावयास काय प्रत्यवाय आहे ? असें झाले नाहींच असें म्हणावयास आपल्याजवळ काय पुरावा आहे ? पशूच्या उत्क्रातीनें मनुष्ये बनलीं हा सिद्धात उत्क्रातिवादी कसा सिद्ध करतात पहा. अत्यत क्षुद्र रूपापासून तों अत्यत उच्च रूपापर्यतचे अनेक प्रकारचे देह ते पाहतात. हे देह एकापेक्षा एक अधिक वरचढ असे आहेत. एवढ्यावरून पशूच्या उत्क्रातीनें मनुष्य बनला असा सिद्धात ते काढतात पण खालपासून वरपर्यंत उत्क्रातीच होत गेली आणि वरपासून खालपर्यंत अपक्राती झालीच नाहीं हें सिद्ध करावयास काय पुरावा आहे ? त्यानी आणलेला पुरावा उभयपक्षीं सारखाच लागू पडतो. माझ्या दृष्टीने यात खरी स्थिति अशी आहे कीं हा चक्रनेमिक्रम आहे एका ठिकाणीं उत्क्राति सुरू असता त्याच वेळीं दुसऱ्या ठिकाणीं अपक्राति सुरू असते. आणि हे उत्क्रांति–अपक्रातीचें रहाटगाडगें अखड चालू आहे. अपक्राति नसेल तर उत्क्राति तरी कोठून येईल ? उच्चतर स्थितीवर आरूढ व्हावे याकरिता आपण सारे धडपडत आहो हें खरें असेल तर याच धडपडीवरून असा सिद्धात निघतो की एकाद्या उच्चतर

स्थितींतून आपण भ्रष्ट झालेले आहों हाच सिद्धात अखेरीस खरा ठरतो. येशू ख्रिस्त, बुद्ध आणि वेदात या सर्वांनी एकमतानें आपणास हाच सिद्धात सागितला आहे सांप्रतचे अपूर्णत्व आपण झुगारून दिलें तरच कालेकरून आपण आपल्या पहिल्या पूर्णत्वास जाऊ असे ख्रिस्त, बुद्ध आणि वेदात हे आपणास सागत आहेत. हें जग निव्वळ भ्रममूलक आहे, सत्य वस्तूची ती केवळ छाया आहे आणि ती छायासुद्धा मनोरम नसून अगदी बेढब आणि घाणेरड्या स्वरूपाची आहे तिचा त्याग करून सत्य वस्तूकडे आपणास गेलें पाहिजे. तेथे पोंचण्याचा राजमार्ग सन्यास हाच होय. आपल्या खऱ्या जीविताचा मूळपाया सन्यास हाच होय. ज्या एकाद्या क्षणी आपण अहकार पूर्ण विसरतों त्याच क्षणीं या सत्य जीविताच्या आनदाचा उपभोग आपणास मिळत असतो. या क्षुद्र अहकाराचा पूर्ण नाश झाला पाहिजे असे झालें म्हणजे आपणच सत्य वस्तू आहों आणि ही सत्य वस्तु परमेश्वर असून आपलें मूळचे खरें रूप तेच आहे असा अनुभव आपणास येईल. परमेश्वर आपणाबरोबर आणि आपल्याच ठिकाणीं आहे असें आपणास आढळून येईल. परमेश्वराच्या स्वरूपात सदोदित राहाणें हेंच खरें आनदमय अस्तित्व होय. देहाचा विसर पडून सदोदित चैतन्यात अस्तित्व असणें हाच खरा जिवतपणा होय. हा अनुभव आपणास यावा यासाठीच आपण सारे खटपट करूया.

---

## ९

## विविधतेंत ऐक्य.



"आत्म्यानें इद्रियाना बाह्यवर्ती केलें असल्यामुळें मनुष्य सदोदित बाह्यवर्ती असतो. कोणा बुद्धिमान् पुरुषाला अमृतत्व मिळविण्याची इच्छा होऊन त्यानें इद्रियें अतर्मुख केली तेव्हा त्याला आत्मलाभ झाला," अशा अर्थाची एक श्रुति आहे. विश्वाच्या कोड्याचा उलगडा करण्याकरिता श्रुतीनेंही प्रथम बाह्य जगांत शोध केला; पण बाह्यवस्तूत त्याचें उत्तर सांपडणें शक्य नाहीं

अशी खात्री होऊन बाह्य जगाचा त्याग करून ती अतर्मुख कशी झाली याचें विवेचन मी एकवार केलेंच आहे. हाच मुद्दा आता सागितलेल्या श्रुतिवचनांत आहे आत्मा हीच मुख्य आणि सत्य वस्तु असून त्यातूनच देहादि इद्रियें जणू काय उत्पन्न झालीं आहेत. आत्मा हा सूर्यबिंबासारखा असून मन, देह आणि इतर इद्रिये ही त्याच्या किरणासारखीं बाहेर पसरलीं आहेत. "बालबुद्धीची मनुष्ये व अज्ञजन इच्छांच्या मागें धावत सुटतात आणि या इच्छा केवळ बाह्य जगासबधाने असल्यामुळें ती मृत्यूच्या पाशात सापडतात पण शहाणे असतात ते अमृतत्वामागें लागून या सान्त जगांतील जीविताची इच्छा करीत नाहींत" या वचनातही हीच कल्पना स्पष्ट केलेली आहे. या जगातील वस्तूना अत असल्यामुळें त्याच्यात आपण कितीही भटकलों तरी अनताचा शोध तेथे लागणार नाही. जें स्वत. अनत असेल त्यातच अनताचा शोध केला पाहिजे. आणि अशी अनत वस्तु म्हटली म्हणजे आपला आत्मा हीच होय. आपले शरीर, आपले विचार, आपलें मन अथवा बाह्य जग यापैकी एकही वस्तु अनत नाही. यांचा द्रष्टा जो मनुष्याच्या ठिकाणीं वास करतो आणि जो सदोदित जागृत आहे तो आत्माच फक्त अनत आहे. याकरिता त्याच्याच ठिकाणी अनतत्त्वाचा शोध आपणास लागेल. कोणत्या अनत तत्त्वातून हें विश्व निर्माण झाले या प्रश्नाचे उत्तर आपणास हवें असेल तर तें आपल्या या मध्यवर्ती बिंदूजवळच जाऊन मिळेल. तेथे जें उत्तर मिळणार तें अनतत्व एकरूप आहे हेच. ज्याला विविधता दिसते तो पुन. पुन्हा मृत्यूच्या पाशांत सापडतो. स्वर्गादि लोकाची कल्पना श्रुतीत आरंभीं कशी आढळून येते याचे विवेचन आपण एकवार केलेच आहे. या जगांतील कितीही सुखें भोगलीं तरी त्याबरोबर दु खें अवश्य येतातच असा अनुभव आल्यानतर प्राचीन आर्यलोकाना केवळ सुखमय स्वर्गाची कल्पना आपोआपच सुचली. जेथें अविरत सुखाची प्राप्ति होईल अशा एखाद्या लोकी मृत्यूनतर आपण जाऊ शकू असें त्यांस वाटलें. अशा रीतीनें सप्तस्वर्गाची कल्पना प्रथम उदयास आली. या ठिकाणीं शरीर आणि मन हीं पूर्णावस्थेस पोंचून केवळ सुखमय जीवित भोगावयास सापडेल आणि आपल्या पूर्वजासहित येथें आपणांस राहाता येईल असें त्यास वाटलें, पण या प्रश्नाचा विचार तत्त्वदृष्टया ते करू लागले तेव्हां असल्या कल्पनांतील मूर्खपणा आणि अश-

क्यता हीं ताबडतोब त्याच्या लक्ष्यांत आली स्वर्ग अथवा दुसरा कोणता-ही लोक झाला तरी तो ज्याअर्थी विशिष्टपणानें दाखवितां येतो त्याअर्थी तो समर्याद असला पाहिजे; आणि समर्यादात अमर्याद सुख सापडेल ही कल्पनाच स्पष्ट विरोधात्मक आहे अमुक लोक असे म्हणताच त्याला कालाची मर्यादा उत्पन्न होते. तसेंच त्याला आदि अथवा आरभ उत्पन्न होतो. आणि जेथे आदि आला तेथे त्याचा सख्खा भाऊ अत येणारच. अशा समर्यादांत अमर्याद कसें साठवून राहणार ? अशा प्रकारच्या विचारसरणीनें त्यांचे डोळे उघडल्यानतर स्वर्गादि कल्पनाचा त्याग त्यास अर्थातच करावा लागणार. स्वर्गांत राहणारे देव हे पूर्वजन्मी या पृथ्वीवर मनुष्यच असून स्वत·च्या सुकृतानें स्वर्गांत जाऊन देवरूप झाले या देवत्वातही निरनिराळया जाती आणि कमी अधिक प्रमाणाच्या पदव्या आहेतच. या सर्व देवता स्वर्गसुख भोगल्यानतर क्षीणपुण्य होऊन पुन. मृत्युलोकी येतात असे प्राचीन आर्यांस आढळून आलें.

उदाहरणार्थ, इद्र आणि वरुण ही वस्तुत· विशिष्ट देवव्यक्तींचीं नावें नसून तीं त्याच्या अधिकाराच्या जागेची नावें आहेत. त्याना देवलोकीं जे अधिकार मिळालेले आहेत ते त्याच्या त्या नावानी ओळखले जातात. प्राचीन काळचा इद्र आता नसून हल्लींचा इद्र त्याहून वेगळा आहे. एका इद्राचें पुण्य क्षीण झालें म्हणजे त्याचे पतन होऊन दुसरा अधिकारी मृत्युलोकाहून जाऊन त्याच्या जागीं विराजमान होतो तेव्हा त्याला इद्र ही पदवी मिळते. हीच स्थिति इतर सर्व देवदेवताची आहे. मृत्युलोकीची मनुष्ये पुण्यकर्मानें देवलोकीं जाऊन निरनिराळया अधिकारावर आरूढ होतात. तेव्हां त्यास त्या त्या अधिकाराची निदर्शक अशी देवाची नावे मिळतात, पण या देवासही मृत्यूने सोडलेलें नाहीच अगदीं आरंभीचा जो ऋग्वेद त्यात देवांना अ-मर अशी सज्ञा लागलेली आढळते, पण त्यानतरच्या श्रुतिग्रथात या सज्ञेचा मागमूसही कोठें आढळणार नाही. कारण अमरत्व हें काल आणि स्थल यांनीं मर्यादित असू शकणार नाहीं आणि देह कितीही सूक्ष्म तत्त्वाचा झाला तरी कालस्थलानें तो मर्यादित असल्यामुळें तो कधींही अमर होऊ शकणार नाहीं ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली. देवांचा देह कितीही सूक्ष्म असला तरी त्याला आरंभ हा असणारच. आणि तो ज्याअर्थी कांहीं वस्तूचाच बनणार

त्याअर्थी त्याला मर्यादा असलीच पाहिजे. आकार म्हटला कीं त्याला स्थल-मर्यादा आलीच. स्थल मर्यादा अथवा स्थल-निर्देश नाहीं अशा कोणत्याही आकाराची कल्पना करून पहा. अशी कल्पना करता येणे अशक्यच आहे. आकार म्हटला कीं त्याबरोबर स्थलही येणारच, आणि स्थल या वस्तूत प्रत्येक क्षणी बदल होत असतो. स्थल आणि काल ही दोन्ही मायेच्या मर्यादेंत आहेत याकरिता अशा प्रकारच्या देवता अस्तित्वात असल्याच तर आमच्या येथले कायदे त्यानाही लागू असलेच पाहिजेत पुन्हां मृत्यू आणि पुन्हा जन्म हें रहाटगाडगें ज्या कायद्याच्या अनुरोधानें येथे अखड चालू आहे तो कायदा देवांसही अवश्य लागू असला पाहिजे जें जन्माला आलें ते मरतेच, आणि याकरिताच स्वर्गादि लोक झाले तरि तेही मायेच्या राज्यातलेच असल्यामुळे तिच्या कायद्याची अमलबजावणी तेथेही होतेच.

कोणतेही ऐहिक सुख पाहिले तरी त्याबरोबर त्याच्या छायेप्रमाणें दु खही असतेच असा या जगात आपणांस अनुभव येतो. जीविताबरोबर मृत्यु ही त्याची पडछाया आहे. ही जोडी अशीच निरंतर रहावयाची, कारण त्या परस्परात काही विरोध नाही, एवढेच नव्हे तर त्या दोहोंस एकमेकापासून अगदीं भिन्न असे अस्तित्वही नाही, एकाच वस्तूची तीं दोन अगे आहेत. याकरितां जीवित आणि मृत्यु, सुख आणि दु ख व चागलें आणि वाईट अशा जोड्या कायमच्या आहेत. सुख आणि दु ख या दोन स्वतत्र वस्तु असून त्याचे अस्तित्व जोडीने एकसारखें चाललेलें आहे ही कल्पना अगदीं उघडपणें मूर्खपणाची आहे. एकाच वस्तूची ही दोन वेगवेगळीं व्यक्तरूपें असून एका वेळीं चागलें आणि दुसऱ्या वेळी वाईट असे त्या वस्तूचे रूप दिसत असते सुख आणि दु ख याची भिन्न जात नाही हीं दोन्ही एकाच कुळात जन्मास आलेली आहेत; त्यातला फरक फक्त परिमाणातला मात्र आहे. आपल्या शरिरांत ज्ञानततूचे जें जाळें पसरले आहे ते सुख आणि दु·ख यांच्या भावना सारख्याच प्रमाणानें वाहून नेत असते. या ज्ञानततूना काहीं दुखापत झाली तर आपलें वहनाचे कार्य ते टाकून देतें आणि सुख अथवा दुःख यांपैकी कोणत्याच सवेदनेची जाणीव आपणास होत नाहीं. एखाद्या मज्जाततूला पक्षाघात झाला तर त्या ततूच्या द्वारें जी सुखसवेदना पूर्वी आपणास मिळत असे ती मिळेनाशी होते आणि त्याचप्रमाणें दु खसवे-

दनाही आपणास कळत नाही. त्याचप्रमाणें एकच गोष्ट परिस्थितीमुळें आपणांस सुखदायक आणि दु.खदायकही होत असते. बाल्यदशेंत सुखकर वाटणाऱ्या वस्तु तारुण्यांत दु खदायक होतात आणि तरुणपणाचीं सुखें म्हातारपणीं कष्टप्रद होतात. एखादा देखावा एकाला सुखदायक वाटत असतां दुसऱ्याच्या ठिकाणीं तोच दु.ख उत्पन्न करतो. मास खाणाराला आनद होतो पण ज्या जनावराचा जीव जातो त्याला दु ख होत असतें. सर्वांना सारखेंच सुख देईल अशी एकही वस्तु आजपर्यंत या जगात उत्पन्न झालेली नाहीं. यामुळें सुखी आणि दु खी अशीं माणसें जगांत जोडीनें आढळून येतात. प्राचीन काळापासून आजपर्यंत हें जग असेंच चालत आलें आहे आणि पुढेही ते तसेच चालू राहणार. यावरून सुख आणि दुःख या दोन्ही प्रत्येकी स्वतत्र वस्तू नसून एकाच वस्तूचीं तीं दोन अगें आहेत असें सिद्ध होते आता यावरून बोध काय घ्यावा ? बोध हाच की या जगात पूर्ण सुख असें कधीही प्राप्त होणार नाही. त्याचप्रमाणें शुद्ध दुःखालाही येथे अस्तित्व असावयाचे नाहीं. पूर्ण सुखाची प्राप्ति या जगांत होणें शक्य नाहीं हें ऐकून तुम्हापैकी काही जणांची मोठी निराशा झाली असेल आणि कांहीं जणाची छातीही धडधडू लागली असेल; पण मी तरी काय करू ? माझें हें म्हणणें खोटे आहे असे कोणी सिद्ध करून देईल तर तें परत घेण्यास मी केव्हाही तयार आहें. पण तसें जोवर कोणी सिद्ध करून दिले नाही तोपर्यंत मला जें खरे वाटतें ते बोलल्याशिवाय गत्यतर नाहीं.

सुखदु खासंबधी जें विवेचन येथवर मीं केलें त्याविरुद्ध एक सामान्य आक्षेप नेहमी ऐकू येत असतो आणि हा आक्षेप निरुत्तर करणारा आहे असें बाह्यतः वाटते. तो आक्षेप असाः—आपण सर्व उत्क्रमणाच्या स्थितींत आहों. उत्क्रमण होत असता आपणाभोंवती जें कांही वाईट म्हणून दिसतें त्याचें हळूहळू उच्चाटन होत आहे आणि त्याच्या उच्चाटनाची ही क्रिया लक्षावधि वर्षें चालली तर सर्व वाईट नाहींसें होऊन चांगलेंच तेवढें शिल्लक उरण्याचा काळ येईल हें उघड आहे. बाह्यतः हा सिद्धात मोठा मनोरम दिसतो, आणि हा खरा असता तर किती बरें होते ? पण यांत एक भ्रमाचे स्थान आहे. चांगलें आणि वाईट या दोन्ही सत्यवस्तु असून त्या परस्परापासून अगदीं अलग आहेत असें वाटणें हा भ्रम होय. वाईट म्हणून अमुक एक वजन-

मापाची जणू काय वस्तूच आहे असें या सिद्धातांत तुम्ही गृहीत धरल्या-सारखें दिसते या परिमित वस्तूचा थोडा थोडा भाग रोज नाहींसा होत असतो असेही तुम्ही गृहीत धरतां. यामुळें दु ख ही वस्तु एके दिवशी पूर्ण-पणे नाहीशी होऊन सुख मात्र शिल्लक उरेल असा भ्रम तुम्हास होतो; पण वस्तुस्थिति अशीच आहे काय ? जगाच्या इतिहासाकडे पाहिलें असतां या प्रश्नाचें उत्तर 'नाहीं' असेच द्यावें लागतें. चागले ज्याप्रमाणें वाढत आहे त्याचप्रमाणे त्याबरोबर वाईटही वाढत आहे असा प्रत्यक्ष अनुभव प्रत्यही येतो. अगदीं रानटी मनुष्याचें उदाहरण घ्या. तो अरण्यात राहतो सुखाची त्याची भावना अगदीं अल्प असते आणि त्याच प्रमाणाने त्याच्या ठिकाणीं दु खाची जाणीवही कमी असते त्याला शारीरिक दु ख मात्र जाणवते त्याला खायला भरपूर न मिळालें तर त्याला दु ख होते, पण भरपूर अन्न आणि वाटेल तिकडे भटकण्यास व शिकार करण्यास पूर्ण मुभा एवढे मिळालें कीं त्याचें सुख पूर्ण होते. त्याचें सुख ज्याप्रमाणें जड इद्रियात मात्र असते त्याचा प्रमाणें त्याच्या दु.खाची व्याप्तीही जड इद्रियापलीकडे असत नाहीं. आतां त्याची उत्क्राति होऊन तो लिहिणें वाचणें शिकला असें समजू. ग्रथांच्या वाचनानें त्याला त्याच्या ज्ञानांत वाढ झाली, त्या मानानें त्याचें सुखही वाढलें, त्याचें बुद्धिवर्धन झालें आणि केवळ जड इद्रियात गुतलेली त्याची सुखाची भावना बुद्धींत येऊन तो बौद्धिक सुख उपभोगू लागला अशा स्थितीत एखाद्या सुदर काव्याच्या वाचनानें त्याला आनद होईल. गणिताचे एखादें कोडें सोड-विण्यांत त्याचें चित्त पूर्ण गुतून जाईल; पण या वाढीबरोबरच त्याच्या मज्जात-तूची वाढ होऊन दु.खाच्या सूक्ष्म प्रवाहांची जाणीव ते वाहून नेऊ लागतील. ज्या दु.खाची जाणीव शुद्ध रानटी मनुष्याला कधींच व्हावयाची नाहीं त्या दु.खाची जाणीव त्याला होऊ लागेल. एक साधें उदाहरण घ्या; तिबेटात विवाह-पद्धति अस्तित्वात नाहीं. स्त्रीपुरुषाच्या व्यवहाराला तेथे कोणतेंही बंधन नाहीं आणि या बाबतींत मत्सराचाही तेथें अभाव आहे, तथापि विवाह-संस्थेचें पावित्र्य किती आहे हें आपण सारे जाणतोंच. वैवाहिक पावित्र्यात किती सुख आहे याची कल्पना तिबेटी लोकांना नाही. तिची जाणीवसुद्धां त्याच्या ठिकाणी नाहीं. आणि त्याचप्रमाणें भ्रष्ट नवरा अथवा भ्रष्ट बायको यांपासून जें अनिवार दुःख होते त्याचीही जाणीव त्यांना नाहीं. अशा

रीतीनें वैवाहिक पावित्र्यापासून सुखाची वाढ होत असतां दुसऱ्या बाजूनें दुःखाचीं बीजेंही पेरलीं जात असतात.

तुमचा हा इंग्लड देश सर्व जगात अतिशय श्रीमत आहे. येथल्यासारखी चैन जगात दुसऱ्या कोठही आढळावयाची नाही, पण याच इंग्लड देशात दु:खाचे मापही किती भरपूर आहे याचा विचार करा. इंग्लडांतल्या इतके वेडे जगात दुसऱ्या कोठेंही आढळावयाचे नाहीत. सुखोपभोगाची तीव्रातितीव्र इच्छा होऊन ती पुरी न झाली तर वेड लागणें अगदी स्वाभाविक आहे. अमुक एका विशिष्ट दर्जानें प्रत्येक मनुष्यानें राहिले पाहिजे असें तुमच्या सामाजिक पद्धतीने जणू काय ठरवूनच टाकलें आहे. तुमच्या समाजानें घातलेला हा निर्बंध पाळावयास इतका पैसा लागतो कीं तेवढा हिंदुस्थानांतल्या एखाद्या मनुष्यास मिळाला तर स्वतःला तो कुबेर समजेल अशा स्थितींत "बाबारे साधेपणें राहावे" हा तुमचा उपदेश त्याला ढोंगीपणाचा वाटणार नाहीं काय? तुमच्या आजूबाजूचा आचार पाहून आपणही इतरांसारखेच असावें असे त्याला स्वाभाविकपणें वाटते. तशा प्रकारच्या राहणीस लागणारा पैसा मिळविण्यासाठीं तो धडपडत असतो. त्याच्या धडपडींत त्याला यश येतें कीं अपयश येतें याचा विचार समाज करीत नसतो. समाज आपल्या आखीव मार्गानें चालत असतो आपल्या रथाच्या चक्राखालीं कोण चुरडत आहे अथवा कोण लगडा होत आहे याचा विचार समाज करीत नाहीं. कांही झालें तरी सर्व घटकाची राहणी एकसारखीच असावी ही समाजाची इच्छा कमी होत नाहीं हीच स्थिति सर्वत्र चालू आहे. सुखोपभोगाची तुमचीं इंद्रियें अधिक तीव्र आणि सूक्ष्म झालीं आहेत; तुमची समाजरचना इतर पुष्कळ समाजाहून अधिक सुदर आहे त्याचप्रमाणें सुखोपभोगाच्या तुमच्या साधनातही वाढ झाली आहे, पण या वाढीबरोबरच सुखोपभोगाचीं ती साधनें ज्यास प्राप्त होत नाहींत असे लोकहि वाढत आहेत आणि या कारणानें सुखाच्या वाढीबरोबरच दुःखाचीही वाढ होत आहे. ज्या समाजांना सुखाचीं साधनें कमी आहेत त्याच्या ठिकाणीं दु.खाची जाणीवही अर्थातच कमी प्रमाणावर आहे. आपला हा बुद्धिवाद अशाच रीतीनें आणखीही पुढें चालविता येईल. मुद्याची गोष्ट ही की, तुमच्या डोक्यातली सुखाची कल्पना जो जो अधिक उच्च तों तों दुःखाची तुमची

जाणीवही अधिक तीव्र असावयाची सुख आणि दु ख हीं एकमेकाच्या छायेप्रमाणें आहेत. जगातलें वाईट कमी होत आहे हें तुमचें म्हणणें खरें असेल तर त्या मानानें सुखही कमी होत आहे हे तुम्ही निश्चयानें समजा. तत्त्वदृष्टि सोडून केवळ लौकिक दृष्टीनेंच बोलावयाचें म्हटले तर केवळ दु खाचीच वाढ झपाट्यानें होत असून त्यामानाने सुख कमी होत आहे असेंही मी म्हणेन **'सुख पाहतां जवापाडें । दु·ख पर्वताएवढे ।'** हा अनुभव मात्र खरोखर येऊ लागला आहे. सुखाची वाढ एकपट होत असेल तर दुःखाची वाढ शतपट होत आहे माया म्हणतात ती हीच. हा आशावाद नाही अथवा नैराश्यवादही नाहीं. हे शुद्ध सत्यवस्तुकथन आहे. हें जग निव्वळ दु खानें भरलेलें आहे असे वेदाताचें मत नाहीं. कारण तसें म्हणणे वस्तुस्थितीस सोडून होईल. त्याचप्रमाणें हें जग शुद्ध-मगलरूप आणि सुखदायी आहे असे म्हणणेंही चुकीचें आहे. तेव्हां या जगाचें अमुक एक रूप आहे असे निश्चितपणे सांगणें चुकीचें होईल. जग सुखमय आहे अशी स्वप्ने आपणास पडत असतात पण अखेरीस तीं स्वप्नेंच ठरतात. तथापि एखाद्या मनुष्याला येथे फार कष्ट भोगावे लागले असें दिसलें तर तेवढ्यावरून हें जग वाईट आहे असें म्हणणेंही चुकीचें होईल. जगाचें रूप दोन प्रकारचें आहे त्यांत चागले आहे आणि वाईटही आहे. त्याला अशा प्रकारचें द्विधा रूप आहे आणि त्यात चागल्या व वाईट अशा दोन्ही वस्तू भरल्या आहेत, म्हणून आपणांस अनेक प्रकारचे अनुभव त्यांत येतात. वाईट आणि चागले ही दोन भिन्न आणि स्वतत्र रूपें आहेत असें समजू नका. एकच वस्तु निरनिराळ्या स्वरूपानें आपणापुढें आली तर तितकीं भिन्न रूपें आपणास भासतात आणि त्यापासून निरनिराळ्या प्रकारच्या भावनाही आपल्या चित्तात उत्पन्न होतात. एकाच वस्तूचे एखादें रूप सुखदायक वाटत असता त्याच वस्तूचे दुसरें एखादें रूप आपणास दुःखदायक होत असतें. याकरिता अनेक रूपांनीं भासणाऱ्या या वस्तूचे मूळरूप काय आहे याचा शोध लावा असे वेदात तुम्हास सागतो. जें एकरूप अनेकविध प्रकारांनीं नटलेलें आढळते ते मूळरूप कोणते याचा शोध लावणें हें वेदांताचें पहिलें अगीकृत कार्य आहे. जगाचे दोन निर्माणकर्ते असून एक फक्त चांगल्या वस्तू निर्माण करतो आणि दुसरा नुसत्या वाईट वस्तु निर्माण करितो अशी प्राचीन

इराणी लोकांची समजूत होती. ही उपपत्ति किती मूर्खपणाची आहे हें कोणासही उघड दिसून येईल. जगांत दोन परमेश्वर असते तर सृष्टीच्या प्रत्येक कायद्याला एक चांगला आणि एक वाईट असे दोन भाग आहेत असें म्हटलें पाहिजे. अशा रीतीनें हे दोन परमेश्वर एकाच सृष्टीत परस्परांविरुद्ध वर्तन करीत असतांही दोघात ऐक्य राहू शकतें आणि जग सुरळीत चालूं शकते हें नवल नव्हे काय? हें मत इतके मूर्खपणाचें आहे तरी त्याच्या पोटीही एक तत्त्व आहे. जगाचे स्वरूप अशा रीतीने दोन प्रकारचें आहे हें या मताने दर्शविलें आहे त्याच्या माडणीचा प्रकार गांवढळपणाचा असला तरी त्यांतील मुद्दा घेण्यासारखा आहे आतां याहून अधिक उच्च दर्ज्याचे म्हणविणारे तत्त्ववेत्ते असे म्हणतात कीं हें जग काहीं अशीं चांगलें आणि कांहीं अशी वाईट आहे. आताच सागितलेल्या विचारसरणीनें हे मतही अगदी निकामी ठरते. ज्या सृष्टीच्या कायद्याने आपणास अन्न मिळून आपलें प्राणरक्षण होतें त्याच कायद्यानें अपघात घडून हजारों जीवांचा सहारही होतो.

यावरून या जगाला केवळ दु खाचें अथवा केवळ सुखाचें असें निश्चित स्वरूप नाहीं हें आपल्या लक्ष्यांत येईल. यांत सुखदु खाचे मिश्रण आहे; आणि ज्या ज्या वेळीं आपणास दु ख होते त्या त्या वेळीं त्यात सृष्टीचा कांही दोष नसून अपराधाचें सारें माप आपल्याच पदरात कसें पडतें याचाही विचार आपण पुढें करू. अशा रीतीनें सृष्टीच्या स्वरूपाचा निश्चय करीत असता त्यांतून बाहेर पडण्याचा मार्गही वेदांताने दाखविला आहे. जगांत दु ख नाहींच असें वेदाताचें म्हणणें नाहीं. जग आहे तसे घेऊन वेदांतानें त्याचे पृथक्करण धीटपणें केले आहे. त्यातील कांहीं भाग लपवून ठेवण्याची अथवा वस्तुस्थितीचा विपर्यास करण्याची त्याची इच्छा नाहीं. वेदांत नैराश्यवादी नाही अथवा संशयवादीही नाही. या सृष्टीच्या कायद्यातून बाहेर पडण्याचा निश्चित मार्ग त्याने दाखविला आहे, तथापि असें करताना शुद्ध बुद्धिवादाचा आश्रय त्यानें केला आहे. तुमच्या डोळ्यात धूळ फेंकून तुमची चकभूल करावी अशी त्याची इच्छा नाहीं, अथवा तुमच्या तोंडांत बोळा घालून ते बद करावे असेही तो करीत नाही. मी लहान असतां माझ्या शेजारचा एक गृहस्थ मरण पावला. त्याला एक तरुण मुलगा होता आणि त्याच्या आंगावर साऱ्या कुटुबाचा भार पडला. मरताना त्या गृहस्थानें कांहीं

दौलत मागे ठेविली नव्हती आणि मदत करण्याजोगे काही मित्रही त्याला नव्हते अशा स्थितीत तो तरुण मुलगा एका पाद्र्याकडे गेला आणि आपली सारी हकीगत त्याने त्याला सागितली त्यावर पाद्रीसाहेब म्हणाले, “ मुला, हीसुद्धा परमेश्वराची कृपाच आहे आपल्या बऱ्यासाठीच तो सारे करतो ” अशा रीतीनें मोठ्या जखमेवर सोन्याचा वर्ख लावण्याची ही जुनी पद्धत आहे पाद्रीसाहेबाचे उत्तर ऐकून तो तरुण आपल्या घरीं गेला या गोष्टीला सुमारे सहा महिने लोटल्यानतर त्या पाद्रीसाहेबाला पुत्ररत्नाची प्राप्ति झाली या आनदोत्सवप्रसगी पाद्रीसाहेबानी एक भोजनसमारभ केला आणि त्या प्रसगी आपल्या मित्रमडळीस निमत्रण दिले त्यात त्या तरुणालाही त्याने बोलाविले होते मडळी भोजनास बसली तेव्हा पाद्रीसाहेब हात जोडून म्हणाले, “ परमेश्वरा, तुझ्या या कृपेबद्दल मी तुझा फार आभारी आहे ” इतक्यात तो तरुण मध्येच उठून म्हणाला “ हा, तोड आटोपा, हा तर भयकर दु खाचा प्रसग आहे ! ” “ असे का म्हणतोस ? ” असा प्रश्न पाद्रीसाहेबानी करताच तो तरुण म्हणाला, “ माझे वडील वारून माझ्या घराण्यावर आपत्ति कोसळली तेव्हा ते चागले आहे असे आपण सागितले होते. बाह्यत ते वाईट दिसत असताही आपणास ते चागले दिसले अशाच रीतीने आजचा हा प्रसग बाह्यत सुखकारक वाटत असला तरी वस्तुत तो वाईट असेल ” जगाचे दु ख कमी करण्याचा हा मार्ग नव्हे दु खितावर दया करून तुमच्याने होईल ती मदत त्याना अवश्य करा, पण नुसती साखर पेरून त्याचे दु ख कमी होईल ही कल्पनासुद्धा मनात आणू नका हे जग अशा मार्गानी कधीच बरे व्हावयाचे नाही तसें व्हावयास त्याच्या पलीकडेच गेले पाहिजे

जग हे सुखदु खाचे आणि बऱ्यावाईटाचे मिश्रण आहे ज्या ठिकाणी बरें म्हणून काही दिसते तेथे वाईटही अवश्य येतेच, पण विश्वाच्या व्यक्तदशेचा हा प्रात सोडून आपण पलीकडे गेलो म्हणजे तेथे हे सारे विरोध विराम पावून केवळ एकरूपता अनुभवास येते असे वेदात आपणास सागतो वाईट आणि चागले या दोहोचाही त्याग करा असे वेदात सागतो वाईट आणि चागले ही दोन्ही गेल्यावर शिल्लक काय उरेल ? जे काही उरेल तेच तुमचे खरे स्वरूप–किंबहुना तेच तुम्ही जे स्वरूप चागले आणि वाईट या दोन स्थितीनी आज व्यक्तदशेस येत आहे ते खरे मूळरूप या दोन्ही स्थितीच्या पलीकडे

आपणास सापडेल. या वस्तुस्थितीचा खरा बोध जेव्हा तुम्हास होईल तेव्हाच जग चागले आहे असे म्हणण्याचा अधिकार तुम्हास प्राप्त होईल तोपर्यंत ते चागले आहे असे म्हणणेसुद्धा निव्वळ थोताड आहे या दोन्ही रूपाच्या पलीकडे तुम्ही गेला म्हणजे विश्वावर ताबा चालविण्याचा अधिकार तुम्हास प्राप्त होईल ही नानाविध रूपे दिसेनाशी झाली म्हणजेच तुमचे खरे स्वरूप प्रगट होईल प्रथम तुम्ही स्वत वर ताबा मिळविला पाहिजे असा ताबा मिळवून मायेच्या हद्दीबाहेर जाऊन तुम्हास स्वतत्रता मिळविली पाहिजे. मायेच्या हद्दीबाहेर तुम्ही गेला म्हणजे तुमच्या पायात असलेल्या कायद्याच्या शृखला गळून पडतील जे कायदे आज तुम्हास अभेद्य वाटत आहेत, ते अभेद्य नाहीत असा प्रत्यय तुम्हास येईल सृष्टीच्या अनेक रूपापैकीच कायदा हेही एक रूप आहे. या अनेक रूपास तुम्ही आळा घातला म्हणजे त्याबरोबरच कायद्याचे कायदेपणही नष्ट होईल आज आपण सृष्टीचे गुलाम बनलेले असल्यामुळे ती आपल्या कायद्याच्या शृखलानी आपणास बद्ध करते, पण सृष्टीचे दास आपण कधीच नव्हतो, सध्या नाही आणि पुढेही होणार नाही असा प्रत्यय तुम्हास आला म्हणजे तिच्या शृखलाही नाहीशा होतील. प्रकृतीच्या विस्ताराला कोठे अतच नाही असे आज आपणाला वाटते, पण वास्तविक हा विस्तार अनत नाही त्याला मर्यादा आहे आणि ती मर्यादा इतकी आकुचित आहे की आपल्या स्वत च्या विस्ताराच्या मानाने ती एखाद्या बिदूइतकी भरेल आपला आत्मा हा समुद्रासारखा म्हटला तर प्रकृतीचा सारा विस्तार त्या समुद्रातल्या एका बिदूसारखा आहे आपला विस्तार तारे, सूर्य आणि चद्र याच्याही पलीकडे आहे आपण स्वत अनतरूप असून आपल्या विस्तारावर हे सारे बुडबुडे उठलेले आहेत अशा प्रकारचा अनुभव जेव्हा तुम्हास येईल तेव्हा बरे आणि वाईट या दोहोवरही तुमचा अधिकार चालेल असे झाले म्हणजे साप्रतचा सृष्टीचा देखावा समूळ बदलून जाऊन एक नवाच देखावा तुम्हापुढे उभा राहील तो पाहून तुम्ही म्हणाल, " सृष्टीचा चागुलपणा किती सुदर आहे ? आणि तिचा वाईटपणाही किती मनोहर आहे ? "

वेदाताने तुम्हास जे काही शिकविले आहे ते हेच. जखमेवर वर्ख चिकटवून आतली घाण झाकून टाकण्याचा यत्न त्याने केलेला नाही जखम

सडत गेली तर सोन्याची अधिक अधिक पुटे तो देत नाही. जगात दु ख आहे हा अनुभव आपणास नित्य जाणवत आहे तो नाहीच असे म्हणून स्वत चे डोळे मिटण्यात काय हाशील आहे ? असे न करता धैर्याने त्याला तोंड देऊन, त्याच्याशी दोन हात करून आणि त्याला तुडवून पुढे सरणे हेच खऱ्या मर्दाचे काम आहे हा मार्ग वज्रासारखा कठीण आहे हे खरे, तथापि आपला आत्मा त्याहूनही अधिक कठीण असल्यामुळे केव्हाना केव्हातरी या वज्राचा भग तो केल्यावाचून राहाणार नाही "जो त्या एकाला विश्व या अनेक रूपानी पाहातो, तो मृत्यूच्या फेऱ्यात पुन पुन्हा सापडतो याकरिता हें अनेकत्व सोडून एकत्व पहा आणि मुक्त व्हा" या श्रुतीच्या उपदेशाचे इंगित आता तुमच्या लक्षात आले असेलच

आता हे साधावयाचे कसे ? आपले मन पाहिले तर ते अत्यत भ्रमिष्ट, दुर्बल आणि कोणाऱ्याही मागे धावणारे आहे, पण असे आहे तरी याच मनाला अशी दृढता आणता येईल की, तीमुळे त्या एकरूप ज्ञानरवीचा एखादा किरण तरी ते पकडू शकेल असा एखादा किरण त्याने धरला तरीसुद्धा "**पुनरपि जननं पुनरपि मरणम्**" या रहाटगाडग्यातून आपण सुटू पर्वताच्या मस्तकावर पाऊस पडला म्हणजे तो निरनिराळ्या प्रवाहाच्या रूपाने त्या पर्वताच्या चारी बाजूस धाव घेतो. त्याचप्रमाणे ते एकरूप अनत प्रवाहानी या विश्वात राहात आहे हे अनत प्रवाह सोडून त्या मूळच्या एकरूपाकडेच तुम्ही जा मायारूप पर्वताच्या शिखरावर पडल्यामुळे हा मूळचा एक प्रवाह लक्षवधि रूपानी विदीर्ण होऊन तुम्हास दिसत आहे या लक्षावधि रूपाच्या मागे धावू नका जेथे काही हालचाल म्हणून आहे तेथे त्या हालचालीत तो आहे सर्व विश्व तो भरून राहिला आहे यज्ञात तो आहे, तो पुरुषात आहे, पशूत आहे, पाण्यात आहे आणि सत्यातही आहे अग्नि पेटला म्हणजे अनेक शिखानी जसा तो व्यक्त होतो, त्याचप्रमाणे हा एक व्यक्त होत असता अनेक रूपे धारण करतो वायू व्यक्तत्वास येऊ लागला म्हणजे जसा अनेक झुळुकानी प्रकट होतो, त्याचप्रमाणे सर्व आत्म्याचा तो एक आत्मा अनेक रूपानी व्यक्त झाला आहे श्रुतीचे हे म्हणणे आज आपल्या दृष्टीने खरे वाटत नाही, पण त्या एकरूपाचे दर्शन आपणास झाले म्हणजे या वचनाचे सत्यत्व आपल्या प्रत्ययास येईल, पण

तसें होईपर्यंत मात्र त्याचे खरेपण आपणास अधुक वाटेल आता येथे आणखीही एक प्रश्न उद्भवण्याचा सभव आहे तो प्रश्न असा—तुम्ही म्हणता त्याप्रमाणे तो एकच आत्मा सर्वत्र भरला असेल आणि तो पूर्ण पवित्र असेल तर त्याला दु ख होते हे कसे ? तो अपवित्र होतो आणि दु ख भोगतो असे आम्ही प्रत्यही पाहतों. यावर उपनिषद्ग्रथ उत्तर देतात, "तो अपवित्र होत नाही आणि दु खही भोगीत नाही सूर्य हा सर्वांच्या दृष्टीचे कारण असता एखाद्याचा डोळा फुटल्यामुळें जसा आधळा होत नाही, त्याचप्रमाणे देहाच्या क्लेशाचा लेप आत्म्याला होत नाही" मला काविळीचा रोग झाला तर सारे जग मला पिवळे दिसू लागते, पण त्यामुळे सूर्याला काही कमीपणा येतो काय ? "ज्या सत्पुरुषाना आत्मलाभ होतो त्यानाच अखड शातिही मिळते, दुसऱ्या कोणालाही ती प्राप्त होत नाही—ती प्राप्त होत नाही क्षणोक्षणी बदलणाऱ्या या जगात ते कधीही न बदलणारे रूप जो पाहातो, मृत्यूच्या या साम्राज्यात त्या एका चिरजीविताचा अनुभव ज्याला होतो, या अनेकत्वात एकता ज्याला दिसते आणि सर्व आत्म्याचा आत्मा तोच आहे असा प्रत्यय ज्याला येतो, त्यालाच चिरशातीचा लाभ मिळतो, दुसऱ्या कोणालाही ती प्राप्त होत नाही—ती प्राप्त होत नाही बाह्य जगात त्याला कोठे शोधावे ? त्याला सूर्यात चद्रात किंवा ताऱ्यात शोधावे ? ज्या ठिकाणी तो प्रकाशतो तेथे सूर्यप्रकाशाचा पाड लागत नाही तेथे चद्र, तारे अथवा विद्युत् याचा प्रकाश उपयोगी पडत नाही मग जगात आढळणाऱ्या दीपाचे तेथे काय चालणार ? त्याच्या प्रकाशाने या सर्व वस्तू प्रकाशतात या साऱ्या वस्तूनी आपला प्रकाश त्याजपासूनच घेतला आहे किंबहुना या वस्तूच्या द्वारे तोच प्रकाशत आहे" या ठिकाणी आणखीही एक सुदर उपमा घेता येईल हिंदुस्थानात होणारी वडाची झाडे तुम्हापैकी काही जणानी पाहिली असतील मुख्य झाड एका मुळातून निघते आणि नतर शाखाच्याद्वारे त्याचा विस्तार कितीतरी पसरतो हे मूळ एकरूप वडाच्या झाडासारखें आहे ते एक रूप मूळ वृक्षासारखे असून तोच मूळ वृक्ष पसरत पसरत विश्वरूप झाला आहे त्याचा विस्तार कितीही मोठा झाला तरी त्या विस्तारातील प्रत्येक शाखा आणि-उपशाखा या मूळ वृक्षाशी अन्योन्य सबधाने जोडली गेली आहेत.

स्वर्गादि लोकाची वर्णने श्रुतीपैकी ब्राह्मण ग्रथात आढळतात, पण उपनिषद्ग्रथात स्वर्गादि लोकाच्या कल्पनास वाव नाही. उपनिषदात शुद्ध

तत्त्वज्ञान सांगितलें आहे. सुखाची वस्ति स्वर्गांत अथवा दुसऱ्या कोणत्याही लोकांत नसून ती आत्म्यांत आहे. त्याचा वास स्वर्गांत अथवा दुसऱ्या कोणत्याही लोकांत असला तरी त्यामुळें तो सुखी होतो असें नाहीं. पितृलोकांत सत्याचा अधुक प्रकाश मात्र दिसतो, असें श्रुतिवचन आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांत वस्तूचा बोध आपणास अस्पष्टपणें होत असतो, त्याचप्रमाणें पितृलोकांत सत्यानुभव अस्पष्ट होतो. गंधर्वलोकांत हा अनुभव त्याहून अधिक अस्पष्ट होतो. सर्वांत अत्युच्च लोक म्हणजे ब्रह्मलोक अशी हिंदूंची कल्पना आहे, तथापि या लोकांतही सत्यानुभव अगदीं स्पष्ट होत नाहीं. इतर लोकांपेक्षां येथला अनुभव जरा अधिक स्पष्ट असतो इतकें मात्र खरें. मनुष्याला स्वतःचा चेहरा आरशांत जसा पूर्ण, स्पष्ट आणि स्वच्छ दिसतो, त्याचप्रमाणें स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणीं सत्याचा प्रकाश पूर्ण स्वच्छ आणि स्पष्ट दिसतो. याकरितां अत्युच्च प्रतीचा लोक म्हटला म्हणजे आपला आत्मा हाच होय. पूजा करण्यास योग्य आणि सर्व जगांत श्रेष्ठ असें मंदिर मनुष्याचा आत्मा हेंच होय, कारण, आत्म्याच्या ठिकाणीं सत्यप्रकाशाचा अनुभव जसा पूर्णपणें येतो, तसा तो कोणत्याही स्वर्गांत अथवा दुसऱ्या कोठल्याही लोकांत येत नाहीं. नुसत्या जागा बदलण्यानें सुखाची प्राप्ति आपणास होते असें नाहीं. हिंदुस्थानांत असतां मला असें वाटे कीं, एखाद्या गुहेंत आत्मानुभव स्पष्ट होईल, पण अनुभव अगदीं वेगळा आला. पुढें अरण्यांत लौकर अनुभव येईल असें वाटूं लागलें, नंतर काशीवासाची योग्यता अधिक वाटूं लागली, पण पळस कोठेंही गेला तरी त्याला पानें तीनच. आपण आपल्या मनानें आपल्या भोंवतालचें जग उत्पन्न करीत असतो आणि त्यांत सुखदुःखादिकांचा अनुभव घेत असतो. जग उत्पन्न करण्याचा मनाचा हा धंदा जोंपर्यंत बंद पडलेला नाहीं, तोंपर्यंत त्याला कोठेंही नेऊन ठेवलें तरी शेवटीं परिणाम एकच. मी स्वतः दुष्ट असलों तर सारें जग मला दुष्ट दिसूं लागतें. मी मरून स्वर्गास गेलों तरी मी दुष्ट असल्यास तो स्वर्गलोकही मला दुष्ट दिसेल. याकरितां गुहेंत राहणें, अरण्यांत जाणें, काशीवास पत्करणें अथवा स्वर्गलोकांत राहणें, हीं सारीं वस्तुतः एकाच किंमतीचीं आहेत. माझ्या अंतःकरणाचा आरसा घांसून पुसून मी स्वच्छ केला, तर मी कोणत्याही स्थलीं असलों तरी त्यांतलें प्रतिबिंब सारखेंच स्पष्ट

दिसेल याकरिता धावाधाव करून आपल्या उमेदीचा अपव्यय करणे रास्त नाही यापेक्षा त्या उमेदीचा आणि शक्तीचा उपयोग आपला आरसा स्वच्छ करण्याकडे लावावा हे अधिक बरे जड नेत्राना तो कोठेही दिसणार नाही फक्त शुद्ध मनातच त्याचे प्रतिबिंब पडेल आणि तुम्ही मुक्त व्हाल

गेल्या उन्हाळयात राजयोगावर झालेल्या व्याख्यानास तुम्हापैकी काही जण हजर असतील राजयोगात आणि साप्रत आपण विवेचन करीत असलेल्या ज्ञानयोगात बरेच अतर आहे, हे त्यांच्या लक्षात आले असेलच ज्ञानयोगात इद्रियाचे आकलन हे एक प्रमुख साधन आहे इद्रिये गुलामासारखी आपल्या ताब्यात आली आणि मनावरची त्याची सत्ता पूर्णपणे नाहीशी झाली म्हणजे आपले साध्य सिद्ध होते अत.करणातील साऱ्या पोकळ आशा पूर्ण नाहीशा झाल्या म्हणजे हाच मर्त्य जीव अमर होतो तो ईश्वराशी एकरूप होतो अत करणातील सर्व ग्रथी सुटून ते मोकळें झाले म्हणजे याच लोकी आणि याच देहात मनुष्य ब्रह्मानदाचा अनुभव घेतो

वेदात आणि पूर्वेकडील इतर धर्मपथ याविषयी आणखीही चार शब्द सागणे अवश्य आहे वेदात आणि पूर्वेकडील इतर धर्म लाकिकाचा अथवा व्यवहाराचा विचार अगदी बाजूस सोडून आपली नजर त्याच्या पलीकडच्या प्रातात मात्र पोचवितात असा एक आक्षेप नेहमी ऐकू येत असतो ही कल्पना साफ चुकीची आहे आम्हा पौर्वात्याच्या विचारसरणीचे यत्किंचित्‌ही ज्ञान ज्यास नाही अशा अज्ञलोकाचा हा आक्षेप आहे आमच्या तत्त्वज्ञानाचे रहस्य जाणण्याइतकी त्याच्या बुद्धीची परिपक्क दशा नाही याकरिता असल्या बुद्धिशून्य आक्षेपकाच्या बोलण्याकडे लक्ष पुरवू नका अशा प्रकारे धर्मप्रसार करावा अशी आमच्या श्रुतीचीही अनुज्ञा आम्हास नाही ऐहिक विचार सोडून केवळ परलोकाचा विचार करावा असे आमच्या तत्त्वज्ञाचे मुळीच म्हणणे नाही उलट तुम्ही कोठेही गेला तरी तेवढ्यानेच तुम्ही सुखी होणार नाही असेच ते सागतात आपण दुर्बळ आहो तोंपर्यंत निरनिराळ्या अनुभवाच्या या पायऱ्यावरून गेल्याशिवाय आपणास गत्यतर नाही, तथापि सत्य म्हणून जें काही आहे ते याच लोकात आहे. ते सत्य म्हणजे मनुष्याचा आत्मा हेच होय आपण कोठेही गेलो तरी कर्मभोग चुकणार नाही

असे आमची शास्त्रे निक्षून सागतात या लोकीची दु खे चुकवावी म्हणून आपण आत्महत्या केली तरीसुद्धा ती दु ख चुकणार नाहीत असे शास्त्रवचन आहे, पण सत्य मार्ग सापडणें हे मात्र फार कठीण आहे आम्ही पौर्वात्य लोकानी व्यवहार सोडला आहे असे नाही तुम्हा पाश्चात्याप्रमाणेच आम्हीही ससारीच आहो, पण ससाराकडे पाहाण्याचा दोघाचा दृष्टिकोण मात्र वेगळा आहे, हे खरे पाश्चात्य मनुष्य म्हणतो, टोलेजग घर बाधावे, सुदर कपडे आगावर घालावे, नानारसयुक्त पक्वान्ने खावी आणि बुद्धीची वाढ करावी. झाले, येथे त्याची उन्नति सपली. जीवित म्हणून जे काही आहे त्याची परिसीमा पाश्चात्याच्या दृष्टीने एवढ्या यादीत सुरू होते या बाबीसबधी तो अतिशय व्यवहारी आहे, पण हिंदू मनुष्य म्हणतो जगाचे खरे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान हेच होय अत सृष्टीचे ज्ञान झाल्यावाचून बाह्यसृष्टीचे ज्ञान निरर्थक आहे. याकरिता अत सृष्टीत रममाण होण्याचा यत्न तो करीत असतो. अमेरिकेत एक सशयवादी होता हा मोठा दिलदार आणि सच्छील मनुष्य होता. तसेच तो मोठा वक्ताही होता धर्माचे ज्ञान इहलोकी उपयोगाचे नाही अशा अर्थी तो भाषणे करीत असे एके वेळी बोलता बोलता तो म्हणाला, “ इहलोक हा एखाद्या नारिंगासारखा आहे शक्य तेवढा त्यातला रस पिळून घेणें हे आपले पहिले कर्तव्य आहे ” यावर मी त्याला म्हटले, तुमचे म्हणणे मला अगदी कबूल आहे, पण तुम्हाला जसे नारिंग आवडते, तसा मला आबा आवडतो तुम्ही आपल्या नारिंगाचा रस खुशाल घ्या आणि माझा आबा मला चाख् द्या खावे प्यावे आणि थोडेसे भौतिक शास्त्राचे ज्ञान मिळवावे, एवढ्यानेच तुमचा सतोष होतो, पण तेवढ्याने साऱ्याचाच सतोष होईल असे नाही तुमच्या या यादीने मला मुळीच सतोष होत नाही जर झाडावरून सुटलेले फळ खाली का पडते अथवा माझ्या शरिरातून विजेचा प्रवाह गेला तर मला धक्का का बसतो एवढच मला शिकावयाचे असते आणि यापलीकडचा कोणताही विचार करणे शक्य नाही अशी स्थिति प्राप्त झाली असती तर अशा स्थितीत जगण्यापेक्षा मी मरण पत्करलें असते वस्तूच्या केवळ बाह्य आकारात गुतून राहाण्याची माझी इच्छा नाही मला त्यातले गूढ रहस्य जाणण्याची इच्छा आहे जीविताच्या व्यक्तस्थितीचा अभ्यास तुम्ही करता आणि प्रत्यक्ष जीविताचा

अभ्यास मी करतो अत सृष्टीचा अभ्यास करून या सृष्टीला आणि स्वर्गादि इतर लोकानाहि आपल्या चित्तातून कायमची रजा देऊन टाक असे माझे तत्त्वज्ञान मला सागते हे जग जितपत खरे आहे तितपतच स्वर्गादि लोकही खरे आहेत, तथापि त्या स्वर्गादि लोकानाही आपल्या चित्ता-बाहेर काढण्याची आज्ञा माझ्या तत्त्वज्ञानाने मला दिली आहे व्यक्त-दशेतला जीव आपली परिचर्या कशा रीतीने चालवितो आणि व्यक्त-दशेतल्या वेगवेगळ्या पायऱ्या कशा आहेत एवढे जाणूनच माझे कार्य भागत नाही, तर अत सृष्टीतले व्यापारही जाणून घेण्याची माझी इच्छा आहे प्रत्येक गोष्ट अशी का घडली हे मला समजले पाहिजे ती घडून गेल्यानतर तिची चिकित्सा करणे हे लहान मुलाचे काम आहे ते बाल बुद्धीचे लक्षण आहे भौतिक शास्त्राचा अभ्यास करणे चागलें आहे असे मीही म्हणतो परमेश्वराचा आशीर्वाद त्याच्यावरही असो, पण त्यापली-कडे पाहू नका असे जेव्हा हे शास्त्री मला सागतात, तेव्हा त्याचे हे म्हणणे मूर्खपणाचे आहे असे स्पष्टपणे सागणे मला भाग पडते जीवित का प्राप्त झाले, याच्या कारणाचा शोध करणे आपणास जरूर नाही काय ? जीविताच्या व्यक्तदशेचा अभ्यास तुम्ही करता, पण जीवित म्हणजे काय, असा प्रश्न मी तुम्हास करतो तेव्हा त्याचे उत्तर तुम्हास देता येत नाही. तुम्ही स्वत च्या मार्गाने खुशाल चाला, पण मलाही माझ्या मार्गाने जाऊद्या.

आम्ही हिदुलोक व्यवहारी नाही असा तुमचा आक्षेप आहे, पण हा आक्षेप अगदी चुकीचा आहे. आमच्या परी आम्हीही व्यवहारीच आहो तुम्ही एका दृष्टीने व्यवहारी असला तर आम्ही दुसऱ्या दृष्टीने व्यवहारी आहों इतकेच **‘ पिंडे पिंडे मतिर्भिन्ना ’** हा सिद्धात आपण नेहमी लक्षात ठेविला पाहिजे तू एकाच पायावर उभा राहशील तर सत्य वस्तूची भेट तुला अवश्य होईल असे एखाद्या हिदूला कोणी सागितले तर सारा जन्म एका पायावर उभा राहाण्यास तो कबूल होईल एखाद्या हजारो मैलावरच्या रानटी मुल-खात एक सोन्याची खाण आहे असे तुम्हास कोणी सागितले तर तुम्हापैकी हजारो जण तेथल्या अडचणीस भीक न घालता तिकडे धाव घेतील आणि या हजारोपैकी कदाचित् एखाद्यालाच सोन्याची प्राप्ति झाली तर होईल. मनुष्याला आत्मा आहे वगैरे आध्यात्मिक गोष्टी याच हजारो लोकाच्या

कानावरून पुष्कळ वेळा गेल्या असतील, पण असल्या गोष्टीचा विचार त्यानी आपल्या पाद्मावर सोंपविला आहे. एखाद्या रानटी मुलखात जाण्यास हिंदू मनुष्य तयार व्हावयाचा नाही रानटी मनुष्याची त्याला फार भीति वाटेल, पण एखाद्या उच्च पर्वताच्या शिखरावर कोणी महायोगी बसला आहे अशी बातमी त्याने ऐकली, तर वर चढताना आपण पडून मरू की काय हा विचार-सुद्धा न करता त्या पर्वतशिखराकडे तो धाव घेईल तुम्हापुढे हे जे दोन नमुने मी माडले, यातला कोणता नमुना तुम्हाला व्यवहारशून्य वाटतो ? जो तो आपापल्यापरी व्यवहारीच नाही काय ? जगाकडे जो ज्या दृष्टीने पाहतो त्या दृष्टीने तो आपला व्यवहार करीत असतो लौकिक जीवित हेच जीवितसर्वस्व आहे असा तुमचा समज आहे, यामुळे इद्रियजन्य सुखाच्या मागे तुम्ही हात धुवून लागता, पण इंद्रियजन्य सुखाला कोठेच बूड नसल्या-मुळे ते एकसारखे पळत असते यामुळे त्याच्यामागे पळता पळता तुम्ही आपल्यावर दु खाचे डोगर मात्र ओढून घेता, पण माझा दृष्टिकोण वेगळ्या प्रकारचा आहे त्याने चिरशातीचा लाभ होईल

तुम्ही सर्वस्वी चुकला आहा असे माझे म्हणणे नाही तुम्ही आपल्या मार्गाने खुशाल चला तुमच्या मार्गानेही जगाला सुखाचा लाभ कदाचित् होईल, पण एवढ्यामुळे माझा मार्ग चुकीचा ठरतो असे नाही माझ्या दृष्टीने माझा मार्गही व्यावहारिक आहे आपण सारेच आपापल्या मार्गाने सुखरूप चालू या प्रत्येक जण खरोखर व्यवहारी असता तर कितीतरी चागले झाले असते काही भौतिक शास्त्रज्ञही धर्मावर आरूढ झालेले मी पाहिले काल-करून सर्व मनुष्यसमाज अशा स्थितीत येईल अशी मला मोठी आशा आहे पाण्याला उकळी फुटण्याची वेळ आली म्हणजे प्रथम एकच बुडबुडा तळा-तून वर येतो मग त्यामागून दुसरा, तिसरा, चवथा असे क्रमाने वर येतात अखेरीस जिकडे तिकडे बुडबुडेच दिसू लागून त्या भाड्यात मोठी खळबळ उडून जाते. जगाची गोष्टही अशीच आहे यातील प्रत्येक मनुष्य एक एका बुडबुड्यासारखा आहे पुष्कळ बुडबुडे मिळून एक राष्ट्र बनते हळू हळू ही अनेक राष्ट्रे एकरूपाकडे येऊ लागतात आज भासत असलेला परकेपणा विराम पावून ज्या एकरूपाकडे आपण सारे धाव घेत आहो, तेथे सारी राष्ट्रे एकवटण्याचा काल अवश्य येईल अशी माझी खात्री आहे भौतिक शास्त्रज्ञ

आणि धर्मशास्त्रज्ञ हे आज एकमेकांपासून विभक्त दिसतात पण तेही त्या एकरूपांत भेटतील अशी माझी खात्री आहे. सर्वजग जीवन्मुक्तांचें होईल. या एकाच साध्याकडे आपण सारे धांव घेत आहों. आज आपण परस्परांचा मत्सर करतों, परस्परांत कोठें द्वेषभावही आढळतो आणि कोठें परस्परसहकारिता आणि प्रेम हीं आढळतात; तथापि या परस्परविरोधी भावनांचा अर्थ हाच कीं, आपण सारे त्या एकाच साध्याकडे धांव घेत आहों. एकाच प्रवाहाच्या प्रचंड ओघांत आपण सारे सांपडलों असून तो प्रवाह त्या एका समुद्राकडे धांव घेत आहे. नदीच्या प्रवाहांत सांपडलेल्या गवताच्या काड्या आणि कागदाचे तुकडे ज्याप्रमाणें अहेतुकपणें वाहतांना दिसतात, त्याचप्रमाणें आपल्या कृती आज अहेतुक दिसत असल्या तरी अखेरीस त्या कल्याणमय एकरूपांतच आपण अखेरचा मुक्काम करूं.



# खासगी पत्रें.

— ० —

## पत्र ४३ वे.

५४१ डीयरबॉर्न ॲव्हेन्यू,
शिकागो, २८ डिसेबर १८९३.

प्रिय—

शिकागो येथील माझ्या व्याख्यानाची हकीगत हिदुस्थानातील पत्रात प्रसिद्ध झाली ही मोठ्या नवलाची गोष्ट आहे, कारण होता होईतो माझ्या कार्याचा उगीच गाजावाजा होऊ नये याबद्दल मी खबरदारी घेत असतो. या देशात बऱ्याचशा गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या मला आढळल्या येथे दारिद्र्य बहुतेक नाहीच असे म्हटले तरी चालेल येथल्या इतक्या सुशिक्षित स्त्रिया दुसऱ्या कोठेहि मला आढळल्या नाहीत चागले सुशिक्षित पुरुष आपल्या देशातही आहेत, पण येथल्यासारख्या सुशिक्षित स्त्रिया मात्र दुसऱ्या कोठे विरळाच आढळतील त्या किती मोकळ्या मनाच्या आहेत म्हणून सागू! सम्माजिक कार्ये बहुधा सारी त्याच्याच हाती आहेत शाळा आणि कॉलेजे स्त्रियानी भरून गेली आहेत आपल्या देशात स्त्रियाना रस्त्याने एकटे चालण्याची सुद्धा चोरी माझ्यासबधी त्यानी जी कळकळ दाखविली, तिचे तर वर्णनही करता यावयाचे नाही मी येथे आल्यापासून त्यानी माझ्या स्वागतासाठी आपली घरे खुली केली आहेत माझ्या खाण्यापिण्याची सारी तरतूद त्याच करतात. माझ्या व्याख्यानाची व्यवस्था त्याच लावतात बाजारहाट करण्यास मजबरोबर त्या येतात. एकदरीने माझ्या सुखसोयीसाठी प्रत्येक गोष्ट त्या करतात त्याच्या उपकाराची फेड मजकडून कधीही होणार नाही

शक्तीचा खरा उपासक कोण हे तुम्हाला ठाऊक आहे काय? विश्वात परमेश्वर हीच मध्यवर्ती शक्ति असून ती शक्ति स्त्रियाच्या रूपाने व्यक्तदशेस आली आहे असे जो जाणतो, तोच खरा शक्तीचा उपासक होय अशा दृष्टीने

स्त्रियाकडे पाहणारे येथे पुष्कळ लोक आहेत **'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमंते तत्र देवता·'** असे आपल्या शास्त्रातहि म्हटले आहे शक्य तितक्या उत्तम तऱ्हेने येथले पुरुष स्त्रियाना वागवतात आणि यामुळेच ते ऊर्जितावस्थेस येऊन इतके पुढे आले आहेत यामुळेंच येथे स्वतत्रता, विद्या आणि शक्ति याचा वास आहे आपल्या येथे गुलामगिरी आणि दारिद्र्य ही का राहतात ? आपण असे मृत्पिंड कशाने बनलो ? या प्रश्नाची उत्तरे अगदी उघड आहेत

येथील स्त्रिया अत करणाच्या अगदी शुद्ध आणि वर्तनानेही पवित्र आहेत वयाला वीस पचवीस वर्षें होईपर्यंत त्याची लग्ने होत नाहीत लग्नापूर्वी पक्ष्याप्रमाणे त्या स्वतत्रपणे वाटेल तिकडे भराऱ्या मारीत असतात ज्या स्त्रिया घरच्या खाऊन पिऊन सुखी असतात त्या गरिबाचा समाचार घेतात, आणि आपण काय करीत आहो ? मुलीनी बिघडू नये म्हणून अकराव्या वर्षा-आधी त्याची लग्ने लावून टाकण्यात आम्ही फार दक्ष असतो "मुला-प्रमाणेच मुलीनाही काळजीपूर्वक शिक्षण द्यावे व त्याचे सरक्षण करावे" अशी भगवान् मनूची आज्ञा आहे तीस वर्षाच्या वयापर्यंत ब्रह्मचर्य व्रताचे परिपालन झाल्यानतर पुरुषाने लग्न करावे व त्याचप्रमाणे मुलीचेही लग्न शिक्षण पुरे झाल्यानतर करावे, अशी शास्त्राज्ञा आहे, पण व्यवहारात आम्ही काय करतो ? तुम्हाला आपल्या स्त्रियाची स्थिति अधिक सुधारता येईल काय ? असे झाले तरच भावी कल्याणाची काही आशा तुम्हास राखता येईल असे न झाले तर हल्लीच्याहून तुमची स्थिति पुढे सुधारेल ही तुमची आशा फुकट आहे

आपल्या देशात एखाद्या मनुष्याचा जन्म हलक्या जातीत झाला की त्याचा सारा जन्म फुकट जातो. मग त्याला कसलीही आशा करावयास नको. अशा जुलमाला काय म्हणावे हे खरोखर मला कळत नाही या देशात स्वत ची उन्नति करून घेण्याची शक्यता आणि सधि सर्वांस मिळते येथे एखादा मनुष्य आज दरिद्री असला तरी उद्याच तो श्रीमत आणि विद्वान् होऊ शकतो व त्याचा मानमरातबही वाढतो गरिबाना मदत करण्यास येथील सर्व लोक फार दक्ष असतात हिदुस्थानात अठरा विश्वे दारिद्र्य भरले आहे अशी हाकाटी सर्वत्र ऐकू येते, पण गरिबाना मदत करणारी एखादी

तरी सस्था तेथे अस्तित्वात आहे काय ? हिंदुस्थानातील लक्षावधि दरिद्र्याच्या यातना आणि दु खे पाहून ज्याचे अत करण तिळ तिळ तुटते असे लोक कितीसे आहेत ? खरोखर आपण मनुष्ये तरी आहो काय ? गरिबाना घासभर अन्न मिळावे आणि त्याच्यात सुधारणा व्हावी म्हणून आम्ही कोणता उद्योग करीत आहो ? आम्ही त्याना स्पर्शही करू इच्छित नाही त्याची सगती टाळावी अशीच आपली इच्छा आहे अशा स्थितीत आम्हास मनुष्ये तरी कसे म्हणावे, हा प्रश्नच आहे ते लक्षावधि ब्राह्मण पायाखाली तुडविले गेलेल्या लक्षावधि सामान्य लोकासाठी काय करीत आहेत ? या लोकासबधी 'शिवू नका,' 'शिवू नका' एवढा एकच ध्वनि त्याच्या तोडावाटे बाहेर पडतो आमचा सनातन धर्म असल्या लोकाच्या हाती सापडल्यामुळे त्याची विटबना होऊन तो हीनतेस मात्र पोहोचला आहे 'शिवू नका' एवढ्यातच आमचा सारा धर्म सध्या साठविला गेला आहे. याखेरीज त्याला दुसरे कोणतेही स्वरूप सध्या उरलेले नाही

अनेक देश पाहाण्याचे कोड पुरवावे या हेतूने मी येथे आलो नाही, अथवा नाव आणि कीर्ति मिळविण्यासाठीही मी येथे आलो नाही, तर हिंदुस्थानातील लक्षावधि गोरगरीबाच्या उन्नतीसाठी काही साधन सापडेल की काय, हे पाहाण्यासाठी मी येथे आलो आहे परमेश्वराची कृपा होईल तर ही साधने कोणती आहेत हे तुम्हास समजेल

धार्मिकतेसबधी पाहता अमेरिकन लोक आपणाहून पुष्कळच कमी प्रतीचे आहेत, पण त्याची समाजरचना आपणाहून फारच वरिष्ठ दर्जाची आहे आपण त्यास धर्मज्ञान देऊ आणि त्याच्या समाजात जे काही उत्तम म्हणून असेल त्याचा अगिकार आपण करू.

आपला—

**विवेकानंद.**

---

## पत्र ४४ वे.

५४१ डीयरबॉर्न ॲव्हेन्यू,
शिकागो, २४ जानेवारी १८९४.

प्रिय मित्रहो,

तुमची सर्व पत्र मला पोचली माझ्यासबधी तुम्हाला इतकी बातमी लागली याबद्दल मला मोठे नवल वाटले मजवर टीका करणाऱ्या ज्या वर्तमानपत्रासबधी तुम्ही लिहिले आहे ते पत्र अमेरिकन लोकमताचे निदर्शक आहे असे समजू नका. येथे त्या पत्राचे अस्तित्वही पुष्कळास ठाऊक नाही जुनाट हटवादीपणा कायम ठेवणे हाच या पत्राचा बाणा आहे तथापि असला बाणा बाळगणारी सारीच पत्रे असभ्य असतात असे नाही सामान्यत अमेरिकन लोक आणि पुष्कळ धर्मगुरूही मजबद्दल चागला आदरभाव दाखवितात येथील समाजात माझी चागली मानमान्यता झाली हे पाहून या पत्रकर्त्याच्या पोटात दुखू लागले, तेव्हा मजवर हल्ला करून आपले हे महत्व वाढविण्याची युक्ति त्याने योजली ही युक्ति येथे पुष्कळास ठाऊक झाली आहे यामुळे असल्या प्रकाराकडे फारसे लक्ष आता कोणी पुरवीत नाही आता हिदुस्थानातील मिशनरी लोक या गोष्टीचा शक्य तितका फायदा घेण्यास कमी करणार नाहीत हे मात्र खरे असे झाले तर त्याना माझा एवढाच निरोप कळव की, " अरे यहुद्या, तुझ्या न्यायाची वेळ आता जवळ आली आहे " या ख्रिस्ती भटानी आता केवढीही आरडाओरड केली तरी त्याचा जुनापुराणा डोलारा आता डळमळू लागला असून तो लवकरच जमीनदोस्त होईल हिदुस्थानातील धर्मज्ञानाचा प्रवेश इकडे (अमेरिकेत) झाला तर त्याच्या पोटाला मात्र चिमटा बसेल याबद्दल मला वाईट वाटते त्याच्या प्रमुख धर्माधिकाऱ्यापैकी एकही मजविरुद्ध नाही असो, आता पाण्यात पाय टाकलाच आहे, त्या अर्थी कसेही करून परतीर गाठलेच पाहिजे

येथे एका सभेपुढे हिदुधर्मावर मी एक निबध वाचला व त्याचा जो रिपोर्ट एका पत्रात प्रसिद्ध झाला, तो मी आज तुम्हास पाहाण्यास पाठवीत आहे. माझ्या कोणत्याही भाषणासाठी पूर्वतयारी बहुधा मी करीत नाही. वेळेवर जे सुचेल ते बोलत जातो

मला आता हिदुस्थानातून कोणत्याही प्रकारची मदत नको येथे सर्व गोष्टीचा भरपूर साठा आहे तुमच्यापाशी जो काही पैसा जमला असेल त्याचा विनियोग हे व्याख्यान छापण्याकडे करा. हिदुस्थानातील सर्व भाषात त्याची भाषातरे करून त्याचा होईल तेवढा प्रसार करा. यामुळे लोकाच्या मनाचा आदर्श आपणासमोर राहील एखादे मध्यवर्ती कॉलेज काढण्याचा आपला सकल्प मागे पडू देऊ नका अशा प्रकारच्या मध्यवर्ती सस्थेच्या शाखा हिदुस्थानात सर्वत्र पसरल्या पाहिजेत उद्योगाला अगदी खळ पडू देऊ नका

अमेरिकन स्त्रियानी मजबद्दल जी कळकळ दाखविली तिजमुळे त्याचे मज-वर किती उपकार झाले आहेत हे मला बोलून दाखविता येत नाही परमे-श्वर त्याचे कल्याण करो या देशातील प्रत्येक चळवळीची सूत्रे स्त्रियाच्या हाती असतात अमेरिकन स्त्रिया ह्या अमेरिकन सस्कृतीच्या आदर्श होत असे म्हणावयास हरकत नाही पुरुष सदोदित उद्योगधद्याच्या मागे लाग-लेले असल्यामुळे त्याना सुसस्कृत बनण्यास फारसा वेळच नसतो

के—चे पत्र मिळाले जातिभेद आहे असाच राहील की तो नष्ट होईल या प्रश्नाशी मला काहीएक कर्तव्य नाही हिंदुस्थानात अथवा हिदुस्थानाच्या बाहेर मानववशाने ज्या उदात्त कल्पना प्रचलित केल्या असतील त्या अत्यत दरिद्री आणि अत्यत कनिष्ट अशा जातीच्या मनुष्यापर्यंत पोहोचत्या करावयाच्या इतकेच माझे कार्य आहे जातिभेद असावा की नसावा अथवा स्त्रियाना स्वातत्र्य द्यावे की देऊ नये असल्या प्रकारच्या प्रश्नाशी माझा काही सबध नाही. मनुष्याचे जीवन कायम राहून त्याची वाढ होणे व तो कल्याणप्रद मार्गास लागण्यास विचारस्वातत्र्य व आचारस्वातत्र्य ही अवश्य आहेत. ज्या ठिकाणी अशा प्रकारचे स्वातत्र्य नाही तेथले मानवकुल आणि ते राष्ट्र ही अधोगतीस जातील

जातिभेद असो अथवा नसो, विशिष्टधर्मपथाचे अस्तित्व असो अगर नसो; जो मनुष्य, जो वर्ग, जी जात अथवा जें राष्ट्र अथवा जी सामाजिक सस्था वैयक्तिक विचारस्वातत्र्याच्या व आचारस्वातत्र्याच्या आड येते तो वर्ग, ते राष्ट्र अथवा ती सस्था दुष्ट असून कालेंकरून तिचा नाश झालाच पाहिजे.

स्वा वि ख ७–१७

प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी ज्याद्वारे उदात्त कल्पनाचा उदय होईल असे एखादे द्वार निर्माण करणे हाच माझ्या आयुष्याचा अतिम हेतु आहे असे झाले म्हणजे जो तो आपापल्या कल्याणाचा मार्ग आपणच शोधून काढील आपल्या वाडवडिलानी व इतर राष्ट्रानी मानवी जीविताची अचिंत्य कोडी कोणत्या प्रकारे सोडविली आहेत हे एकवेळ त्यास समजू द्या विशेषत परकीय राष्ट्रे सध्या काय करीत आहेत हे त्याच्या ध्यानात येऊ द्या रासायनिक पदार्थाचे मिश्रण करून ठेवणे एवढेच आपले कार्य आहे ते आपण केले म्हणजे त्यात फटिक बनण्याची क्रिया सृष्टीच्या कायद्यास अनुसरून आपोआपच घडून येईल एकसारखे कार्य करीत रहा नेटाने आपले कार्य करा आणि परमेश्वरावर भरवसा असू द्या आज उद्या केव्हातरी मी तेथे येईन, पण त्यासाठी कार्य अडू देऊ नका. धर्महानी होऊ न देता कनिष्ठ वर्गाची उन्नति करणे हे आपले मुख्य कार्य आहे

राष्ट्राचे खरे स्वरूप त्यातील झोपड्यात दिसून येते हे तत्त्व विसरू नका. हाय ! हाय ! आपल्या देशातील कनिष्ट वर्गाच्या उन्नतीसाठी कोणी कधीच खटपट केली नाही. विधवाचे विवाह लावण्यासाठी आमचे अर्वाचीन सुधारक एकसारखे धडपडत असतात प्रत्येक प्रकारच्या सुधारणेबद्दल मी सहानुकपा बाळगतो हे खरे, तथापि देशातल्या किती विधवाची पुन्हा लग्ने झाली या प्रश्नाच्या उत्तरावर देशाचे भाग्य अवलबून नाही हे मात्र विसरू नका देशातील सामान्य जनाची स्थिति ज्या प्रकारची असेल तिजवरून देशाची किमत ठरत असते या सामान्य जनतेची उन्नति तुम्ही करू शकाल काय ? त्याचे नष्ट झालेले व्यक्तिविशिष्टत्व तुम्ही त्यास परत देऊ शकाल काय ? त्याच्या जन्माबरोबरच त्यास प्राप्त झालेल्या धार्मिकतेचा विध्वस होऊ न देता त्याचे स्वातत्र्य त्यास तुम्ही पुन्हा देऊ शकाल काय ? समता हे पाश्चात्याचे आदितत्त्व आहे व्यक्तिस्वातत्र्याच्या बाबतीत या तत्त्वाचा अगिकार करून त्याचा प्रत्यक्ष व्यवहार तुम्ही करू शकाल काय ? पाश्चात्याचे हे तत्त्व अगिकारिले असताही धर्माच्या बाबतीत आपली पूर्वपरपरा नष्ट होऊ न देता व आपल्या धार्मिक उपजत बुद्धीचा नाश न करता या तत्त्वाचा व्यवहार तुम्ही करू शकाल काय ? आपणास जें काही कर्तव्य आहे ते हेच, आणि आपण ते खास करू. आत्मश्रद्धा कधीही ढळू देऊ

नका उच्चप्रतीची आत्मश्रद्धा असली म्हणजे मनुष्याच्या हातून कल्पनातीत कार्यें घडून येत असतात एकसारखे पुढे चला पायाखाली तुडविले गेलेल्या दरिद्री लोकाबद्दल आमरण अनुकपा हेच आपले ब्रीदवाक्य आहे. शूर मुलानो, पुढे चला

तुमचा,
**विवेकानंद.**

ता क —एखादें मध्यवर्ती कॉलेज काढून त्याच्या द्वारे आपल्या या कल्पनेचा प्रसार करा तसेच या कॉलेजात प्रचारक तयार करून त्याच्या द्वारे धार्मिक व ऐहिक शिक्षण गरिबाच्या घरादरापर्यंत पोचते करा प्रत्येकाची सहानुभूति या कार्यास मिळेल अशी खटपट करा

---

## पत्र ४५ वे.

न्यूयॉर्क, ९ एप्रिल १८९४

प्रिय—ए,

हिदुस्थान हेच माझे कार्यक्षेत्र असून तेथे मी लवकरच आले पाहिजे अशा अर्थाचे पत्र सेक्रेटरी साहेबाकडून आले आहे त्याचे हे म्हणणे खरे आहे यात सशय नाही, पण प्रिय बधु साऱ्या हिदुस्थानावर प्रकाश पडेल अशी प्रचड ज्योत आपणास पेटवावयाची आहे, याकरिता कोणत्याही गोष्टीची घाई करून उपयोगी नाही परमेश्वराच्या कृपेने सर्व गोष्टी हळूहळू घडून येतील अमेरिकेतील पुष्कळ मोठमोठ्या शहरी माझी व्याख्याने झाली येथे मला पुष्कळ स्नेही मिळाले आहेत व त्यातील काही गृहस्थ फार वजनदारही आहेत जुन्याचा अभिमान बाळगणारे ख्रिस्ती धर्माधिकारी अर्थातच माझ्या विरुद्ध आहेत आणि माझ्याशी समोरासमोर सामना करणे सोपे नाही हे कळून आल्यामुळे शक्य त्या मार्गाने माझ्या कार्यात अडथळा आणण्याचा व माझी नालस्ती करण्याचा यत्न ते करीत असतात. परमेश्वर त्याचे कल्याण करो! मार्गात अडथळे आल्याशिवाय कोणतेही मोठे कार्य आजपर्यंत पार पडलेले नाही, हे लक्ष्यात ठेवून जो कोणी आपल्या कार्याची चिकाटी सोडीत नाही तोच अखेरीस यशस्वी होतो एक

धर्म आणि एक जात होऊन सर्वत्र शांतता आणि समता नांदू लागली म्हणजे सत्ययुगाचा अवतार होईल असें मला वाटतें सत्ययुगाच्या या कल्पनेचा आश्रय आपण केल्यास हिंदुस्थानाचें पुनरुज्जीवन होईल असें माझें मत आहे हें खास होईल यांत शंका बाळगूं नका

शूर बच्चांनो, उठा आणि आतां कार्यास लागा. आपल्या पुराण्या सनातन धर्माचा जयजयकार असो आतां उठून कार्यास लागा म्हणजे जय आपलाच आहे एक वेळ कार्यास आरंभ केला की त्याची टिमकी वाजण्यास उशीर लागणार नाहीं, पण कर्तृत्वावाचून नुसती बडबड मला नको

आपला,
**विवेकानंद.**

---

## पत्र ४६ वें.

शिकागो,
२८ मे १८९४

प्रिय—ए,

न्यूयार्क आणि बोस्टन यांच्या दरम्यान माझ्या येरझारा एकसारख्या सुरू असल्यामुळें इतके दिवस मला तुम्हांस पत्र लिहितां आलें नाहीं मी हिंदुस्थानास केव्हां येईन हें मला सांगतां येत नाहीं माझ्या हालचाली ज्या परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें होतात त्याच्या इच्छेवरच सर्व गोष्टी सोंपविणें बरें. मी जन्मास आलोंच नव्हतों असें समजून पुढील कार्याला तुम्ही लागा. कोणाच्याही मदतीसाठीं थांबून बसूं नका आपल्याच्यानें होईल तें आपण करावें. कोणाच्याही मदतीच्या आशेवर अवलंबून राहणें इष्ट नाहीं

येथें माझीं बरींच व्याख्यानें झालीं या ठिकाणीं खर्चाचें मान फारच भयंकर आहे येथल्या अत्युच्च आणि श्रेष्ठ दर्जाच्या कुटुंबांत माझा चरितार्थ चालतो तरीसुद्धां माझ्या खिशांतून पैसा एकसारखा वाहात असतो.

या उन्हाळ्यांत मी कोठें जाईन हें निश्चित सांगतां येत नाहीं. बहुधा मी येथेंच राहीन असो, मी कोठेंही असलों तरी आपण केलेल्या बेतास व्यावहारिक रूप येईल असें करणें तुम्हांकडे आहे साऱ्या गोष्टी तुमच्या हातून

होणार आहेत याबद्दल सदेह धरू नका आपल्या पाठीमागें परमेश्वर उभा आहे अशी श्रद्धा धरून एकसारखे पुढे चला

माझ्या देशबाधवानी माझ्या स्तुतीची रेलचेल केली आहे, पण कोणी स्तुति केली अथवा न केली तरी आता झोपा काढीत बसू नका आपल्या यत्नात यत्किंचितही उणीव राहता उपयोगी नाही. आपण बेत मोठेमोठे रचले पण त्यापैकी एकालाही अद्यापि थागपत्ता नाही हे लक्षात असू द्या

सुशिक्षित तरुणाना हाती धरून त्याचा एक घटनायुक्त सघ बनविणे इष्ट आहे मोठमोठी कार्यें पार पडतात ती केवळ आत्मत्यागाच्या जोरावरच होत. त्यात स्वार्थाचा, कीर्तीचा, नावलौकिकाचा अथवा दुसऱ्या कोणत्याही आपमतलबी विकाराचा नुसता वासही येता उपयोगी नाही स्वत च्या नावा-साठी तर नाहीच, पण आपल्या गुरुदेवाच्या कीर्तीसाठीही आपणास कार्य करावयाचे नाही या सर्व कल्पना सोडून आपले बेत सिद्धीस न्या. माझ्या शूर मुलानो, चाकाला नेटाने खादा लावण्याची वेळ आता आली आहे. कीर्ति, पैसा, मोठे नाव असल्या प्रकारच्या मूर्खपणाच्या गोष्टीकडे नुसते वळून पाहाण्याससुद्धा फुरसत नाही आपल्या अस्तित्वाची भावनासुद्धा तुम्ही आता सोडली पाहिजे गवताची दोरी वळली म्हणजे तिने मस्त हत्तीसुद्धा बाधला जातो हे लक्षात ठेवा तुम्हा साऱ्याच्या मस्तकावर परमेश्वराचा वरद हस्त असो त्याच्या शक्तीचा सचार तुमच्या अत करणात होवो ही शक्ति तुमच्या आगात आधीच सचरून चुकली आहे असे मला खास वाटते. **उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत।** हे श्रुतिवचन नित्य स्मर-णात असू द्या ही पहा रात्र सपत आली अरुणोदयाची चिन्हे दिसू लागली. दिवस जवळ येऊ लागला लाट उठण्यास सुरवात झाली आहे ही भरतीची लाट पुढे चालू लागली म्हणजे तिला परतविण्याचे सामर्थ्य कोणामध्येही नाही माझ्या मुलानो, प्रथम उत्साहाची कास धरा उत्साहाशिवाय कोण-त्याही गुणाचा उपयोग नाही. यानतर दुसरा गुण म्हटला म्हणजे प्रेममय अत करण हा होय. हे दोन गुण श्रद्धेशी युक्त झाले म्हणजे कसलीही भीति बाळगण्याचे कारण नाही. भीति हे अत्यत मोठे पातक होय

तुम्हा सर्वास माझा आशीर्वाद आहे आपल्या कार्यात ज्या कोणाची मदत होत आहे त्या सर्वास मी आशीर्वाद देतो त्या सर्वांना माझ्या अविनाशी

प्रेमाची जोड मिळाली आहे त्या सर्वाबद्दल मला कृतज्ञताबुद्धि आहे पण त्यानी आपल्या कार्यात खळ मात्र पडू देऊ नये आपल्या कल्पनाचा प्रसार सर्वत्र करा आपण मोठे कार्य करोत आहो या भावनेने फुगून जाऊ नका हठवाद कधीही करू नका कोणाशीच तटाभाडण करू नका पदार्थ एकत्र आणून ठेवले म्हणजे पुढची रासायनिक क्रिया आपोआप घडते ते एकत्र आणणे इतकेच आपले कार्य आहे त्याचे सुदर स्फटिक बनणे हे कार्य परमेश्वराच्या इच्छेप्रमाणे होईल मला येथे यश येत आहे, अथवा तुम्हास एखाद्या कार्यात यश आले तर तेवढ्याने फुगून जाऊ नका आपल्या पुढे केवढे तरी मोठे कार्य पडले आहे त्या मानाने हे यश म्हणजे क पदार्थ आहे मी सागतो ते नीट ऐकून घ्या हिदुस्थानाचा उदय लवकरच अवश्य होणार, तसा परमेश्वराचा हुकूम सुटला आहे आज दु खाग्नीत होरपळत असलेला हिदुस्थानातला खालचा वर्ग खचित सुखी होणार आहे धर्मरवी पूर्वेकडे दिसू लागला आहे तो आपला मार्ग एकसारखा आक्रमण करीत आहे असा देखावा मला आताच स्पष्ट दिसतो आता प्रत्येक मनुष्याने पुढे येऊन चाकाला नेट दिला पाहिजे यात सर्व चागल्या गोष्टीची भर पडेल आणि या गाड्याचा मार्ग सुरळित होईल

तुमच्या मदतीची मला येथे जरूर नाही आता एखादा फड उभारून नकाशे, मॅजिक लॅटर्न, पृथ्वीचे गोल वगैरे चिजा विकत घ्या अशा साहित्यानिशी रोज सायकाळी मोठा जमाव जमवीत जा त्यात महारापोरानासुद्धा वगळू नका त्याना प्रथम धर्माच्या चार गोष्टी सागाव्या आणि नतर या वस्तूच्या साहाय्याने भूगोलखगोलाचे ज्ञान त्यास द्यावे, पण हे काम त्यास समजेल अशा सोप्या भाषेने झाले पाहिजे या कार्यासाठी उत्साहपूर्ण अशा तरुणाचा सघ शिकवून तयार केला पाहिजे आपल्या उत्साहाची प्रेरणा तुम्ही त्याच्या ठिकाणी करा हा सघ आणि त्याचे कार्य ही दोन्ही एकसारखी वाढती राहिली पाहिजेत नदी वाहून गेल्यावर पाय न भिजविता पलीकडे जाऊ, या मूर्खपणाच्या आशेवर थाबून न बसता पाण्यात उडी घालून आणि प्रवाह तोडून पलीकडे चला वर्तमानपत्रे आणि मासिके छापणे या गोष्टी चागल्या आहेत हे खरे, पण खडीभर बोलण्यापेक्षा आणि लिहिण्यापेक्षा एक रतिभरही प्रत्यक्ष कार्य करणे अधिक चागले आता लवकरच

पैसा गोळा करून वर सांगितलेल्या चिजा विकत घ्या आणि कामाला लागा वर्तमानपत्रे आणि मासिके ही दुय्यम प्रतीची आहेत आणि हे कार्य पहिल्या प्रतीचे आहे खालच्या वर्गावर तुम्ही आपली छाप पाडली पाहिजे आपल्या कार्याचा आरभ फारच अल्प म्हणून नाउमेद होऊ नका. त्याच्या पाठीमागून मोठ्या गोष्टी येतील आपण लोकाचे पुढारी नसून त्याचे नोकर आहो अशी भावना बाळगून नित्य चालत जा पुढारीपण मिळविण्याच्या धडपडीने मोठमोठ्या कार्याचा नाश झाला आहे जीवनसमुद्रातील मोठाली जहाजें या इच्छेच्या खडकावर फुटून चूर झाली आहेत याकरिता ही सावधगिरी प्रथम बाळगिली पाहिजे. तुम्ही मेला तरी कसलाही स्वार्थ आपल्या बुद्धीस शिवू देऊ नका माझ्या मनात असलेल्या साऱ्या गोष्टी मला लिहिता येत नाहीत, पण परमेश्वर तुम्हास बुद्धि देईल माझ्या मुलानों, त्याच्या नावाचा जयजयकार करून कार्याला लागा

—**विवेकानंद.**

पत्र ४७ वे.

अमेरिका,
११ जुलै १८९४

प्रिय—ए,

माझ्या मुला, तुला आधी व्यवहार शिकला पाहिजे. आपल्या हातून अद्यापिही मोठाल्या कामगिऱ्या होतील गेल्या वर्षी मी बीज पेरले आणि या साली पीक काढण्याचा माझा विचार आहे तिकडे तुम्ही शक्य तितकी उत्साहजागृति होईल असे करा के—ला आपल्या मार्गाने खुशाल जाऊद्या. योग्य काळी तो आपोआप शुद्धीवर येईल त्याचा सर्व भार मी आपणावर घेतला आहे. त्यालाही स्वत च्या मताप्रमाणे वागण्याचा पूर्ण अधिकार आहे आपल्या पत्राकरिता काही मजकूर त्याच्याकडून लिहून घेत जा म्हणजे तो मनाच्या सुस्थितीत राहील त्याला माझा आशीर्वाद कळव

हार्वर्ड विश्वविद्यालयातील प्रोफेसर राईट याना पत्र लिहून तुम्ही आपले आभार प्रदर्शित करा. अमेरिकेत माझी याच्याशीच प्रथम मैत्री झाली

डेट्रॉइड येथील माझ्या व्याख्यानाला सत्तावीसशे रुपये उत्पन्न झाले, आणि दुसऱ्या एका व्याख्यानाचे उत्पन्न पचाहात्तरशे झाले, पण माझ्या हाती अवघे सहाशे रुपये मात्र आले व्याख्यानें करविण्याचा धदा करणाऱ्या मडळ्या येथे आहेत माझ्या या व्याख्यानाची व्यवस्था यातल्याच एका मडळीकडे असून तिनें मला सपशेल फसविले यापुढे कोणत्याही मडळीशी मी सबध ठेवणार नाही

पुढच्या साली काही ग्रथ छापण्याचा माझा विचार आहे आता शिस्तीने काही उद्योग चालू केला पाहिजे प्रबळ इच्छाशक्ति वाटेल ती गोष्ट करू शकते शक्य त्या रीतीने तेथे उत्साह उत्पन्न केला पाहिजे, पण तुमच्या मार्गास आडपडदा अथवा लपडाव असणार नाहीत ही खबरदारी मात्र अवश्य घ्या आता तुम्ही कामाला लागा म्हणजे उत्साह तुमच्या आगी आपोआप भरेल सुसगठित सस्था उत्पन्न करून त्याच्या द्वारे काम करणे या गोष्टीचे बाळकडूच आपणास मिळाले नाही, पण ही विद्या आता आपणास आपलीशी केली पाहिजे. यातील रहस्य एकच आहे निर्मत्सरी स्वभाव हे त्यातील रहस्य होय आपल्या बाधवाची मते आपल्या उलट आहेतसे दिसले तरी ‘ दे वाण घे वाण ’ करून त्याची सगत तुट्र देऊ नये तटे भाडणे विकोपास जाऊ न देता शक्य तितका सलोखा उत्पन्न करा घटनात्मक सस्था नीट रीतीने चालण्याचे इगित हेच आयुष्य हे आळवावरील पाण्यासारखे आहे याकरिता मोठ्या कार्याकडे ते वाहावे. आपण कोणत्याही विशिष्ट पथाला मिळू नये, तथापि सर्वांशी सहानुकपेने वागून सर्वांच्या कार्यास हातभार लावावा. आपल्या प्रेमाने आपण साऱ्यास जिकावें

आपल्या कार्याचा प्रसार वाढत्या प्रमाणावर कसा होईल इकडे लक्ष ठेवा हालचाल आणि वाढ ही जिवतपणाची चिन्हे आहेत हे लक्षात ठेवा प्रसगी अपयश आले तरी न डगमगता आपल्या कार्याला आपण चिटकून राहिले पाहिजे आतापर्यंत आपल्या हातून झालेली कार्यें क्षुद्र आहेत असे समजूं नका. माझ्या शूर मुलानो, तुम्ही एकसारखे पुढे चालत गेला तर अखेरीस आपला विजय खचित होईल. आता माझ्यापुढे किती तरी कामे पडली आहेत थडी पडू लागली आणि लोक आपापल्या घरी पुन्हा परत येऊ लागले

म्हणजे माझ्या व्याख्यानास सुरुवात होईल, आणि त्याच वेळी काही संस्था-ही मला स्थापाव्या लागतील

तुम्हा सर्वास माझा आशीर्वाद आहे मी वारवार पत्रे लिहिली नाहीत तरी तुम्हापैकी कोणासही मी विसरलो नाही, दुसरे असे की, मी एकसारखा प्रवासात असल्यामुळें तुमची पत्रे हाती येण्यास पुष्कळ वेळा विलब लागतो

तुम्ही अत करणाने पवित्र आणि वर्तणुकीने शुद्ध झाला म्हणजे तुमच्या आगी उत्साह भरेल.

तुमचा,
—विवेकानंद.

---

## पत्र ४८ वे.

अमेरिका,
३१ आगष्ट १८९४

प्रिय ए—

—चे पत्र मला मिळाले. त्याच्या सर्व प्रश्नाची उत्तरे लिहावयाचे म्हटले तर एक मोठा ग्रथच लिहावा लागेल एवढ्याकरिता त्याला माझे आशी-र्वाद सागून इतकेच कळवा की तुमच्या आमच्यात आरभी भेद असला तरी अखेरीस एकवाक्यताच आहे याकरिता आज तुमची मते भिन्न असली तरी हरकत नाही. मुद्दा इतकाच की, मतभेदामुळे कार्य अडू देऊ नका

आपले सारे मित्र यास माझे आशीर्वाद कळवा देशकार्यासाठी मतभेद विसरून जाण्याइतके औदार्य आणि शौर्य, ज्याच्या बुद्धीत आहे त्या साऱ्या देशभक्तावर माझे प्रेम अवश्य आहे.

एखादी कार्यकारी सस्था तुम्ही स्थापन केली तर तिचे मुख्य कार्य तुझ्या स्वत च्या हातात राहू द्या, पण हे करण्यात आपण पुढारी आहो असा भ्रम तुला होऊ देऊ नको. पुढारी म्हणून नव्हे तर नोकर म्हणून कार्याचे मुख्य ओझे तू आपल्या शिरावर घे. तुझ्या आगात पुढारीपणाचा थोडाही सचार झालेला दिसला तर मत्सराग्नी ताबडतोब उत्पन्न होऊन साऱ्या कार्याची राख होईल. आपल्या कार्यांत म्हैसूरचे पाठबळ आपणास पुष्कळ मिळेल

मद्रासेंत एखादे मदिर उभारण्यासाठी म्हैसूर येथून आणि दुसऱ्याही गावातून तुम्ही पैसा गोळा करा या मदिरात चागला पुस्तकसग्रह असावा आणि यात्रेकरू वैराग्यासाठी व आपल्या कार्यकारी सन्याशासाठी या मदिरात काही खोल्याही असाव्या अशा रीतीने एकएक तसूच का होईना आपले पाऊल पुढे टाकीत जावे आतापर्यंत तुम्ही मोठे काम केले आहे. तुम्ही जसजसे पुढे जाल तसतशी अधिक शक्ति तुम्हास प्राप्त होत जाईल

माझ्या कार्याला हे क्षेत्र फारच चागले आहे मी येथे जे जे करतो त्यामुळे इग्लडातील माझ्या भावी कार्याची पूर्व तयारी होत आहे

जवळ पैसा बाळगणे अथवा त्याला नुसता स्पर्शही करणे माझ्या जीवावर येते हे तुम्हास ठाऊक आहेच पैशाचा सग्रह मनुष्याला अवनतीला नेतो यामुळे द्रव्याचा मला अगदी वीट येऊन गेला आहे याकरिता व्यवहाराचा आणि पैशाचा हिशेब कोणातरी मडळीच्या हाती राहील अशी व्यवस्था करा या ठिकाणची माझी मित्रमडळी या बाबीत माझी काळजी घेत असते पैशाच्या हिशेबाचे काम माझ्या गळ्यातून निघाले तर माझ्या डोक्यावरचे केवढे तरी ओझे कमी होणार आहे याकरिता माझ्या येथल्या मित्रमडळीशी शक्य तितक्या लवकर पत्रव्यवहार करून तिजोरीचे काम तुम्ही आपल्या हाती जितक्या लवकर घ्याल तितके आपणा दोघासही बरे होणार आहे लौकरच ही व्यवस्था करून मला तसे पत्रोत्तरी कळवा

आज पाठशाळेच्या कामामुळे तुम्हाला आपल्या कार्यासाठी फारशी फुरसत सापडत नाही कॉलेजचे काम सोडले तरी तुमच्या कुटुबाचा चरितार्थ चालेल अशी व्यवस्था लौकरच लागण्याची मला आशा आहे असे झालें म्हणजे आपल्या कार्याकडे सारा वेळ तुम्हास खर्च करता येईल, तर आता विचार करीत न बसता कामाला लागा पाहू कोणत्याही कार्यात आरभालाच अधिक दगदग असते हा आरभाचा काळ नीट साभाळला म्हणजे त्याचा पुढला मार्ग कालेकरून आपोआप सुरळीत होत जातो मी हिंदुस्थानास येईपर्यंत तुमचे गाडे तुम्ही चालते ठेवले तर पुढे ते कसे झपाट्याने चालेल हे तुम्ही पहालच आपल्या हातून इतके तरी कार्य झाले याबद्दल तुम्ही आनदच मानला पाहिजे एखाद्या वेळी चित्ताला निराशा वाटली तर गेल्या

सालचा आढावा काढून पहा. म्हणजे केवढा मोठा रस्ता आपण ओलाडला हे तुमच्या लक्षात येईल आपली आरभीची स्थिति एखाद्या शून्यासारखी होती पण अशा स्थितीतूनही साऱ्या जगाचे लक्ष आपण आज वेधले आहे एकटे हिदुस्थानच नव्हे तर सारे जग आपणाकडे मोठ्या आशेनें पहात बसले आहे.

प्रेममय अत करण, सत्य आणि मन पूर्वकता याच्या मार्गात कोणीही आडवा येऊ शकत नाही प्राण गेला तरी या तिहीच्या अनुमतीनेच चालावयाचे असा तुमचा निश्चय आहे काय ? तसे असेल तर काळालाही भीक घालण्याचे आपणास कारण नाही. अधारात दडपून गेलेले जग उजेडाची मार्गप्रतीक्षा एकसारखे करीत बसले आहे हा प्रकार एकट्या हिदुस्थानापाशीच आहे खऱ्या धर्माचा प्रकाश आणि सत्य सिद्धात ही एकट्या भरत भूमीजवळच आहेत. याकरिताच अनेक प्रकारच्या स्थित्यतरातूनही परमेश्वराने आम्हास जगविले आहे आता योग्य काळ प्राप्त झाला आहे माझ्या शूर मुलानो, मोठ्या कार्यासाठी आपला जन्म आहे अशी दृढ श्रद्धा धरा. रस्त्यातली कुतरडी भुकली तर त्याना आपण का भ्यावे ? आकाशातून वज्र कोसळून पडले तरीसुद्धा आम्ही भिणार नाही. आता कार्याला लागा

तुमचा,
**विवेकानंद.**

---

## पत्र ४९ वे.

अमेरिका,
२१ सप्टेबर १८९४.

प्रिय ए—

मी या गावाहून त्या गावाला एकसारखा जात येत असून व्याख्याने देणें आणि खासगी वर्ग भरविणे वगैरे कामे करीत असतो जो ग्रथ लिहिण्याचा बेत मी केला होता त्याची एक ओळसुद्धा लिहिण्यास मला अद्यापि फुरसत सापडली नाहीं यापुढे तो लिहिण्याची वेळ आली तर येईल येथल्या उदार-

मतवादी लोकात मला बरेच स्नेही मिळाले असून काही पुराणमतवादीही माझे स्नेही आहेत आता हा देश लौकर सोडून तिकडे यावे असा माझा बेत आहे. एकसारखे काम येथे करावे लागल्यामुळें माझी प्रकृति नादुरुस्त होत आहे एकसारखी व्याख्याने आणि एकसारखी धावपळ यामुळे माझे शरीर शिथिल झाले आहे याकरिता तिकडे लवकरच येण्याचा माझा बेत आहे येथे मी कायमची वस्ती केली तर पुष्कळ लोकास मोठा आनद होईल आणि अशा लोकाचा वर्ग येथे वाढत्या प्रमाणावरही आहे, पण वर्तमानपत्राची स्तुति आणि हे नावाचे सार्वजनिक काम मला कटाळवाणे झाले आहे

केवळ सहानुकपेमुळे सत्कार्य करणारे लोक कोणत्याही देशात झाले तरी थोडेच असतात ख्रिस्ती देशात पैसा देणाऱ्या लोकात दोन वर्ग आहेत कित्येक लोकाच्या अशा देणग्यात काही अतस्थ हेतू असतो आणि काही लोक धर्मात सागितलेल्या नरकवासाच्या भीतीने दान म्हणून पैसा देत असतात "गाय मारून तिच्या कातड्याचे जोडे करावे आणि ब्राह्मणाला त्याचे दान करावे" अशा अर्थाच्या एका बगाली म्हणीचे मला येथे स्मरण होते येथल्या दानशूर लोकात हाच प्रकार मला आढळला आणि जगात चोहोकडे हीच स्थिति आहे दुसरे असे की आपल्या हिंदुकुलाच्या तुलनेने पाश्चात्य लोक खरोखरच कद्रू आहेत असे मला वाटते. आशिया खडातील लोक साऱ्या जगात पहिल्या प्रतीचे दानशूर आहेत असे मला मनापासून वाटते आता तेथे दारिद्र्य फार आहे त्याला उपाय नाही

आता आणखी काही महिने न्यूयॉर्क येथे राहण्याचा माझा बेत आहे अमेरिकेतली सारी बुद्धि, हस्तकौशल्य आणि तिजोरी याचे राहते ठिकाण हेच शहर होय विद्येविषयी बोस्टनची फार प्रख्याती आहे हेही खरे आहे न्यूयॉर्क येथील लोक मनाचे फार मोकळे आहेत तेथली काही वजनदार माणसे माझ्या चागल्या स्नेहातली असल्यामुळें तेथे बराच कार्यभाग होईल असे मला वाटते. आता व्याख्याने देत फिरण्याचा मला अगदी वीट येऊन गेला आहे धर्मज्ञानासारखे सूक्ष्म विषय जाणण्यास पाश्चात्यास अद्यापि पुष्कळ काळ जावा लागेल. प्रत्येक विषयाची किंमत रुपये, आणे, पैत ते ठरवीत असतात धर्मज्ञानाने पैसा, शारीरिक बल, सौंदर्य अथवा दीर्घ आयुष्य

याची प्राप्ति होत असेल तर त्याकडे झुडीच्या झुडी धावतील तसे नसेल तर त्या धर्माकडे कोणी ढुकूनही पाहणार नाही.

सर्व मडळीस प्रेमपूर्वक आशीर्वाद सागावे.

तुमचा,
—विवेकानंद.

## पत्र ५० वे.

अमेरिका,
२१ सप्टेबर १८९४.

प्रिय ए—

इतक्या लवकर त्यागी बनण्याचा निश्चय तुम्ही केला आहे हे ऐकून मला फार वाईट वाटते फळ पक्कदशेला आले म्हणजे झाडापासून ते आपोआपच गळून पडते याकरिता इतकी घाई करू नये योग्य काळाची वाट पहात बसावे हे बरे याशिवाय आपल्या कृतीने दुसऱ्यास दु खी करण्याचा अधिकार कोणासही नाही धीर धरून काही वेळ वाट पहा म्हणजे योग्य काळी सर्व काही बरोबर होईल कळावे, हा आशीर्वाद

—विवेकानंद.

## पत्र ५१ वे.

अमेरिका,
२७ सप्टेबर १८९४.

प्रिय ए—

माझ्या व्याख्यानाची जी पुस्तके कलकत्त्यात छापली आहेत त्यात एक विशेष गोष्ट मला आढळून आली त्यापैकी काही व्याख्याने अशा रीतीने छापली आहेत की त्यात जणू काय राजकीय मतेच मी प्रतिपादन करीत आहे, पण मी राजकारणी नाही आणि या विषयावर व्याख्याने देऊन धामधूम माजवावी असा माझा हेतु कधीच नव्हता. मला काळजी वाटते ती फक्त मनुष्याच्या जीवात्म्याची होय तो नीट स्थितीत राहिला तर

बाकीच्या गोष्टी आपोआप सुरळीत होतात याकरिता माझ्या कोणत्याही लेखाला अथवा भाषणाला अशा प्रकारचे खोटे राजकारणी स्वरूप न देण्याबद्दल कलकत्त्याच्या लोकाना सावधगिरीची सूचना तुम्ही द्यावी रेव्हरड कालीचरण बानर्जी यानीही मी एक राजकारणी प्रतिनिधि आहे असे एका व्याख्यानात सागितल्याचे माझ्या कानी आले काय हा मूर्खपणा ! रेव्ह. बानर्जीनी हे विधान सार्वजनिक व्याख्यानात केले असेल तर कलकत्त्याच्या कोणत्याही पत्रात लिहून त्याची सत्यता सिद्ध करा अथवा हे मूर्खपणाचे आपले विधान परत घ्या असे माझ्यातर्फे बानर्जी यास कळवावे या लोकाच्या या लुच्चेगिरीच्या युक्त्या आहेत ख्रिस्ती म्हणविणारी सरकारे कोणत्या प्रकारे वागत असतात हे एका व्याख्यानात सागून त्यावर टीका करीत असता काही कडक भाषा मी वापरली होती, पण ही टीका सर्वसामान्य होती तीत कोणत्याही विशिष्ट सरकाराचा उल्लेख मुळीच नव्हता एवढ्यावरून राजकारणाशी माझा सबध जोडणे वेडेपणाचे आहे त्या माझ्या व्याख्यानातला काही भाग पुराव्यादाखल छापून मी राजनीतीवर व्याख्याने देत असतो असे माझा एखादा मित्र दाखवू लागला तर अशा मित्रापासून ईश्वरच माझे रक्षण करो असे म्हणावयाचे ! दुसरे काय ?

माझी निदा जे कोणी करीत असतील त्याच्या आक्षेपास मी केव्हाच उत्तर देणार नाही असे आपल्या मित्रास कळवा अशा लोकाशी वादविवाद घालीत बसल्याने आपणही त्याच्याच किमतीचे ठरतो सत्य आहे ते केव्हा ना केव्हा आपणच जाहिर होईल याकरिता माझ्यातर्फे असल्या वादविवादाच्या भानगडीत पडण्याचे कोणासही कारण नाही या लोकाना पुष्कळ गोष्टी अद्यापि शिकावयाच्या आहेत ही अझून कोवळी पोरे आहेत ती आपल्या सुखस्वप्नातून अद्यापि जागी झालेली नाहीत.

वर्तमानपत्रातील या गाजावाजाचा मला आता पूर्ण तिट्कारा येऊन गेला आहे हिमालयातल्या प्रशात प्रदेशात पुन्हा जाण्यासाठी माझे मन उतावीळ होऊन गेले आहे.

तुमचा,
**विवेकानंद.**

---

पत्र ५२ वे.

अमेरिका,
२९ सप्टेंबर १८९४

प्रिय—

तुम्ही सर्वांनी फारच मोठा कार्यभाग केला आहे. माझ्या शूर मुलांनो, तुमच्या या कृतीने मला मूठभर मास आल्यासारखे झाले आहे. आता असे निराश होऊ नका अशा रीतीने पुढे पाऊल घातल्यानतर तुम्ही निराश झाला तर तुमची गणना खरोखरच मुर्खात करावी लागेल

हिंदुस्थान हेच आपले खरे कार्यक्षेत्र आहे हिदुस्थान खडबडून जागा झाला तरच परदेशात त्याबद्दल कुतूहल उत्पन्न होईल हिदुस्थान हे आपले मध्यवर्ती ठिकाण आहे तेथूनच साऱ्या जगभर आपणास पसरावयाचे आहे आता क्षणभरसुद्धा आपले चित्त कापू देऊ नका. आपल्या इच्छाशक्तीने सारे जग आपण हालवून सोडू

माझ्या मुला, पुष्कळ तरुण ख्रिस्ती होत आहेत याबद्दल वाईट वाटण्याचे काही कारण नाही सध्या चालू असलेल्या सामाजिक बधनात त्यानी तरी काय करावे ? मद्रासेत तर ही बधने विशेषच कडक आहेत वाढ व्हावयाला स्वातत्र्य हे आधी पाहिजे. आपल्या पूर्वजानी धर्म अगदी मोकळा ठेवल्यामुळे त्याची वाढ झाली त्यानी जीवात्म्याला मोकळे ठेवले पण देहाला जखडून टाकले, यामुळे सामाजिक वाढ झाली नाही याच्या अगदी उलट प्रकार पश्चिमेकडे घडून आला येथे सामाजिक स्वातत्र्य आहे पण धार्मिक स्वातत्र्य मुळीच नाही धर्माची बधने तोडली पाहिजेत ही जाणीव पाश्चात्यास आणि सामाजिक बधने शिथिल केली पाहिजेत ही जाणीव पौर्वात्यास आता कोठे उत्पन्न होऊ लागली आहे

प्रत्येक मानवकुलाच्या वाढीचे मार्ग वेगवेगळे असतात हिदुस्थानदेश अतर्मुख असल्यामुळें त्याची प्रवृत्ति धर्माकडे आहे, आणि पाश्चात्य देश बहिर्मुख असल्यामुळे त्याची वाढ भौतिक शास्त्राच्या द्वारे होते सामाजिक सुधारणेबरोबरच धर्मसुधारणा यावी अशी पाश्चात्याची इच्छा आहे, आणि धर्माच्या जोरावर सामाजिक सत्ता आपल्या हाती घ्यावी अशी पौर्वात्याची

इच्छा असते यामुळेंच आपल्या अर्वाचीन सुधारकानी धर्माचा काटा उपटून टाकण्यास कमरा बाधल्या याशिवाय सामाजिक सुधारणा होणार नाही असे त्यास वाटले त्याचा हा यत्न सपशेल फसला असे का झाले ? कारण त्याच्यापैकी बहुधा कोणीही आपल्या धर्माचा अभ्यास केला नव्हता, आणि या आदि धर्माचे रहस्य जाणण्यास चित्ताला जे विशेष वळण लावावे लागते तसे वळण त्याच्यापैकी एकाच्याही चित्तास नव्हते हिदू समाजाची स्थिति सुधारण्यास धर्मनाश करावयास नको असे मी ठासून सागतो साप्रतच्या दु स्थितीचे कारण धर्म हे नसून धर्माचा व्यवहारात उपयोग करण्याची चूक हे तिचे कारण होय हे माझे मत प्राचीन ग्रथाधारे मी अक्षरश सिद्ध करून देईन. हेंच मी जिकडे तिकडे शिकवीत असतो आणि सारा जन्म हेच लोकाच्या नजरेस आणण्याचे कार्य आपणास करावयाचे आहे, पण हे दिवसगतीचे कार्य आहे धीर धरून काम करीत रहा **'उद्धरेदात्मनात्मानं'** हे वचन विसरू नका

आपला,
**विवेकानंद**

ता क —हिदू समाजाची साप्रतची रचना केवळ धार्मिक मनुष्याच्या वाढीकरिता केली आहे तिच्याखाली बाकीच्या साऱ्याचा चक्काचूर उडतो लौकिक सुखाची इच्छा ज्याना आहे त्यानी कोठे जावे ? आमचा धर्म जसा उदार आहे तशीच समाजरचनाही झाली पाहिजे आपल्या धर्मतत्त्वाचा अभ्यास करून त्यातील रहस्य जाणून त्याचा व्यवहार केल्यानेच हे कार्य सिद्धीस जाईल हे कार्य दिरगाईचे आहे, पण हाच मार्ग प्रशस्त आहे.

---

## पत्र ५३ वे.

वाशिंग्टन,
२३ आक्टोबर १८९४

प्रिय व्ही—

आता मी बहुताशी त्याच्या गुरुसारखाच झालो आहे मजवर त्याचे प्रेम जडले असून माझी तत्त्वेही त्यास पसत पडली आहेत. हिदुस्थानात जसा मी या गावाहून त्या गावाला भटकत फिरत असे तसाच क्रम हल्ली

येथेही चालू आहे लक्षावधि लोकानी माझी व्याख्याने ऐकिली आहेत आणि त्याच्या चित्तावर त्याचा परिणामही बराच झाला आहे या देशातील खर्चाचे मान भयकर आहे, तथापि परमेश्वराच्या कृपेने मी जेथे जातो तेथे माझी व्यवस्था उत्तम होते तुम्हास व आपल्या सर्व मित्रमडळीस माझा प्रेमपूर्वक आशीर्वाद

—विवेकानंद

---

## पत्र ५४ वे.

वाशिग्टन,
२७ आक्टोबर १८९४

प्रिय ए—

मी हिदुस्थानात जसा वागत होतो तसाच अक्षरश येथेही वागतो. भविष्यत्कालाचे कोणतेही बेत न करता माझा सर्व भार मी परमेश्वरावर टाकला आहे या देशात मला एकसारखे इतके काम करावे लागते की माझे विचार एकत्र ग्रथित करून पुस्तक तयार करण्यास मला मुळीच वेळ नाही. या एकसारख्या धावपळीमुळे माझा अगदी दम निघून गेला असल्याचे मला जाणवू लागले आहे तुमचे उपकार मजवर किती झाले आहेत हे मी बोलून काय दाखवू ? कोणताही स्वार्थ मनात न ठेवता धैर्याने पुढे सरून माझा कार्यभाग तुम्ही आपल्या आगावर घेतला आणि त्यात मद्रास येथील माझ्या मित्राची मदत मिळाली हे तुम्हा सर्वाचे केवढे तरी उपकार आहेत. कोणतीही घटनात्मक सस्था स्थापन करण्याची कला मला अवगत नाही अभ्ययन आणि विचार यात चूर होऊन जाणे हाच माझा प्रकृत स्वभाव आहे. आता हा धावपळीचा उद्योग पुरे झाला असे मला वाटू लागले आहे आता विश्राति घ्यावी आणि गुरुदेवाकडून जे कोणी येतील त्याना शिक्षण द्यावे असे मला वाटू लागले आहे स्वत च्या कर्तबगारीची जाणीव तुम्हास आता झाली आहे आता सारा कार्यभाग तुम्हीच केला पाहिजे. मी नुसता शोभेचा कळस आहे वास्तविक कार्यभाग तुमच्याच हातून झाला आहे. मी स्वत त्यागी आहे. भुकेने मरत असणाऱ्या पोरक्या पोराच्या

पोटात ज्या धर्मानें घांस पडत नाहीत अथवा निराश्रित विधवेचे अश्रु जो धर्म पुशीत नाही तो धर्मच नव्हे असे मी समजतो तुमचे सिद्धात कितीही उच्च असले आणि तुमच्या तत्त्वज्ञानाचे जाळे कितीही सूक्ष्म विणलेले असले तरी जोपर्यंत त्याची व्याप्ति ग्रथातील शब्दापलीकडे अथवा हटवादी धर्माज्ञांपलीकडे गेली नाही तोपर्यंत ते सिद्धात आणि ते तत्त्वज्ञान निरर्थक आहे असें मला वाटते. ग्रथाच्या मर्यादेच्या आत जो धर्म कोडून बसला आहे तो धर्म तरी कसला? आपली नजर सदोदित पुढे असावी म्हणूनच आपले डोळे कपाळाकडे असून मानेकडे नाहीत 'आमचा धर्म' 'आमचा धर्म' म्हणून ज्या धर्माची एवढी फुशारकी तुम्ही सागता आणि ज्याबद्दल एवढा गर्व तुम्ही वाहता त्यातील तत्त्वे आचारात आणण्यास तुम्ही आता पुढे सरले पाहिजे हे तुम्ही केले तर परमेश्वराचा आशीर्वाद तुम्हास मिळेल. माझ्याकडे पाहात बसू नका तुमचा मार्ग तुम्हासच काढला पाहिजे. माझ्यामुळे तुमच्यातील उत्साहबुद्धि जागृत झाली यातच मी सुखी आहे आता हा प्रवाह असाच दृढ करून त्याच्याबरोबर चाला म्हणजे काले-करून सर्व गोष्टी सुयन्त्रित होतील खऱ्या प्रेमाचा जय आज ना उद्या अवश्य होईल सत्याचा जय कालातराने तरी झालाच पाहिजे स्वबाधवावर तुमचे प्रेम आहे काय? परमेश्वराला शोधण्यासाठी कोठे धावपळ करता? गरीब, दु खी, कष्टी आणि दुर्बल माणसे हीं त्याचीच रूपें नव्हत काय? मग त्याचीच भक्ति प्रथम का करू नये? गगानदीच्या काठी विहीर खणण्याचा उद्योग का करावा? प्रेमाची शक्ति सदा विजयी आहे अशी श्रद्धा चित्तात असू द्या कीर्ति, मोठे नाव इत्यादि पोकळ बुडबुड्याच्या मागे कोणी लागावे? वर्तमान-पत्रे काय बडबडतात हे मी कधी पाहातसुद्धा नाही खरे प्रेम तुमच्या चित्तात असेल तर तुम्ही अखड विजयी आहा स्वार्थाचा अशही तुमच्या चित्तात नसेल तर तुमच्या गतीत अडथळा आणणारा कोणी जन्मासच आला नाही असें समजा. आपली दानत उत्तम असली म्हणजे सर्वत्र आपले मार्ग सुलभ होतात तुम्ही स्वत ला परमेश्वराच्या स्वाधीन करून टाका, तुम्ही त्याची मुले बना, म्हणजे समुद्राच्या तळापर्यंत तुम्ही बुडाला तरी तेथेही त्याचा प्रबल हस्त तुमचे रक्षण करील तुमच्या देशाला सध्या मर्दाची जरूर आहे; असे मर्द तुम्ही व्हा.

मीं हिंदुस्थानास यावें असें जो तो म्हणतो मी तेथे आलो तर काही मोठें कार्य होणार आहे असे त्याना वाटते माझ्या मित्रा, ही त्याची मोठी चूक आहे सध्या जो थोडा उत्साह दिसतो ते देशाभिमानाचे एक वारे आहे. याहून काही अधिक अर्थ त्यात नाही जर तुमचा उत्साह अस्सल प्रतीचा असेल तर थोड्याच अवधीत शेकडो वीर तुम्हास येऊन मिलतील आणि तुमच्या गाड्याला खादा लावतील. याकरिता आपण करीत आहो ते सत्कार्य आहे अशी भावना दृढ करून पुढे चला माझ्या मदतीची अपेक्षा करू नका. येथे माझ्या कार्याला फार उत्तम क्षेत्र आहे अमक्या मताशी अथवा तमक्या पथाशी मला काहीसुद्धा कर्तव्य नाही मी परमेश्वराचा नोकर आहे आणि त्याच्या कार्याला येथल्या पेक्षा अधिक चागले आणि सुपीक क्षेत्र जगात दुसऱ्या कोठे सापडणार ? येथे माझ्याविरुद्ध बोलणारा एक निघाला तर माझ्यातर्फे बोलणारे शेकडो आहेत येथे पुरुषाच्या चित्तात सहानुकपा आहे आणि स्त्रिया तर देवतासारख्या आहेत तेथे येऊन काही कार्य करण्यात आता विशेष मतलब काय ? आता माझी येथली कीर्ति तेथे गेली आहे अशा स्थितीत कोणताही भेकड मनुष्य शूराचे अवसान आणील आणि मूर्ख मनुष्यही पडितगिरी दाखवील तेथे येऊन नुसती स्तुतिस्तोत्रेच आतां ऐकावयाची आहेत काय ? खरा मर्द असतो तो कसलाही गाजावाजा न करतां आपले कार्य करीत असतो एक बुद्ध प्रत्यक्ष आकाराला येण्यापूर्वी किती तरी बुद्ध गुप्तपणे मरून जात असतात माझ्या मुला, परमेश्वरावर जशी माझी श्रद्धा आहे तशीच ती खऱ्या मर्दावरही आहे दु खिताचे दु ख कमी करणे हेच पुण्यकर्म आहे असे मी समजतो इतराना सोडविण्यासाठी स्वत नरकातसुद्धा उडी घालणे मला रुजू वाटते. पाश्चात्याकडे तुम्ही तुच्छता बुद्धीने का पहावे ? त्याचे नावही तोडावाटे काढण्याची तुमची योग्यता नाही त्यानी मला अन्न दिले, निवाऱ्याचा आसरा दिला, त्यानी मला स्नेहदान केले आणि सर्वतोपरि आपल्या छायेखाली माझे रक्षण केले या माझ्या मित्रात कित्येक जुनाट ख्रिस्ती धर्माभिमानीही आहेत ख्रिस्ती पाद्री हिंदुस्थानात येतात तेव्हा तुम्ही त्याच्याशी कसे वागता ? म्लेच्छ म्हणून तुम्ही त्यास नुसता स्पर्शही करीत नाही माझ्या मुला, परद्वेषाचे विष आगात भिनलेले असता कोणतीही व्यक्ति अथवा कोणतेही राष्ट्र जिवत राहू शकत नाही.

म्लेच्छ या शब्दाचा जन्म ज्या दिवशी हिंदुस्थानात झाला त्याच दिवशी त्याच्या दुर्भाग्याची मुहूर्तमेढ रोवली गेली या शब्दाने तुम्हास कूपमडूकवत् करून सोडले आहे या कल्पनेचा प्रसार यापुढे तरी होऊ न देण्याची खबरदारी घ्या वेदाताच्या गप्पा चुरुचुरु बोलणे फार सोपें आहे पण त्यातला एक लहानसा सिद्धात व्यवहारात आणणे किती कठीण आहे! हा आशीर्वाद

—**विवेकानंद**

ता क—मत्सर आणि हातात सत्ता असण्याची बुद्धी या दोन गोष्टीबद्दल सावधगिरी बाळगावी आणि आत्मश्रद्धेची जोपासना उत्तम प्रकारे करावी

---

## पत्र ५५ वे.

इग्लड,
२२ सप्टेंबर १८९६.

प्रिय ए—

जर्मनीत असता प्रोफेसर ड्युसन याजबरोबर माझा काळ फार मजेनें गेला पुढे आम्ही दोघेही लडनास आलो आणि आम्हा दोघाचे आता चागले सख्य जमलेले आहे.

आपणास पुष्कळशा गोष्टी अद्यापि कळावयाच्या आहेत उदाहरणार्थ तुलसीदास, कबीर, नानक आणि दक्षिण हिंदुस्थानातील दुसरे साधुसत याची चरित्रे आणि त्यानी लिहिलेले ग्रथ आपण प्रसिद्धीस आणले पाहिजेत. ही चरित्रे सर्वांगशुद्ध आणि विद्वत्तापूर्ण असली पाहिजेत काहीतरी भरकटून लिहिलेली चरित्रे आपणास नकोत आपण जें मासिक काढणार त्यात वेदाताची चचा तर असावयाचीच, परतु त्यात धर्मदृष्ट्या प्राचीन हिंदुस्थानाचें विवेचनही असावयास पाहिजे. धर्माशी ज्या ज्या प्राचीन वस्तूचा सबध येईल त्याची सुबुद्ध चर्चा त्या पत्रात यावयास पाहिजे. उत्तमोत्तम लेखकांकडे जाऊन त्याचे लेख तुम्ही मिळविले पाहिजेत आता सपादून उद्योग करा

—**विवेकानंद.**

---

## पत्र ५६ वे.

लडन—१८९६.

—अमेरिकेत भरलेल्या धर्मपरिषदेला डॉक्टर बॅरोज याच्या इतका कुशल व्यवस्थापक दुसरा मिळाला नसता. त्याच्या नेतृत्वाखाली ही परिषद किती यशस्वी रीतीने पार पडली याचा उल्लेख येथे करण्याचे कारण नाही.

डॉक्टर बॅरोज हे मोठे धैर्यशाली, महाउद्योगी, अतिशय शात वृत्तीचे आणि सौजन्यशील असल्यामुळेच ही परिषद् इतकी यशस्वी झाली. शिकागो येथे भरलेल्या या परिषदेत हिदू लोक आणि आर्यधर्म ही सर्व जगापुढे अत्यत स्पष्ट रीतीने माडली गेली राष्ट्रीयदृष्ट्या हिदुस्थानाला हा मोठाच लाभ झाला आहे आणि या लाभाचे सर्व श्रेय डॉक्टर बॅरोज यानाच दिले पाहिजे.

डॉक्टर बॅरोज हे आता हिदुस्थानात येत आहेत येशू ख्रिस्ताने जगाला काय सागितले ते डॉक्टर बॅरोज आपल्या हिदी श्रोत्यास सागणार आहेत. त्याची व्याख्याने उदार विचाराची आणि आदरणीय होतील अशी माझी खात्री आहे ख्रिस्ताचा सदेश हिदुस्थानाला ते आणणार आहेत, पण असें करताना इतराकडे तुच्छता दृष्टीने पाहाण्याचा त्याचा विचार नाही ख्रिस्ती धर्माशिवाय बाकीचे धर्म त्याज्य आहेत अशी असहिष्णुता ते बाळगीत नाहीत, तर केवळ बधुभावाने इतर धर्माच्या बरोबरीने ख्रिस्ती धर्मानेही हिदुस्थानात कार्य करावे असा त्याचा उद्देश आहे कृतज्ञताबुद्धि आणि पाहुणचार हे आम्हा हिदी लोकाचे जन्मजात गुण आहेत. याकरिता पृथ्वीच्या दुसऱ्या भागातून आलेल्या पाहुण्याशी माझे बाधव वरील दोन गुणास साजेसे वर्तन करतील अशी मला आशा आहे आम्ही दारिद्र्याने पीडलेले असलो, आम्ही कितीही दु खी असलो आणि आज कितीही अवनतस्थितीस पोचलेले असलो तरी आमचे अत करण पूर्वीप्रमाणेच आजही स्नेहमय आहे असा प्रत्यय माझे बाधव या पाहुण्याना आणून देतील अशी मला आशा आहे. आर्यभूमि, सुवर्णभूमि इत्यादि नावानी हिदुस्थान देश ज्या काळी प्रसिद्ध होता त्या काळी आमच्या उदार अत करणाचीही प्रसिद्धि होती आता लक्ष्मीने आम्हास सोडले असले तरी आमच्या अत करणाने आम्हास सोडले नाही असा प्रत्यय सर्वांनी आणून द्यावा

## पत्र ५७ वे

लंडन,
१३ दिसेंबर १८९६.

प्रिय बाईसाहेब,

नीतिमार्गांत निरनिराळ्या पायऱ्या आहेत हा सिद्धांत आपणास एकवार बरोबर पटला म्हणजे बाकीच्या गोष्टींची नीट संगती लागते.

पूर्णत्याग, अहिंसा आणि पूर्ण सहनशीलता ही आपली अखेरचीं ध्येयें आहेत जगाचा लोभ हळू हळू कमी करीत गेल्याने ही अखेरीस सिद्ध होणार आहेत साध्य आपल्यापुढे ठेवून त्या मार्गानें हळुहळू पुढे पाऊल टाकावें. कोणी अपकार केला तर मी पूर्ण सहनशीलता धरून त्याचा प्रतिकार करणार नाहीं असें म्हणून जगात चालावयाचे नाही प्रतिकार, हिंसा, इच्छा, इत्यादि गोष्टी जगात राहणाऱ्याला थोड्याबहुत प्रमाणानें अवश्य असतात. या तत्त्वाचा प्रत्यक्ष आचार करता येईल इतक्या स्थितीला जगातील कोणताही समाज अद्यापि पोंचलेला नाही

जगात दुष्टत्वाचे अनेक प्रकार आहेत, तथापि असें असताही त्याचे पाऊल हळूहळू पण निश्चयाने पुढे पडत आहे पुढे केव्हातरी ही ध्येये जगाला मान्य होण्याचे दिवस येतील. पुष्कळ लोकाना मुंगीच्या पावलानींच पुढे चालले पाहिजे आजूबाजूच्या जगाची स्थिति अशा प्रकारची असताही ही ध्येये ज्याना आताच सिद्ध करावयाची असतील अशा अपवादात्मक व्यक्तीना लौकिकांतून बाहेर पडण्यावाचून दुसरें गत्यतर नाही

भोगास आलेली कर्तव्ये करीत राहणे हा उत्तम पक्ष होय, आणि केवळ कर्तव्य म्हणूनच ती करावयाची ही जाणीव आपल्या ठिकाणी असली म्हणजे आपल्या ठिकाणी आसक्ति उत्पन्न होणार नाही

संगीत ही एक अत्युच्च प्रतीची कला आहे आणि त्यातले रहस्य ज्याना समजेल त्याना ती अत्युच्च प्रतीची पूजा आहे हेंही ध्यानात येईल.

जगातील दुष्टपणा आणि अज्ञान याचा नाश केला पाहिजे, पण दुष्टपणाचा नाश चागुलपणाने होत असतो हे तत्त्व मात्र अवश्य लक्षांत ठेवलें पाहिजे.

आपला,
—विवेकानंद.

## पत्र ५८ वे.

दार्जिलिंग,
६ एप्रिल १८९७.

भारती पत्राच्या सपादिका यास—

सन्मान्य बाईसाहेब,

भारती पत्राचा एक अक आपण मला पाठविला याबद्दल मी आपला आभारी आहे. ज्या कार्यासाठी मी आपला देह वाहून घेतला आहे त्या कार्याला आपणासारख्या सुबुद्ध स्त्रियाची समति मिळाली हे माझे मोठे भाग्य होय असे मी समजतों

साप्रतच्या चढाओढीच्या ससारात नवविचाराची जागृति करणारास प्रोत्साहन देणारे पुरुषसुद्धां विरळाच, मग तसे प्रोत्साहन स्त्रियांकडून मिळेल ही तर आशाच करावयास नको. त्यातून आमच्या या हतभाग्य देशात हाच अनुभव नित्य येतो. याकरिता एखाद्या सुशिक्षित बगाली स्त्रीकडून मिळालेल्या प्रोत्साहनाची किमत पुरुषाच्या टाळयाच्या गर्जनाहून अधिक किंमतीची आहे.

आपणासारख्या अनेक स्त्रिया हिदुस्थानात जन्मास याव्या आणि मातृभूमीच्या उद्धारासाठी आपणासारखीच त्यानी खटपट करावी अशी मी ईश्वराची प्रार्थना करतो.

भारती पत्रात माझ्याबद्दल लिहिलेल्या मजकुरासबधी चार शब्द आपणास मला सागावयाचे आहेत. पाश्चात्य देशात जाऊन मी धर्मसबधी व्याख्यानें दिली अथवा पुढेही कदाचित् देईन, तरी त्यातही हिदुस्थानाचे कल्याण व्हावे हाच माझा उद्देश आहे पाश्चात्य लोकाकडून आपणास मदत मिळाल्याशिवाय आपला उदय व्हावयाचा नाही अशी माझी खात्री कित्येक दिवसापासून होऊन चुकली आहे आपल्या देशात गुणाचे चीज करणारी माणसें सुद्धा अद्यापि आढळत नाहीत कोणत्याही प्रयत्नाला येथे पैशाचे पाठबळ मिळत नाही आणि सर्वांत अत्यत दु खाची गोष्ट ही की आपण व्यवहारशून्य बनलो आहों

अवश्य करावयास पाहिजेत अशा गोष्टी येथे पुष्कळ आहेत; पण त्या करावयास लागणाऱ्या साधनाचा मात्र आपल्या देशात दुष्काळ आहे आप-

णास मेदू आहे, पण हात नाहीत आपली ज्ञानेद्रिये सजीव आहेत पण कर्मेंद्रिये निर्जीव झालेली आहेत वेदाताची सुदर तत्त्वे आपणाजवळ आहेत पण ती प्रत्यक्ष आचारात उतरविण्यास जे सामर्थ्य लागते त्याचा आपणापाशी अभाव आहे सर्वत्र समतेचे तत्त्व आपल्या ग्रथात आहे पण प्रत्यक्ष व्यवहारात भेदाचे निस्सीम साम्राज्य आहे नि स्वार्थी आणि अहेतुमूलक कर्में करावी या उपदेशाचा डागोरा हिंदुस्थानात प्रथम पिटला गेला पण व्यवहारात आपणाइतके अत करणशून्य आणि दुष्ट लोक जगात दुसऱ्या कोठें नाहीत स्वत च्या हाडामासाच्या सागाड्यावाचून पलीकडचा दुसरा कोणताही विचार आमच्या मनात येत नाही

तथापि अशा स्थितीतच आपल्या कार्याचा गाडा पुढे ढकलणे शक्य आहे हेंही लक्षात ठेवले पाहिजे. यावाचून दुसरा इलाजच नाही बरे काय आणि वाईट काय हे जाणण्या इतकी बुद्धि सर्वांनाच असते, पण ससारातील लाटाना न भिता आणि कोणत्याही परिस्थितीत न डगमगता स्वत चे दु खाश्रू एका हाताने पुशीत असता या दु खमय आणि मायामय ससारात परक्याच्या मदतीसाठी आपला दुसरा हात जो पुढे करतो तोच खरा मर्द होय ! एका बाजूस पहावे तो जडमूढ आणि पुराणमतवादी लोकाचा प्रचड वर्ग दिसतो आणि दुसरीकडे पहावे तो चळवळ्या, अधीऱ्या आणि आग खाऊ पाहाणाऱ्या सुधारकाचा वर्ग दिसतो. आपल्या कल्याणाचा मार्ग या दोहोच्या मधून आहे आपल्या बाहुलीवर अत करणापासून प्रेम केले तर तिला जीव येईल अशी जपानातील मुलीची समजूत असल्याचे मी तेथे ऐकले जपानी मुलगी आपल्या बाहुलीला कधीही इजा होऊ देत नाही. ज्याना दुपारचीसुद्धा भ्रात पडली आहे, दुर्दैव ज्याच्या पाठीस हात धुवून लागले आहे, ज्याना तारतम्यभाव उरलेला नाही, जे सदोदित तुडविले गेले आहेत, जे सदाचे भुकेले आहेत आणि जे भाडखोर व मत्सरी बनले आहेत अशा भरतभूमीच्या लोकावर असेच कोणी मनापासून प्रेम करील तर तेही जागृत होतील अशी माझी भावना आहे हजारो उदार पुरुष आणि स्त्रिया आपल्या सर्व चैनीस झुगारून देऊन आपल्या कोट्यवधि देशबाधवाच्या कल्याणासाठी सतत उद्योग सुरू करतील तरच हिदुस्थानात पुन्हा जागृति होईल हिदुस्थानातील कोट्यवधि लोक अज्ञान आणि आपत्ति याच्या चक्राकार भोव-

ऱ्यात दिवसेदिवस अधिक बुडत आहेत माझा स्वत चा अनुभव तो किती ? अनत प्रेम, उत्तम हेतू आणि मनापासून काम करण्याची इच्छा एवढ्या साधनावर जगही जिंकता येते असा माझा अनुभव आहे अशा सद्गुणानीं युक्त असलेला एक मनुष्यसुद्धा लक्षावधि दाभिकाचे आणि पशूचे बेत व त्याची कृष्णकारस्थाने ढासळून टाकतो

पाश्चात्य देशात मी पुन्हा प्रवासाला जाईन की काय, हे निश्चित सागता येत नाही मी कदाचित् गेलो तरी हिदुस्थानाकरिताच जाईन हे लक्षात ठेवावे या देशात मनुष्यबळ तरी कोठे मिळण्यासारखे आहे ? येथे पैसा कोठे आहे ? या दोन्ही बळाची वाण येथे आहे पाश्चात्य देशातील पुष्कळ स्त्री-पुरुषे आम्हास मदत करावयास तयार आहेत चाडाळाच्या घरी जाऊन-सुद्धा त्याच्या पद्धतीने व हिदूधर्माच्या द्वारे त्याची सेवा करण्यास ही युरोपीय स्त्रीपुरुषे तयार आहेत आपल्या येथे अशी माणसे कितीशी मिळतील ? आणि पैशाचे तर नावच काढावयास नको. कलकत्त्यात माझ्या स्वागता-साठी समारभ झाला तेव्हा त्याच्या खर्चासाठी तिकिट लावून माझे व्याख्यान झाले व त्या खर्चाने तो समारभ पार पडला! याबद्दल कोणाला मी दोष देतो असे समजू नका, पण माणसे आणि पैसा ही दोन्ही पश्चिमेकडून आल्याशिवाय आपला उद्धार होणे अशक्य आहे इतकेच मला दाखवावयाचे आहे.

आपल्या पत्राबद्दल आपले आभार मानून आणि परमेश्वराने आपले कल्याण करावे अशी त्याची प्रार्थना करून आपली राजा घेतो

—विवेकानंद.

---

## पत्र ५९ वे.

आल्मोरा,
२९ मे १८९७

प्रिय डॉक्टर साहेब,

आपले पत्र आणि औषधाच्या दोन बाटल्या मिळाल्या काल सध्याकाळ-पासून आपले औषध मी सुरू केले आहे एकएक औषध घेण्यापेक्षा एकाच वेळी दोन्ही घेतल्यास त्याचा गूण लवकर येईल असे मला वाटते

घोड्यावर बसून मी सकाळसंध्याकाळ रपेट करतों. तेव्हांपासून मला आता पुष्कळ बरें वाटू लागले आहे. लहानपणीं तालमींत जाऊन मी कुस्ती करीत असें तेव्हाइतके, आता मला बरे वाटू लागलें आहे. देह असण्यात गमत आहे, असे अलीकडे मला वाटू लागले आहे माझे स्नायू हालचाल करू लागले म्हणजे त्याची शक्ति प्रत्यक्ष अनुभवास येऊन मला बरें वाटते पहिल्या आठवड्यातला हा अनुभव पुढे जरी थोडासा कमी झाला तरी एकदरीनें मला बरीच हुषारी वाटते. माझ्या दोघा स्नेह्याना एका मिनिटात मी चीत केले. हा फरक दार्जिलिंग येथे प्रथम अनुभवास येऊ लागला होता आणि येथे आल्यावर रोगाचे नावसुद्धा उरले नाही याशिवाय आखणीही एक विशेष फरक झाला आहे आथरुणावर पडून बराच वेळ या कुशीवरून त्या कुशी-वर लोळल्याशिवाय पूर्वी मला कधीच झोप येत नसे. मद्रासपासून दार्जि-लिंगपर्यंत मात्र आथरुणाला पाठ लावल्याबरोबर मला झोप येत असते, पण येथे आल्यावर हे सर्व नाहीसें होऊन बराच वेळ लोळत पडण्याची माझी जुनी सवय पुन्हा उपस्थित झाली आहे सध्याकाळचे जेवण झाल्या-नतर आगात उष्णता सपाटून वाढते. दिवसाच्या जेवणानतर अशी कडकी वाटत नाही. येथे आल्यानतर मी बरीच फळे खाऊ लागलो. सध्या नैनी-तालहून बऱ्याच प्रकारची फळें मी मागवितो उन्हाळा पुष्कळ आहे तरी मला फारसा शोष पडत नाही एकदरीने माझी प्रकृति ठीक आहे. शक्ति आणि उत्साह ही पुन्हा परत येत आहेत, पण फाजील दुग्धाहारामुळे मी अधिक लठ्ठ होतो आहे की काय अशी भीति वाटते जे—ने तुम्हास लिहि-लेल्या मजकुरावर मुळीच भरवसा ठेवू नका. तो सदा सुतकी आहे, आणि लोकानाही रडके बनविण्याचा उद्योग तो करतो लखनौ येथे एक लहानसा बर्फीचा तुकडा मी खाल्ला, त्यानेंच तुमची प्रकृती बिघडली असे तो मला सागतो कुजट आणि गारठ हवेचा मात्र मजवर तावडतोब वाईट परिणाम होतो असें दिसते आल्मोरा येथे येताना वाटेतली थडी मला बाधलीसे वाटते. तथापि येथे आल्यावर माझी प्रकृती आता चागली सुधारली आहे. हिमा-लयाच्या बर्फाच्छादित शिखरासमोर बसून “ **न तस्य मृत्युर्न जरा न व्याधिः प्राप्तं हि योगाग्निमयं शरीरम् ।** ” ही उपनिषद्संहिता मी म्हणत असता तुम्ही येऊन मला पहा तर खरे.

कलकत्ता येथें रामकृष्ण मिशनच्या सभा उत्तम रीतीनें पार पडल्या हें ऐकून मला फार सतोष होतो या महत्कार्यासाठीं जे जे कोणी खटपट करीत असतील त्याचे कल्याण असो.

आपला,
**विवेकानंद.**

---

## पत्र ६० वे.

अमेरिका,
१ जून १८९७.

प्रिय—

वेदग्रथांसबधी जे आक्षेप आपण घेतले आहेत ते फक्त सहितापुरते लागू असतील तर खरे आहेत वेद या शब्दात सहिता, ब्राह्मणे आणि उपनिषद्ग्रथ या तीन भागाचा अतर्भाव होतो याबद्दल हिंदुस्थानात सर्व पडिताची एकवाक्यता आहे सहिता आणि ब्राह्मणे यात फक्त कर्मकाड असल्यामुळें त्याजबद्दल फारसा विचार करण्याचे प्रयोजन नाही आपल्याकडे होऊन गेलेल्या सर्व तत्त्ववेत्त्यानी आणि मतस्थापकानी फक्त उपनिषद् ग्रथाचाच आधार घेतला आहे.

फक्त सहिताच वेदग्रथ होत ही कल्पना अगदी अलीकडची असून तिचे जनकत्व स्वामी दयानद याजकडे आहे पुराणमतवादी लोकापैकी कोणासही स्वामीजीचे हें मत मान्य झालेले नाही.

त्याचे हें मत बनण्याचे कारण असे सहिता ग्रथाच्या आधारावर सुसगत रीतीनें नवा पथ बनविता येईल असे त्यास वाटले, पण तेवढ्यानेही त्याचें कार्य भागेना आणि अडचणी शिल्लक राहिल्या तेव्हा ब्राह्मणाचा आधार त्यानी घेतला, आणि अखेरीस अर्थाची ओढाताण करून व प्रसगी घुसडाघुसडही करून पुष्कळशा अडचणी अद्यापि शिल्लक आहेत त्या आहेतच

सहिताचा आधार घेऊन सशोधित आणि सुसबद्ध धर्माची रचना करणें एकपट शक्य असेल तर उपनिषद्ग्रथाच्या आधारे तसे करणे हजारपट अधिक शक्य आहे. आणि याशिवाय असें करताना पूर्वीच्या सर्वसमत

सिद्धांतास विरोध करण्याचेही कारण पडणार नाही. असे केल्यास पूर्वी होऊन गेलेल्या सर्व आचार्यांचे पाठबळ तुम्हास मिळेल आणि नवी रचना करावयास तुम्हास विस्तृत क्षेत्रही सापडेल.

गीता हे हिदुधर्माचे प्रमाणभूत शास्त्र बनले आहे हे खरे, आणि तो ग्रथ तशा योग्यतेचा आहे हेही खरे, तथापि श्रीकृष्णाच्या विभूतीभोवती इतके आडरान माजले आहे की त्यातून त्या विभूतीच्या जीवनक्रमाची दिशासुद्धा सापडणे कठीण आहे याशिवाय अर्वाचीन विचारपरपरा आणि जीवनपद्धति याच्या गरजा पूर्वीहून वेगळ्या झाल्या आहेत हेही लक्षात ठेवले पाहिजे

या बाबीचा विचार करण्यात वरील सूचनाची मदत आपणास होईल अशी मला आशा आहे.

आपला,
**विवेकानंद.**

---

## पत्र ६१ वे.

अल्मोरा,

ॐ नमो भगवते रामकृष्णाय ।
यस्य वीर्येण कृतिनो वय च भुवनानि च ।
रामकृष्ण सदा वन्दे सर्व स्वतन्त्रमीश्वर ॥

"प्रभवति भगवान् विधि" रित्यागमिन अप्रयोगनिपुणा प्रयोगनिपुणाश्च पौरुष बहुमन्यमाना । तयो पौरुषापौरुषेयप्रतीकारवलयो विवेकाग्रहनिबन्धन कलह इति मत्वा यतस्वायुष्मन् शरच्चन्द्र आक्रमितुम् ज्ञानगिरिगुरोर्गरिष्ठ शिखरम् ।

यदुक्त "तत्त्वनिकषग्रावा विपदिति" उच्चेत तदपि शतश "तत्त्वमसि" तत्त्वाधिकारे । इदमेव तन्निदान वैराग्यरुज । धन्य कस्यापि जीवन तल्लक्षणाक्रान्तस्य । अरोचिष्णु अपि निर्दिशामि पद प्राचीन—"काल कश्चित् प्रतिक्ष्यता" इति । समारूढक्षेपणीक्षेपणश्रम विश्राम्यता तन्निर्भर । पूर्वाहितो वेग पार नेष्यति नाव । तदेवोक्त,—"तत् स्वय योगससिद्ध कालेनात्मनि विन्दति" । "न धनेन न प्रजया त्यागेनैके अमृतत्वमानशु" इत्यत्र

त्यागेन वैराग्यमेव लक्ष्यते। तद्वैराग्य वस्तुशून्य वस्तुभूत वा। प्रथम यदि, न तत्र यतेत कोऽपि कीटभक्षितमस्तिष्केन विना, यद्यपर तदेत, आपतति, —त्याग मनस सकोचन, अन्यस्मात् वस्तुन पिण्डीकरण च ईश्वरे वा आत्मनि। सर्वेश्वरस्तु व्यक्तिविशेषो भवितु नार्हति, समष्टिरित्येव ग्रहणीय। आत्मेति वैराग्यवतो जीवात्मा इति नापद्यते, परन्तु सर्वग सर्वान्तर्यामी सर्वस्यात्मरूपेणावस्थित सर्वेश्वर एव लक्ष्यीकृत । स तु समष्टिरूपेण सर्वेषा प्रत्यक्ष । एव सति जीवेश्वरयो स्वरूपत अभेदभावात् तयो सेवाप्रमरूप-कर्मणोरभेद । अयमेव विशेष,—जीवे जीवबुद्धया या रोवा समर्पिता सा दया, न प्रेम, यदात्मबुद्धया जीव सेव्यते, तत् प्रेम। आत्मनो हि प्रेमा-स्पदत्व श्रुतिस्मृतिप्रत्यक्षप्रसिद्धत्वात्। तत् युक्तमेव यदवादीत् भगवान् चैत-न्य,—प्रेम ईश्वरे, दया जीवे इति। द्वैतवादित्वात् तत्र भगवत सिद्धान्त जीवेश्वरयोर्भेदविज्ञापक समीचीन अस्माक तु अद्वैतपराणा जीवबुद्धिर्बन्ध-नाय इति। तदस्माक प्रेम एव शरण, न दया। जीवे प्रयुक्त दयाशब्दोऽपि साहसिकजल्पित इति मन्यामहे। वय न दयामहे, अपि तु सेवामहे, नानु-कम्पानुभूतिरस्माक अपि तु प्रेमानुभव स्वानुभव सर्वस्मिन्।

सैव सर्ववैषम्यसाम्यकरी भवव्याधिनीरुजकरी प्रपञ्चावश्यम्भाव्यत्रितापह-रणकरी सर्ववस्तुस्वरूपप्रकाशकरी मायाध्वान्तविध्वसकरी आब्रह्मस्तम्बपर्यन्त-स्वात्मरूपप्रकटनकरी प्रेमानुभूतिर्वैराग्यरूपा भवतु ते शर्मणे शर्मन्।

इत्यनुदिवस प्रार्थयति त्वयि धृतचिरप्रेमबन्ध

—विवेकानंद.

---

## पत्र ६२ वे.

डेराडून,
२४ नोव्हेबर १८९७.

प्रिय एम्.—

रामकृष्णचरित्रमालेपैकी दुसरा अक पावला आपला फार आभारी आहे. आपली ही दिशा अगदी नवीन आहे. आपल्या लेखनपद्धतीत चरित्र-नायकाच्या वृत्तीवर लेखकाची छाया थोडीशीसुद्धा पडलेली नाही हा आपल्या कृतीचा विशेष होय अशा रीतीने अवतारी पुरुषाचा लिहिलेला चरित्रग्रथ

हा पहिलाच होय भाषापद्धतीबद्दल कितीही स्तुति केली तरी ती थोडीच आहे ती इतकी ताजी, मुद्देसूद आणि साधी आहे की, तिच्याबद्दल अधिक काही लिहिताच येत नाही

आपला लेख वाचीत असता मला झालेला आनद व्यक्त करता येत नाही. तो वाचीत असता ससाराच्या बाहेर मी गेलो आहे असे मला वाटते. आपले गुरुमहाराज स्वत अत्यत कल्पक होते ते अगदी स्वतत्र वृत्तीचे होते, आणि हेच विचारस्वातत्र्य आपणास दाखविता आले पाहिजे नाहीतर स्वस्थ बसावें हेच बरे हे चरित्र लिहिण्याचा उद्योग यापूर्वी दुसऱ्या कोणी का केला नाही हे आता मला बरोबर समजले हे महत्कार्य तुमच्यासाठी राखून ठेवले होते आपल्या पाठीशी त्याची मूर्ति उभी आहे हे उघड दिसते. प्रेमपूर्वक नमस्कार

**विवेकानंद.**

ता क—हा सवाद वाचून साक्रेटिस आणि प्लेटो या जोडीची बरोबर आठवण होते तुमच्या स्वत च्या व्यक्तीचा कोठे मागमूसही लागत नाही. यातील नाट्यमय भाग तर अत्यत सुदर उतरला आहे. येथे आणि पाश्चात्य देशातही सर्वांना तो फार आवडतो

## पत्र ६३ वे.

देवगड, वैद्यनाथ,
३ जानेवारी १८९८.

प्रिय माते,

आपल्या पत्रात काही विशेष महत्वाचे प्रश्न उपस्थित झाले आहेत या एका लहानशा पत्रात त्याना सविस्तर उत्तर देणे शक्य नाही तथापि त्याचे थोडेसे विवेचन मी येथे करतो.

कोणी मोठा ऋषि अथवा मुनि असला अथवा प्रत्यक्ष परमेश्वर झाला तरी समाजावर कोणताही निर्बंध त्याला जबरीने लादता येत नाही परिस्थितीच्या निकडीमुळे स्वसरक्षणार्थ समाज काही चाली निर्माण करतो या चालीचे टाचण तयार करण्याचे काम ऋषि करतात कित्येक वेळा तात्पुरत्या जरूरीकरिता एखादा मनुष्य ज्याप्रमाणे एखादी वाईट गोष्टही करतो त्याच-

प्रमाणे समाजही पुष्कळ वेळा एखाद्या आगतुक जरूरीसाठी एखाद्या गोष्टीला अनुसरतो, या आगतुक चालीने त्या वेळेपुरते त्याचे सरक्षण केले असलें तरी तीच पुढे अधिक काळ चालू राहिली तर ती समाजाच्या नाशास कारणीभूत होते

उदाहरणार्थ विधवानी पुनर्विवाह करू नये असा निर्बंध आपल्या समाजात आहे ऋषीनी अथवा दुसऱ्या कोणी दुष्ट मनुष्यानी हा कायदा समाजावर लादला असे समजण्याचे कारण नाही स्त्रियाना आपल्या ताब्यात पूर्णपणे ठेवावे अशी पुरुषाची इच्छा होती, तथापि त्या काळच्या समाजाच्या मदतीशिवाय कोणत्याही प्रकारचे निर्बंध अस्तित्वांत आणणे त्यास शक्य नव्हते तशा कायद्याची जरूर समाजाला भासत असल्याशिवाय त्यानें तशा कायद्यास आपली समति कधीही दिली नसती विधवाविवाहासबधी दोन मुद्दे ध्यानात ठेवण्यासारखे आहेत

( १ ) हलक्या वर्गातील समाजात विधवाचे विवाह रूढ आहेत

( २ ) उच्च वर्गीयात पुरुषापेक्षा स्त्रियाची सख्या अधिक आहे

आता प्रत्येक मुलीचे लग्न झालेच पाहिजे असे म्हटले तर प्रत्येक मुलीला नवरा मिळणे कठिण होऊन बसेल, मग अशा स्थितीत एका मुलीला दोन तीन नवरे कोठून मिळतील ! याकरिता स्त्री आणि पुरुष या दोन पक्षापैकी एका पक्षाची तगडमोड करून ठेवणे समाजाला भाग पडले एकदा लग्न झाल्यानतर स्त्रीनें पुन्हा लग्न करू नये असा निर्बंध समाजाने घातला विधवाची लग्ने पुन्हा होऊ लागली तर समाजात कुमारिकाची सख्या अधिक वाढेल उलटपक्षी ज्या समाजात पुरुषाची सख्या स्त्रियापेक्षा अधिक आहे तेथे पुनर्विवाहाची चाल रूढ आहे, कारण, वर सागितलेला आक्षेप त्या समाजाच्या स्थितीत उत्पन्न होण्यासारखा नाही पाश्चात्य देशातही पुष्कळ स्त्रिया नवरा न मिळाल्यामुळे जन्मभर कुमारिका राहात आहेत

जातिभेद आणि इतर सामाजिक निर्बंध याचीही स्थिति अशीच आहे.

याकरिता कोणतीही सामाजिक रीत बदलावयाची म्हटले तर तसे करण्याची आवश्यकता कोठे आहे हे प्रथम निश्चित केले पाहिजे. तेथे मुळातच बदल केला म्हणजे ती चाल निरुपयोगी होऊन आपोआपच मरून

जाईल समाजाला नुसत्या शिव्या देत बसल्यानें अथवा त्याची नुसती स्तुति केल्याने कोणताही कार्यभाग होणार नाही.

आता सामाजिक निर्बंध घातलेले असतात ते सामान्य समाजाच्या बऱ्यासाठी असतात की काय आणि समाज निर्माण होतो तो सामान्य मनुष्याच्या बऱ्यासाठी होतो की काय असे प्रश्न उपस्थित होतात काही लोक या प्रश्नाला 'होय' असे उत्तर देतात आणि दुसऱ्या कित्येकाचे उत्तर नास्तिपक्षी असते समाजातील कित्येक लोकाच्या हातात इतराहून अधिक सत्ता असते आणि तिच्या जोरावर इतराना ते आपल्या अमलाखाली आणतात व युक्तीने, सत्तेने अथवा चापल्याने आपले हेतू हे लोक सिद्धीस नेत असतात असेही काहीचे म्हणणे आहे हे म्हणणे खरे असेल तर अज्ञजनास स्वातंत्र्य देऊ नये आणि तसे करणे धोक्याचे आहे या मताची वाट काय? तसेंच स्वातंत्र्य म्हणजे तरी काय?

मला अथवा तुम्हाला कोणाचेंही घर लुटण्याची परवानगी मिळाली तर आपणास स्वातंत्र्य मिळाले असे खास म्हणता येणार नाही. दुसऱ्या कोणासही उपद्रव न करता आपल्या शरिराचा, बुद्धीचा अथवा पैशाचा आपल्या मनाप्रमाणे व्यय करता यावा हा आपला सर्वांचा स्वाभाविक आणि जन्मसिद्ध हक्क आहे आणि समाजाच्या सर्व घटकास शिक्षण, ज्ञान अथवा पैसा हीं मिळविण्याची संधि सारख्या प्रमाणाने मिळणें अवश्य आहे आता कित्येक लोक असे म्हणतात की गरीब आणि अज्ञ लोकास अशा प्रकारची संधि मिळाली आणि ती पिढ्यानुपिढ्या मिळत गेली तर ते लोक बिघडून उन्मत्त होतील असेही कित्येकाचे मत आहे. हे मत ते प्रतिपादीत असतात त्या वेळी एकदर समाजाच्या कल्याणाचा विचार करीत असतात की केवळ स्वार्थाने अंध होऊन बोलत असतात हे कोणी सांगावे! "खालच्या वर्गाला शिक्षण मिळाले तर आमची सेवा कोण करील?" ही भाषा मी इंग्लंडात सुद्धा ऐकिली आहे

मूठभर श्रीमंत लोकाची चैन चालावी म्हणून कोट्यवधि स्त्रीपुरुषानीं अज्ञानाच्या आणि दारिद्र्याच्या गर्तेंत लोळत पडावे हे युक्त आहे काय? त्याना शिक्षण मिळाले तर समाज उलथापालथा होईल हे म्हणणे किती विचित्र दिसते

समाज म्हणजे काय ? समाज म्हणजे तुम्ही एकच व्यक्ति की बाकीचे लक्षावधि लोक ? केवळ वरचा वर्ग एवढाच समाज असें म्हटलें तर तेवढ्या थोड्याशा वरच्या लोकांस इतरांच्या डोक्यावर सदोदित बसून राहण्याचा ताम्रपट परमेश्वरानें दिला आहे काय ? आपण समाजाचे नेते आहोंत हा पोकळ डौल ते कोणत्या आधारावर मिरवितात ? त्यास सर्वसाक्षित्व प्राप्त झालें आहे काय ?

'**उद्धरेदात्मनात्मानं**' हें वचन सर्व ठिकाणी सारखेंच लागू पडते. आपल्या मुक्तीचा मार्ग प्रत्येकानें स्वत च शोधला पाहिजे स्वत· कायिक, मानसिक आणि आत्मिक मुक्ति मिळवून इतरास तसें करण्यात मदत करणे हे प्रत्येक मनुष्याचें उच्चतम कर्तव्य होय अशा स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गांत जे जे सामाजिक निर्बंध येत असतील ते समाजाला घातक असल्यामुळें त्याचे लौकर निर्मूलन झालें पाहिजे, आणि जे निर्बंध मुक्तीच्या मार्गाकडे नेणारे असतील त्याचे संवर्धन झालें पाहिजे.

कांहीं कारण नसता प्रथमभेटीबरोबरच एखाद्याशी आपली मैत्री होते याचे कारण पूर्वजन्मसस्कार होय असे आपल्या महात्म्यानी सागितलें आहे

इच्छाशक्तीसबधी आपण विचारलेला प्रश्न फार मनोवेधक आहे. हा विषय समजावून घेणे फार अगत्याचे आहे वासनाक्षय हें सर्व धर्मांचें आदितत्त्व आहे, आणि वासनाक्षय म्हटला की त्याबरोबर इच्छाशक्तीचा क्षयही होणारच वासना आणि इच्छा ही एकाच अर्थाची दोन नावें आहेत. हें जग का निर्माण झालें ? अथवा परोक्ष इच्छाशक्ति प्रत्यक्षत्वास का आली ? दुष्ट इच्छा नाहींशी करून सदिच्छेची वाढ करावी असें कित्येक धर्म म्हणतात. त्याचप्रमाणें येथे इच्छा भागवून ठेविली तर परलोकी सुख होईल असेही कित्येक म्हणतात, पण असल्या मतानी शाहाण्याचें समाधान अर्थातच होणार नाहीं उलटपक्षीं वासना ही सर्व दु खांचे मूळ असल्यामुळें तिचें निर्मूलन करणेंच युक्त आहे असें बौद्ध मत आहे; पण या मताचा त्यांनीं शेवटीं इतका अतिरेक केला कीं वासनाक्षयाबरोबर ते आत्मक्षयही स्वीकारून बसले. एखाद्या मनुष्याच्या मानेवर डांस बसला तर त्याला मारण्याकरिता त्या मनुष्याची मान कापून टाकण्याचीच ही युक्ति आहे.

स्वा. वि. ख. ७–१९.

वस्तुस्थिति अशी आहे कीं ज्या वस्तूला इच्छाशक्ति असें नांव आपण देतों तें उच्चतर वस्तूचें एक हलक्या प्रतीचें स्वरूप आहे. वासनाक्षय म्हणजे या हलक्या स्वरूपाच्या इच्छाशक्तीचा क्षय होऊन त्या जागीं ती उच्चतर वस्तु प्रविष्ट होणें. ही स्थिति मनानें अथवा बुद्धीनें जाणतां येत नाहीं. ती त्या दोहोंपलीकडची स्थिति आहे. मोहोर आणि रुपया हीं दिसण्यांत एकमेकां-पासून अगदीं भिन्न असतात; आणि पैसा त्या दोहोंहूनही भिन्न असतो. तथापि मोहोरेची किंमत पैशाहून अथवा रुपयाहून अधिक आहे अशी आपली पक्की खात्री असते. त्याचप्रमाणें मुक्ति अथवा निर्वाण कांहींही म्हणा ही स्थिति जरी मनाच्या अथवा बुद्धीच्या आवांक्याबाहेर आहे तरी ती इच्छा वगैरे शक्तीहून वरच्या प्रतीची आहे. मुक्ति म्हणजे शक्ति नव्हे; पण शक्ति हें मुक्तीचें एक रूप मात्र आहे; आणि म्हणूनच मुक्ति शक्तीहून उच्च-तर आहे. कोणताही हेतु मनांत धरून इच्छाशक्ति वाढविणें आणि नंतर अहेतुकपणें तिची वाढ करणें या गोष्टी त्या इच्छाशक्तीला अधिक सामर्थ्य आणतात व उच्चतर स्थितीप्रत नेतात हें आपल्या लक्षांत आलें असेलच.

आरंभीं गुरुमूर्तीचें ध्यान शिष्यानें करणें हें त्याला हितावह असतें. पुढें हळू हळू त्या मूर्तीचें रूपांतर इष्टदेवतेंत करावें. इष्टदेवता म्हणजे ज्या ठिकाणीं आपलें अहेतुक प्रेम आणि निर्व्याज भक्ति हीं एकत्र होतात तें.

मनुष्याच्या आकाराच्या ठिकाणीं ईश्वरत्व स्थापन करणें हें दुर्घट कर्म आहे ही गोष्ट खरी; पण पुन्हां पुन्हां यत्न करून हें साध्य केलें पाहिजे. यत्नानें वाटेल तें साध्य होतें. ईश्वराचा वास प्रत्येक मनुष्यांत आहे. ही वस्तुस्थिति त्याला ठाऊक असली अथवा नसली तरी प्रत्येक मनुष्य ईश्वरांश आहे ही गोष्ट खरी. तुमच्या प्रेमानें आणि भक्तीनें हें ईश्वरत्व जागृत होतें.

आपला कल्याणेच्छु,

**विवेकानंद.**

---

## पत्र ६४ वें

आल्मोरा,
९ जूलै १८९८.

प्रिय भगिनी,

अजून पल्ला बराच दूर आहे अवकाश थोडा राहिला, आणि अस्तमानाचा समय जवळ येत चालला मला लौकर घरी जावयाचे आहे आतां माझ्या चालीरीति सुधारण्यास मला वेळ नाहीं मला जें काय सागावयाचें होते ते सागण्यापुरता सुद्धा वेळ मला नाही कर्तव्य म्हणून मला काही आहे असे आपणास वाटत असेल तर ती चूक आहे कर्तव्य असें मला कोठेंच उरलेले नाहीं. मला सदेश पोहोंचवावयाचा आहे, तो मी माझ्या मर्जीप्रमाणें पोहोंचता करीन. त्याला हिंदूचे रूप द्यावे, की त्याला ख्रिस्ती बनवावा हा कोणताच विचार माझ्या मनांत नाहीं जगांतील कोणत्याही चालू धर्मांशी त्याचा संबध नाहीं त्याचे रूप अगदी स्वतत्र आहे तो विवेकानदकृत सदेश आहे याबद्दल याहून अधिक सागणें नको मुक्ति हाच माझा धर्म आणि जें जें काही या मार्गाच्या आड येईल त्याशी एकतर मी युद्ध करीन अथवा त्यापासून पळून जाईन कोणत्याही रीतीने माझ्या मार्गांत आड येणारी वस्तु मी टाळीन मनुष्ये ही कोण पदार्थ आहेत ? माझ्याबद्दल ही पोरें काय बडबडतात याची काळजी मी कशाला करू ? त्याना अधिक चागली भाषा ठाऊकच नाही. हे सारें जग पोकळ डौलाचें घर आहे आणि त्याच्या आत तथ्य कांहीं नाही असा अनुभव ज्याने घेतला आहे आणि जो आत्मानुभवी बनला आहे तो पोरासोरांच्या बडबडीला भिऊन आपला मार्ग सोडील काय ? माझें कार्य परिपूर्ण झाले. फार झाले तर आयुष्याची आणखी तीन चार वर्षे बाकी आहेत. पुढें काय होणार याची यत्किंचितही फिकीर न करता मी खुशाल झोंपी जाईन. आणि मला पुन:पुन्हा जन्म घ्यावा लागला आणि हजारों दु खें आणि सकटे सोसावी लागली तरी एकाच परमेश्वराचें पूजन मी करीन. या एकाच परमेश्वरावर माझा पूर्ण भरंवसा आहे. हा परमेश्वर म्हणजे सर्व आत्म्याचें समवायी रूप. जगांतील सर्व दुष्ट, दुःखी, कष्टी आणि गरीब लोकांचे आत्मे जेथें एकत्र होतात तोच

समवायी परमात्मा माझ्या पूजेचा हेतू होय. अरे मूर्खांनों, या जिवंत परमेश्वरास सोडून काल्पनिक पडच्छायेमागें कां धांवतां आणि एकमेकांशीं भांडणें करून लढाया कां करतां ? या प्रत्यक्ष परमेश्वराचेंच पूजन करा आणि बाकीच्या साऱ्या मूर्ति फोडून टाका.

—विवेकानंद

---

## पत्र ६५ वें.

मठ,
१५ मे १९०१.

प्रिय एस्.—

आपलें पत्र पावलें. त्यानें माझ्या चित्तांत बरीच खळबळ उडविली. पूर्व बंगाल आणि आसाम या प्रांतांतून फिरून मी नुकतात येथें आलों आहें. अशी फिरती झाल्यावर मला अतिशय थकवा येऊन अगदीं गळून गेल्यासारखें होतें आणि या खेपेसही तसेंच झालें.

महाराजांची भेट घ्यावी असें तुम्हीं लिहिलें आहे. या भेटीपासून कांहीं फायदा खरोखरच होण्यासारखा असेल तर माझी येण्याची तयारी आहे; पण तसें नसेल तर इतका खर्च सोसून आणि एवढ्या लांबच्या पल्ल्याच्या प्रवासाची दगदग करून तिकडे येण्याची माझी इच्छा नाहीं. याकरितां या गोष्टीचा प्रथम चांगला विचार करा. त्याचप्रमाणें या बाबींत सविस्तर चौकशी करून मला कळवा. मी महाराजांच्या भेटीस आलों असतां आपल्या कार्याला खरोखरच फार फायदेशीर होईल असें पूर्ण विचारांतीं तुम्हांस वाटल्यास तसें मला लिहा.

—विवेकानंद

---

## पत्र ६६ वे.

गोपाळलाल व्हिला, काशी, लष्कर,
९ फेब्रुवारी १९०२.

प्रिय एस् —

—चें पत्र पावलें. ब्रह्मसूत्राचा अभ्यास ज्याचा त्यानेच केला पाहिजे असा माझा निरोप त्याला कळवा. ब्रह्मसूत्रात बौद्ध धर्माचे उल्लेख आले आहेत या त्याच्या म्हणण्याचा अर्थ तरी काय? त्याच्या मनात बहुधा भाष्याबद्दल बोलावयाचे असेल श्रीशकराचार्य हे ब्रह्मसूत्रांवरचे अखेरचे भाष्यकार होत बौद्ध साहित्यात वेदात मताचे उल्लेख जागोजाग आले आहेत आणि त्या धर्माची एक शाखा अद्वैतवादीसुद्धा आहेत अमरकोशाचा कर्ता अमरसिंह स्वत बौद्ध असताही बुद्धाच्या नावाच्या यादीत अद्वय-वादी असेही एक नाव त्यानें नमूद केले आहे.

मायावाद हा ऋक् सहिते इतकाच जुना आहे. श्वेताश्वर उपनिषदात माया या शब्दाचा स्पष्ट उल्लेख असून ते प्रकृतीचे एक रूप आहे असे सागितले आहे श्वेताश्वतर उपनिषद् हें किमान पक्ष बौद्धधर्मापेक्षा तरी अधिक जुनें आहे. बौद्धधर्मासबधी मला नुकतेच काही शोध लागले. शिवपूजन हे बौद्धधर्माच्या अगोदर चालू असून कित्येक शिवस्थाने आपल्या ताब्यात घेण्याचा उद्योग बौद्धानी केला होता असा चागला पुरावा मला मिळाला आहे पूर्वीची शिवस्थाने आपल्या हाती घेण्याचा त्याचा यत्न फसला तेव्हा त्या पूर्वीच्या जागाजवळ त्यानी आपल्या नव्या जागाही निर्माण केल्या बुद्धगया आणि सारनाथ ही ठिकाणे अशाच स्वरूपाची आहेत

अग्निपुराणात गयासुराची कथा आहे ही कथा बुद्धाला अनुलक्षून लि-हिली आहे असे डॉक्टर राजेंद्रलाल म्हणतात, पण त्याची ही चूक आहे ही कथा बुद्धाच्या पूर्वी लिहिली गेली आहे.

गयशीर्ष पर्वतावर बुद्ध रहावयास गेले होते यावरून बुद्धापूर्वी या पर्व-ताला अस्तित्व होतें असें सिद्ध होते.

गया हें पूर्वजपूजेचे प्राचीन काळापासूनचे स्थान आहे पादुकाची पूजा करणें ही चाल बौद्धानी हिदूपासून घेतली आहे. काशी हें शिवपूजेचें अत्यत विख्यात स्थान होतें ही गोष्ट फार प्राचीन काळच्या लेखावरून सिद्ध होते.

बोधगया आणि बौद्धसाहित्य याजवरून आणखी अनेक प्रकारचे शोध मला लागले आहेत. अशा गोष्टीबद्दल ज्याला स्वत ची खात्री करून घेणें असेल त्याने लोकाच्या मूर्खपणाच्या मतावर विश्वासून न बसता प्राचीन ग्रथ स्वत वाचून स्वतःची मते बनवावी हे बरें

काशी येथे माझी प्रकृती बरी सुधारली आहे आणि अशाच रीतीनें ती आणखी सुधारत गेली तर मला पुष्कळच फायदा होईल

बौद्धधर्म आणि हिदुधर्म याचे परस्पर सबध काय आहेत याबद्दल माझ्या विचारात पूर्ण काति होऊन गेली आहे. ही माझी मते सविस्तरपणे लिहून काढण्याइतके आयुष्य मला कदाचित् लाभणार नाही, पण या कामाची दिशा कोणती असावी एवढे तरी मी नमूद करून ठेवीन आणि मग ते सारे काम तुम्ही स्वत आणि तुमचा बधुवर्ग यानी पुरे केले पाहिजे

—विवेकानंद.

---

## पत्र ६७ वे.

मठ, जून १९०२

प्रिय—

मातृपदवीबद्दल स्त्रीजातीच्या मनात मोठा आदर उत्पन्न होईल अशी तजवीज प्रत्येक मानववशाने करावयास पाहिजे असें माझे मत आहे हें व्हावयास विवाहबधन अनुल्लघ्य आणि पवित्र आहे अशी भावना स्त्रियाच्या मनात रुजविली पाहिजे या भावनाचा उदय जेथे नसेल त्या ठिकाणी पूर्ण पावित्र्य कधीही साध्य होणार नाही. विवाहबधन हे अनुल्लघ्य आणि पवित्र आहे अशी भावना हिदू लोकात आणि रोमन कॅथलिक पथात असल्यामुळे त्या लोकात अत्यत सामर्थ्यवान अशी स्त्रीपुरुषे अनेक निर्माण झाली लग्न म्हणजे करार अथवा बळजबरीचा व्यवहार आणि हा करार वाटेल तेव्हा मोडता येतो असा समज अरब लोकांत असल्यामुळें कौमार्य अथवा ब्रह्म-चर्य या महत्तम हेतूची कल्पना त्या लोकात वाढीस लागली नाहीं. अर्वा-चीन बौद्धधर्माचीही अशीच दशा झाली. विवाहसस्थेची पूर्ण वाढ ज्या-च्यांत झाली नाहीं त्यांच्या हातीं हा धर्म पडल्यामुळें त्याच्यातहि या कल्प-

नांची थट्टा झाली आहे. याकरतां विवाहबधनाबद्दल अधिक उच्च आणि अधिक पवित्र कल्पना जपानात रूढ झाल्याशिवाय आजन्म ब्रह्मचारी आणि कुमारी तेथे कशा निर्माण होतील हें मला तरी समजत नाही. आचरणाचें पावित्र्य हेंच खरें उज्ज्वल जीवित होय. ही गोष्ट आपणास ज्याप्रमाणें पटली आहे त्याप्रमाणें मलाही आणखी एक गोष्ट पटली आहे ती ही की, विवाहबधनाच्या पावित्र्याची कल्पना सामान्य जनात पक्की रूढ होण्याची आवश्यकता आहे ही कल्पना अशी रूढ झाली तर अमोघ शक्तीचे ब्रह्मचारी आणि कुमारिका तेथे निर्माण होतील.

—विवेकानंद.

---

## पत्र ६८ वे.

स्विट्झरलंड,
८ आगष्ट १८९६

प्रिय ए.—

आपणास कितीतरी गोष्टी करणे आवश्यक आहे प्रथम प्रामाणिकपणा पुरा पाहिजे मी असे म्हणतो यावरून मी तुमच्याबद्दल थोडीशीही शका घेतो असे समजू नका, पण घालघसरेपणा हा आपणा हिदू लोकाचा एक विशेष दोष होऊन बसला आहे. हिशोबात चोखपणा आणि पद्धतशीरपणा हीं कधीच नसावयाचीं

दुसरी गोष्ट ही की, जें कार्य हाती घेतले त्यावाचून दुसऱ्या कशाचेही चिंतन करू नये त्याच्या सिद्धीवरच आपलीहि आत्मसिद्धि जणू काय अवलबून आहे असे आपणास वाटत राहिले पाहिजे आता हे पत्र तुम्ही चालू करणार तर ती तुमची इष्ट देवता आहे असे तुम्ही समजले पाहिजे मग त्याला केवढे यश येते तें पहा हिदुस्थानांतून अभेदानद यास मी बोलाविलें आहे.

पूर्ण पावित्र्य ठेवून व गुरूची आज्ञा शिरसावद्य मानून जो चालेल त्याला प्रत्येक कार्यांत यश ठेवलेले आहे.

केवळ धर्मचर्चेस वाहिलेल्या पत्राचा खप परक्या देशांत मोठ्या प्रमाणावर होईल ही गोष्ट अशक्य आहे. हिंदूंच्या आंगीं सद्गुणनिष्ठा आणि कृतज्ञपणा हीं असतील तर अशा पत्राचा योगक्षेम त्यांनींच चालविला पाहिजे.

मिसेस आनि बेझंट यांनीं भक्तीवर व्याख्यान देण्यासाठीं आपल्या पंथाच्या मंदिरांत मला बोलाविलें होतें. तेथें मी एक व्याख्यान दिलें. कर्नल ऑल्कॉटही त्या वेळीं हजर होते. सर्व पंथांशीं माझी सहानुकंपा आहे हें दाखविण्यासाठींच मीं ही गोष्ट केली. धर्मांच्या बाबतींत आपण हिंदू लोकच गुरुस्थानीं आहों ही गोष्ट माझ्या देशबांधवांनीं कधींही विसरूं नये. हें गुरुस्थान पाश्चात्यांकडे अद्यापि गेलेलें नाहीं. पण ऐहिक गोष्टींचें शिक्षण मात्र आम्हीं त्यांजपासून घ्यावें.

मॅक्समुल्लर यांचा लेख मीं वाचला. मुजूमदार यांच्या लहानशा लेखाशिंवाय दुसरा कोणताही आधार मॅक्समुल्लर यांस मिळाला नव्हता ही गोष्ट लक्षांत घेतां हा लेख चांगला आहे असें म्हटलें पाहिजे. श्रीरामकृष्णासंबंधीं एक ग्रंथ लिहिण्याचें त्यांच्या मनांत आलें आहे असें त्यांच्या मला आलेल्या पत्रावरून दिसतें. यासंबंधीं मीं बरीच माहिती दिली आहे तथापि आणखी कितीतरी माहिती हिंदुस्थानांतूनच यावयास पाहिजे.

चालूं द्या—शौर्यानें असेंच पुढें पाऊल टाका. चिकाटी धरून रहा. छातीचा कोट करून वाटेल त्या मोठ्या कामाला आपण हात घातला पाहिजे. हा संसार म्हणजे दुःखानें बुजबुजलेलें पेंव आहे हें तुमच्या लक्षांत अजून येत नाहीं काय ? प्रेमपूर्वक आशीर्वाद.

—विवेकानंद.